# मास्टरमन रेडी



सुशील परभृत



मार्च
१९४९



किंमत
३ रुपये

# मास्टरमन रेडी



सुशील परभृत

मार्च
१९४९




किंमत
३ रुपये

पुणें

चिरंजीव — विजय, अशोक व पुष्पा

यांस —

— कुमारवाचकांसाठीं मुद्दाम लिहिलेल्या कॅप्टन मॅरिअट यांच्या सुप्रसिद्ध कृतीचा थोडा विस्तार कमी करून व कथानकाचा शेवट आनंद-पर्यवसायी करून प्रस्तुत अनुवाद तयार केला आहे. माझ्या कुमार वाचकांस तो आवडेल अशी आशा आहे.

सुशील परभृत

# मास्टरमन रेडी

: : १ : :

आठराशे चाळीसचा ऑक्टोबर महिना होता तो. अॅटलॅंटिक महासागरावर तुफानी वारा उसळला होता आणि 'पॅसिफिक' जहाज आपलीं बरीचशीं अवजार गुडाळून त्याच्याशीं झगडत होतें. सारीं अवजारं खुलीं करणच शक्य नव्हत. कारण त्या सुसाटी वाऱ्यात त्याच्या फाटून चिंध्याच झाल्या असत्या. जहाजाच्या सभोवार पर्वतप्राय उंच लाटा उसळत होत्या. त्याच्यावर आरूढ होऊन तें जहाज पलीकडल्या कढईत उतरल कीं तें आत पोटात गडप होत कीं काय असंच वाटे. पण जहाज मोठं भक्कम आणि त्याचा कॅप्टन पण मोठा दर्दी, अनुभवी असा नाखवा होता. जहाजाच्या सुरक्षिततेसाठीं साऱ्या आवश्यक गोष्टी तो केव्हाच करून टाकी आणि मग परमेश्वरा· वर हवाला ठेऊन धिमेपणाने खलाशाना हुकूम देत राही. परमे श्वराची आपल्या सर्वांवरच दृष्टी आहे असा त्याचा पूर्ण विश्वास होता.

आतां देखील तो सुकाणूच्या जवळ खलाशावर देखरेख करीत उभा होता. कारण वादळी वाऱ्यांत सुकाणूवरचा हात कधींच ढिला

होतां कामा नये. आपल्यासमोर नी वर आकाशाकडे पहात मंद आवाजात एका जुन्या गाण्याचे सूर तो गुणगुणत होता :

पाणी पसरलंय आवती भवती ।
काजळ आकाश डोईवरतीं ॥

आणि खरच तसं होत. अॅटलँटिकच्या मध्यावर ते आता होतं आणि सभोंवार उसळणाऱ्या उंच उंच लाटांशिवाय एकहि जहाज दृष्टीच्या टप्यात कुठच दिसत नव्हतं. वर आकाशात काळ्याकुट्ट मेघानीं एकच गर्दी केली होती आणि सत्रस्त वाऱ्याच्या सोसाट्यानें ते सैरावैरा पळत होते. पर्वतप्राय उंच लाटा मस्तकावर पांढऱ्या शुभ्र फेंसाच्या जटा मिरवीत जहाजावर आदळत होत्या आणि तो सक्रुद्ध वारा जहाजाच्या अवजारातून जसा गुरगुरत गुरगुरत पुढे घुसत होता.

कॅप्टन नी सुकाणू धरणाऱ्या दोन खलाशाच्या व्यतिरिक्त एक बारा तेरा वर्षांचा छोकरा आणि लांब केसाचा म्हातारा खलाशी आतां डेकवर उभे होते.

समोरून येणाऱ्या एका उंच लाटेकडे बोट दाखवून त्या छोकऱ्यानें त्या वृद्ध खलाशाचा हात पकडून त्याला विचारले : "ती लाट आतां आपल्याला बुडवणार काय हो रेडी ?"

"छे छे विल्यम; ती बघ जहाजानें आपली नाळ उचलली बघ !– आणि ती पहा गेली पार आपल्या खालून. पण एखादे वेळीं अशा लाटेने जाईलहि जहाज तिच्या पोटात. पण मग आपलं काय होईल रे ? पाण्यात जाशील कीं फेकला तूं."

"हेः, मला नाहीं बुवा हा समुद्र आवडत. आतां जमिनीवर घरीं असतों तर कित्ती बरं झालं असतं ! आपल्या जहाजाचा जसा चुराडा करायला येताहेत या लाटा, नाहीं ?"

"असं तर खरं; आणि जहाज बुडत नाहीं म्हणून सतापानें

गर्जना कशा करताहेत पहा; पण मला कांहीं भीति नाहीं वाटत बुवा. आपले खलाशी, कप्तान आणि हे जहाज देखील कसं छान भक्कम आहे."

"पण पुष्कळदा हीं जहाजं बुडून माणसं मरतात नाहीं हो?"

"असं तर खरं. आणि पुष्कळदा आपल्याला ज्याची खूप खात्री असते कीं नाहीं, तींच बुडतात बघ. पण आपण आपली शिकस्त करायची आणि मग देवावर भार."

"हे कोण हो पक्षी अगदीं पाण्याच्या जवळ उडताहेत असे?"

"माताकारीचीं पिलं म्हणतात त्याना. वादळ व्हायचं असलं म्हणजे दिसतात हे, किंवा असे वादळ झाल्यावर."

"क्रूसोसारखे जहाज फुटून एखाद्या ओसाड बेटावर होतात काय हो तुम्ही कधीं?"

"तुझा क्रूसो नाहीं मला माहीत. पण माझं जहाज मात्र फुटलं होतं. अरे असे किती लोक जहाज फुटून पाण्यात पडतात. काहीं काहीं फार त्रास सकटं सोसून येतात परत. पण काहीं बिचारे आपल्या हालअपेष्टा सागायला जगतच नाहींत. मग असल्या असंख्य लोकातला तुझा क्रूसो कसा मला माहीत असणार बाबा."

"अहो पण पुस्तकांत दिली आहेना त्याची गोष्ट. मी सागेन ती तुम्हाला—अगदीं नक्की. पण हें तुफान झालं कमी कीं मग हं; पण आता माझ्याबरोबर चला खालीं; मी कबूल केलं आहे आईला कीं मी लवकर खालीं येईन म्हणून."

"मग गेलच पाहिजे हं खालीं. कारण चागलीं मुल कबूल केल्या-प्रमाणें नेहमींच वागतात. आणि आता माझा हात पकड घट्ट हं, कीं कुठे कोलांटी उडी मारल्याशिवाय तुला नेऊन सोडतों दारांत बघ. आणि मग हें वादळ सपलं कीं नाहीं कीं माझं जहाज फुटून मी काय

हाल काढले ते मी सांगेन तुला आणि तूं तुझ्या क्रूसोची गोष्ट मला सांग. बरं का. ”

रेडीने मग त्याला त्याच्या केबिनच्या दाराजवळ नेऊन सोडला आणि आता त्याच्या कामाचा प्रहर असल्यानें तो वरच्या डेक-वर आला.

मास्टरमन रेडी, आज जवळ जवळ पन्नास वर्षे असं समुद्रा-वरील जीवन जगत होता. दहा वर्षांचा असतानाच एका कोळसावाहू गलबतावर प्रथम तो नोकरीला लागला. इतकीं वर्षे वारा पाऊस सहन केल्यामुळे त्याचा चेहरा थोडा तपकिरी रंगाचा दिसू लागला होता आणि त्याच्या चेहऱ्यावर खूप सुरकुत्या पण पडल्या होत्या. तरी सुद्धा तो अजून चांगला तरतरीत नी पूर्ण निरोगी असाच असे. कांहीं वर्षे त्याने एका लढाऊ जहाजावर पण काढलीं होतीं; आणि जगाच्या सर्व भागातील हवामानाचा अनुभव त्याने घेतला होता. किती तरी गमतीच्या गोष्टी तो नेहमीं लोकांना सांगे. कांहीं वेळा त्या गोष्टी इतक्या कांहीं चमत्कारिक असत कीं त्यांवर विश्वास ठेवणं कठीण वाटे. पण सत्यवचनी म्हणून त्याची कीर्ति असल्यामुळे त्यावर विश्वास ठेवावाच लागे. गलबतावरील सर्व तऱ्हेच्या कामात तो पुरा वाकबगार होता आणि त्याला लिहिता वाचता पण येत असे. त्याच रेडी हे नांव त्याला नेहमींच जसं शोभून दिसे. कारण कसल्याहि प्रसंगाला तो रेडी—तयार नाहीं असं क्वचितच होई. आणिबाणीच्या वेळीं कप्तान त्याची सल्लामसलत नेहमींच घेई आणि त्याप्रमाणें पुष्कळच वेळा वागे. जहाजावरचा आज तो दुसरा अधिकारी म्हणून काम करीत होता.

ते पॅसिफिक जहाज चांगलं मजबूत बांधणीचं आणि चालीला पण जलद असंच होतं. किती तरी भयंकर अशा तुफानातून आजपर्यंत

ते शीरसलामत निभावून आलेलं होतं. हे चारशें टनी जहाज आतां ऑस्ट्रेलियाला इंग्लिश माल घेऊन चाललं होतं. कॅप्टन ऑसबोर्न हाही अतिशय अनुभवी, सुस्वभावी, आणि अतिशय हुशार असा दर्यावर्दी होता. नेहमीं हंसतमुख प्रसंगावधानी आणि संकटकाळीं सुद्धां डगमगून न जाता त्याला धीरानें तोंड देण्यात तो मोठा वाकब होता. त्याच्या हाताखालीं पहिला अंमलदार म्हणून मॅकिंटॉश म्हणून एक स्कॉचमन होता. स्वभावानें तामसी, आडमुठा पण कामाला वाघासारखा आणि नेहमीं तयार--कॅप्टनला जरी तो स्वभावभेदामुळें पटत नसला तरी त्याचा त्याच्यावर विश्वास मात्र पक्का असे.

याच्याशिवाय जहाजावर नेहमी बारा तेरा खलाशी असत. पण या खेपेला जहाज बंदरातून निघण्याच्या ऐन वेळीं मॅकिंटॉशवर रागावून पाच खलाशी निघून गेले होते आणि कप्तानाला थांबण्याला सवड नसल्यामुळे त्यानें कमी खलाशांनिशींच आपलं जहाज बंदरा बाहेर हाकारलं होतं. पण याचा परिणाम मात्र त्याला पुढे भोगावा लागला होता.

असं हे चारशें–टनी जहाज मालवाहू खरं पण त्यावर कांही दुसरे प्रवासी पण होते. वर उल्लेखिलेला मास्टर विल्यम हा त्या प्रवाशां-पैकींच एक होता. आपले आई वडील आणि तीन भावंडं यांच्या समवेत तो इंग्लंडहून सिडनेला जायला निघाला होता. मि. सीग्रेव्ह हे एक सरकारी अमलदार होते. तीन वर्षांच्या रजेनंतर ते आता सिडनेला परत निघाले होते. त्यानीं सरकारजवळून तीन चार हजार एकर जमीन विकत घेतली होती आणि आता ऑस्ट्रेलियाला परत गेल्यानंतर या आपल्या जमिनीच्या मशागतीकडेच ते आपलं लक्ष देणार होते. त्यासाठीं अनेक प्रकारचीं बीं बियाणीं, हत्यारं पात्यारं, जनावरं वगैरे घेऊन ते चालले होते.

त्यांच्या पत्नी मिसेस सीग्रेव्ह या स्वभावानें मोठ्या मायाळू पण शरीरप्रकृतीनें अशक्त अशा असत. मोठा मुलगा विल्यम हुशार, धीमा आणि मोठा विनोदी नी हंसतमुख; सहा वर्षांचा थॉमस हा पण सुस्वभावी पण अविचारी, नेहमीं कांहींना कांहीं अव्यापारेषु व्यापार करीत असलेला; सात वर्षांची कॅरोलिन बिचारी अगदीं गरीब आणि दीड वर्षांचा गुंड असा आल्बर्ट आणि त्याला सांभाळण्यासाठीं ठेवलेली एक अफ्रिकन पोरगी जूनो. हे एवढे त्या जहाजावरचे इतर प्रवासी. हो, पण सीग्रेव्ह यांचे दोन मोठे धनगरी कुत्रे आणि कप्तानसाहेबांची लाडकी एक टेरिअर कुत्री, हीं या शीरगणतींत राहिलींच होतीं पण.

वादळाचा आज चौथा दिवस होता. पण सुदैवानें त्याचा जोर आता पुष्कळच कमी झाला असल्यानें रात्रंदिवस खपत असलेल्या खलाशांना आता थोडी विश्रांती मिळत होती. आपले ओले झालेले कपडे त्यांनीं आता वरच्या डेकवर आणून दोऱ्यावर पसरले. गुंडाळून ठेवलेलीं आणि पाण्यानें ओलींचिंब झालेलीं शिडें सुद्धां आता वाऱ्यावर फडफडत वाळत होतीं. वारा मोठा शांत पण सारखा वहात होता; जोरात वर उसळत असलेल्या लाटा विराम पावल्या होत्या आणि महासागराच्या त्या प्रशांत पृष्ठभागावर ताशीं चार मैलांच्या गतीनें गलबत मोठ्या डौलात पळत होतें. मिसेस सीग्रेव्ह सुद्धा आंगाभोंवतीं एक शाल गुंडाळून घेऊन एका भल्या मोठ्या पेटीवर येऊन बसल्या होत्या आणि आपले पति नी मुलें यांच्याबरोबर त्यांच्या गप्पा चालल्या होत्या. इतक्यात हातात सूर्ययंत्र—सेक्सटंट—घेऊन सूर्याकडे पहात कॅप्टन ऑसबोर्न त्यांच्याकडे आले.

“काय टॉमी, आता वादळ संपलं म्हणून मजा वाटते कीं नाहीं?”

“मला नाहीं त्याची पर्वा; माझा फक्त सूप सांडला हातांतला”

टॉमी म्हणाला. " पण ही जूनो तर हातांतल्या बाळासकट खुर्चीवरून खालीं आपटली, आणि गेली गडगडत गडगडत. पण बाबानीं उच लली तिला मग."

" आल्बर्ट चेंगरून मरायचाच त्यावेळीं, पण देवाची खैर!" मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या.

" अस खरं. पण जूनोनें स्वतःकडे मुळींच न पाहतां त्याची काळजी घेतली म्हणूनच मिळाला आल्बर्ट आपल्याला." मिस्टर सीग्रेव्हनीं उत्तर दिलें.

" तुमच म्हणणं बरोबर आहे. मि. सीग्रेव्ह. तिनें बाळाला वाच-वलं, पण स्वतःला चांगलंच लागून घेतलं;" कॅप्टन म्हणाले.

" चागलं सणसणीत डोकं आपटल माझ," जूनो हसत म्हणाली.

" अग हो पोरी, पण तुझ्या डोक्यावर चागली दाट लोंकर आहे म्हणून बर!" कॅप्टननीं हंसत उत्तर दिलें.

" आता बारा वाजले आहेत, असं दिसत सूर्यावरून," मॅकिं-टॉश म्हणाला.

" मग आता अक्षांश किती आहेत सागा पाहूं म्हणजे मी रेखांश काढतों मी घेतलेल्या मापावरून. आता पाच मिनिटांत आपण काढूं शोधून आपण कुठे आहोंत तें."

आणि ते पहा रॉम्युलस रीमस पण आले आता डेकवर. त्याना सुद्धां आनद झाला आहे या चागल्या हवेमुळें बघा आपल्या सारखाच. ए, रॉम्युलस! रीमस—रीमस! चला या इकडे!" त्याना हांक मारीत विल्यम म्हणाला.

" मी एक विचारतों मिस्टर सीग्रेव्ह, हीं चमत्कारीक नावं कुठली

ठेवलींत तुम्ही या कुत्र्याची; मी काहीं पूर्वीं कधीं ऐकलेलीं नाहींत तीं. कोण होते हे रॉम्युलस नी रीमस?" रेडीनें विचारलें.

"दोन धनगराचीं नाव आहेत तीं रेडी;" सीग्रेव्ह म्हणाले. "दोघे भाऊ भाऊ होते ते, आणि त्यानीं पुष्कळ जुन्या काळीं रोम नावाचं शहर वसवल, आणि पुढे तें एक मोठं थोरल प्रसिद्ध असं साम्राज्य झाल. रोमचे ते पहिले जुळे राजे—कारण दोघानीं एकाच गादीवर बसून कारभार चालवला. इतिहास अस सागतो कीं रॉम्युलसनें बाधलेल्या एका भिंतीवरून रीमसने उड्डाण केल्यामुळे, रॉम्युलसला आपला अपमान झालासा वाटला आणि त्याने रागाच्या भरात रीमसचा प्राण घेतला. पण तो जुना इतिहास तितकासा विश्वसनीय असा काहीं नाहीं."

"पण तशीच अवस्था त्या भावाची असेल," रेडी म्हणाला, "आपली जुनी म्हण आहे एक—एकाच घद्यातल्या दोघाच कधींच पटत नाहीं, म्हणून. असो; पण, काही तरी नवीन शिकलों मी आज. प्रत्येकालाच असं नवीन शिकता येईल म्हणा; पण न लाजता विचारल मात्र पाहिजे ह त्यानीं. मी तर काय एक म्हातारा आहें, आणि माझ्या या खलाशी धंद्याशिवाय मला दुसरं फारसं काहीच येत नाहीं. पण हे सुद्धा मी जर प्रश्न नसते विचारले तर मला नसत आल. अज्ञान कबूल करण्यात कसलीच लाज नाहीं. नवीन नवीन शिकण्याचा हा राजमार्ग आहे बरं का, विल्यम."

"सुदर, सुंदर—सागितलंत ह रेडी—आणि विल्यम नीट ध्यानांत ठेव हा उपदेश आता," सीग्रेव्ह म्हणाले. "आपल्याला समजत नाहीं तें समजून घेण्यासाठीं प्रश्न विचारण्याला कधींच लाजू नये."

"तसंच करतों मी बाबा नेहमीं. विचारतों कीं नाहीं हो तुम्हाला मी प्रश्न रेडी!"

" होय, विल्यम विचारतोस तू नेहमीं आणि तुझ्या वयाच्या मानाने मोठे विचक्षण असतात तुझे प्रश्न. मला तर असं वाटतं नेहमीं कीं अधिक माहिती जर असती मला तर बरं झालं असतं. "

" बरं चला, आता खालीं जाऊं या आपण रेडी, बेबीला न्यालं ना तुम्ही ? " मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या.

" हो हो; जरूर. ए जूनो, आण त्याला इकडे आणि तू जा पहिल्यानें खालीं—ए बावळे, तोंड शिडीकडे करून उतर ! किती वेळा सांगूं तुला ? खालीं गडगडशील एक दिवस तेव्हा समजेल; " रेडी म्हणाले.

" आणि डोकं घेईन फोडून, " जूनो म्हणाली.

" ओहो, एकशे तीस मैल आहोत आपण केप ऑफ गुड होप पासून. म्हणजे वारा जर असाच अनुकूल चालू राहिला, तर मला वाटतं उद्या जाऊन पोचूं आपण. " मि. सीग्रेव्ह नकाशावरून आपल्या पत्नीकडे पहात म्हणाले " जूनो, तुझे आई वडील भेटतील तुला कदाचित्. "

गरीब बिचाऱ्या जूनोनें खिन्नपणे मान हलवली आणि दोनचार नीरव अश्रुबिंदु तिच्या गालावर ओघळले. तिने अतीशय खिन्नपणें सांगितलं कीं, तिची आईबाप एका डच राक्षसाचीं गुलाम होतीं आणि तो केपपासून पुष्कळ मैल दूर राहात होता; अगदीं लहान असतानाच ती त्याच्यापासून दुरावली होती आणि त्याच्या भेटीची काहींच आशा तिला वाटत नव्हती.

---

## :: २ ::

दुसरे दिवशीं सकाळीं पॅसिफिकने टेबलबेत येऊन केपच्या बंदरांत नांगर टाकला.

“याला टेबल—बे कां म्हणतात हो रेडी ?” विल्यमनें विचारलें.

“तो समोरचा टेबलासारख्या सपाट माथ्याचा टेबल मौंटन आहेना त्यावरून असेल बहुतेक; पहा माथ्यावर किती सपाट आहे तो.”

“हां, आहे खरा सपाट टेबलासारखा.”

“हं; कधीं कधीं त्या माथ्यावरून पांढरी पांढरी ढगं मोठ्या मजेशीर रीतीनें पुढेपुढे सरत जातात. आम्ही खलाशी त्याला टेबल क्लॉथ पसरणं असं म्हणतो. पण आमचं हें टेबल—क्लॉथ कांहीं चमचमीत मेजवानीसाठीं नाहीं बरं का; ती वादळी हवेची निशाणी आहे उलट.”

“मग आपण आहोंत तोंपर्यंत म्हणावं नको पसरू तें टेबल—क्लॉथ, रेडी,” विल्यम म्हणाला. “कारण आपल्याला कांहीं त्याची आतां भूक नाहीं आहे बुवा. पुष्कळ चाखली आपण वादळी हवा; आणि आईला कोण त्रास होतो त्याचा. पण ठिकाण मोठं सुरेख दिसतं आहे नाहीं !”

“आपला दोन दिवस मुक्काम आहे इथे. जायचं असलं किनाऱ्यावर तुम्हांला नी मिसेसना तर पहा;” कॅ. ऑसबोर्न म्हणाले.

पण मिसेस सीग्रेव्हना विचारता त्यांनीं त्या शांत हवेंत गलबतावरच राहण्याचं पसंत केल्यामुळें दुसऱ्या दिवशीं मिस्टर सीग्रेव्ह विल्यम नी टॉमीला केपटाऊन दाखविण्यासाठीं कॅप्टन ऑसबोर्नच्या बरोबर होडींत बसून किनाऱ्यावर गेले. टॉमीनें मी नीट वागेन असं आपल्या

आईजवळ कबूल केलं होतं. पण असं वचन तो नेहमींच देई आणि आई दिसेनाशी झाल्याबरोबर तें वचन तो विसरूनहि जाई. किनाऱ्यावर उतरल्याबरोबर ते सर्वजण प्रथम कॅ. ऑसबोर्नच्या परिचयाच्या एका गृहस्थाकडे गेले आणि हवेंत बराच ऊष्मा असलेमुळे तिथे सर्वांनी लेमोनेड घेऊन आपली तृषा शांत केल्यावर कंपनीच्या बागेतील जंगली जनावरांचा संग्रह पहायला जाण्याचं त्यानीं ठरविलं. विल्यमनें अजून असा संग्रह पाहिला नसल्यानें त्याला तो बेत फारच पसंत पडला आणि टॉमी तर टाळ्या पिटून नाचूंच लागला.

"कंपनीची बाग म्हणजे कुणाची, पण?" विल्यमने विचारलें.

"कांही वर्षांपूर्वी हें केप ऑफ गुडहोप डच ईस्टइंडिआ कंपनीच्या ताब्यात असताना त्यानीं ही बाग प्रथम तयार केली. खर म्हटलं म्हणजे ही बोटॅनिकल गार्डन आहे. पण त्यात निरनिराळ्या वनस्पतीं प्रमाणें जंगली जनावराचा हि संग्रह केलेला आहे. मागे पुष्कळच जनावरं इथे होतीं, पण आता इंग्लंडमधें पण असलं पशुसंग्रहालय असल्यानें, ही बाग जरा मागें पडली आहे."

"तिथे काय काय प्राणी आहेत हो पपा?" टॉमीनें विचारलें.

"सिंह आहेत तिथे पुष्कळ, टॉमी—एका गुहेंत आहेत पुष्कळसे;" कॅ. ऑसबोर्न म्हणाले. "पण त्याच्या फार जवळ नाहीं हं जायचं, ध्यानांत ठेव."

"नाहीं रे बुवा जाणार आपण!"

पण बागेत शिरल्या बरोबर सिंह पाहण्यासाठीं म्हणून टॉमीनें एकदम धाव मारली; पण ऑसबोर्ननीं त्याला परत पकडून त्याचा हात घट्ट धरून त्याला आपल्या बरोबर चालवला.

"हे पाहिलेत का दोन पक्षी? सेक्रेटरी म्हणतात यांना," त्यांच्या बरोबरचे गृहस्थ सांगत होते. "त्याच्या डोक्याच्या मागें तीं लांब पिस

आहेत ना, तीं कारकुनाच्या कानावरल्या लेखणीसारखीं दिसतात. पण हे पक्षी मोठे उपयुक्त आहेत, कारण ते सर्प मारतात; आणि शक्य असतं तर नुसते सर्प खाऊनच ते राहिले असते. साप दिसला रे दिसला कीं याच्या तडाक्यातून तो सहसा सुटायचा म्हणून नाहीं. इतकं शत्रुत्व आहे याचं सर्पांशीं. पायाच्या एका सपाट्यातच ठार करतात त्याना ते."

"पुष्कळ आहेत का हो साप इकडे?" विल्यमने विचारलें..

"हो, आणि भयंकर विषारी; म्हणूनच या पक्षाचा इतका उपयोग आहे." सीग्रेव्ह म्हणाले. "विधात्याची सूज्ञ योजना आहे ही. कोणत्याही दुष्ट प्राण्याची बेसुमार वाढ होत नाहीं यामुळे. जिथे असले प्राणी जास्त, तिथे त्याचे शत्रु तयार आहेत त्याची संख्या कमी करायला. इथे सर्प आहेत म्हणून हे सेक्रेटरी पक्षी इथे उत्पन्न केले. आपल्या इंग्लंडमध्ये याचा काहीं उपयोग नाहीं."

"पण काहीं प्राणी फारच मोठे नि भयंकर असतात हत्ती नि सिंहासारखे. त्याना कसे मारणार?" विल्यम म्हणाला.

"खरं आहे. पण या मोठ्या प्राण्याची वाढ झपाट्याने होत नाहीं. हत्तीला दोन किंवा तीन वर्षांनीं पोर होतं; पण आपले ससे पहा किती झपाट्याने वाढतात ते. असं आपण जर नीट सर्व सृष्टीचं निरीक्षण केलं तर आपल्याला असं आढळेल, कीं कोणत्या तरी एका कुशल अज्ञात हातानें सृष्टींतला हा तोल नीट सांभाळला आहे. आणि उत्पन्नापेक्षा जास्त तोंडं सहसा उत्पन्न केलेलीं आपल्याला आढळणार नाहींत. आता एखादेवेळीं काहीं विशिष्ट परिस्थितीमुळें हा तोल बिघडेल, नाहीं असं नाहीं; पण तो अपवाद, नियम नव्हे."

हा वेळ पर्यंत ते सिंहाच्या गुहेजवळ येऊन पोंचले होते. सभोवार दगडी भिंत असलेली ती एक खूप मोठी जागा होती. आत पहाण्यासाठीं म्हणून एकच खिडकी त्या भिंतीला लोखंडी भक्कम गज मारून

बसवली होती पण त्या गजातून वनराजाचा पंजा मात्र बाहेर येणं शक्य होत, म्हणून प्रेक्षकांनी फार जवळ जाऊं नये अशी सूचना त्यांना मिळाली होती. मोठ सुंदर दृश्य होत ते. आत आठ दहा भव्य प्राणी इतस्ततः स्वैरपणें पसरले होते. त्यांच्याकडे कुतूहलानें पहात असलेल्या प्रेक्षकाकडे ते क्वचितच दृष्टिक्षेप करीत; —स्वस्थपणे उन्हात आराम करीत आणि आपल्या गोंडेदार शेपट्या मागे पुढे हलवीत ते पडले होते. विल्यम नि टॉमी यानीं खिडकीपासून दूर उभे राहूनच मोठ्या अदबीने त्या वनराजाचे निरीक्षण केले. टॉमीचा आश्चर्यानें नि भीतीने आ पसरला होता पण जरा वेळाने त्याची भीति दूर पळाली. त्याच्या-बरोबर असलेला गृहस्थ सांगत असलेल्या गोष्टीकडे सर्वांच लक्ष वेधल होत. त्याचा फायदा घेऊन टॉमी खिडकीच्या जरा अधिक जवळ हळूच सरकला होता. आतल्या सुमल्या दृश्यानें त्याच समाधान होत नव्हत. त्याला त्या प्राण्यानीं हालचाल करायला हवी होती. खिडकी जवळच एक तीन वर्षांचा तरणाबांड सिंह ऐसपैस पसरला होता. त्याच्या आंगावर टॉमीनें एक दगड मारला. त्या सिंहाने कांहीहि हाल-चाल न करता टॉमीकडे सुमती नजर लावली म्हणून मग टॉमीचा धीर चेपत जाऊन तो खिडकीच्या जवळ जवळ सरकत आणखीच खडे मारूं लागला.

पण मग एकदम त्या तरुण वनराजानें एक भयंकर गर्जना करून त्या खिडकीकडे इतक्या प्रचंड वेगानें झेप घेतली कीं ते गज जर जरा कमताकद असते तर तो केव्हाच बाहेर पडला असता. पण आता ते नुसते हादरले आणि वरला थोडा चुना पण खालीं कोसळला. टॉमीने एकदम किंकाळी फोडली आणि त्याच्या सुदैवाने तो मागे पाठीकडे पडला आणि त्याने दोन तीन गोलांट्या खाल्या; नाहींतर त्या पंजाच्या तडाक्यातच तो सापडला असता. कॅ. ऑसबोर्न आणि सीग्रेव्ह धावत

येऊन त्यांनीं टॉमीला वर उचलला. तो भीतीनें अजूनहि किंचाळत होता आणि तिकडे ते वनराज रागाने आपली शेपटी आपटीत नि आपले ते भयंकर सुळे दाखवीत गुरगुरत उभे होते.

" घरीं, घरीं चला पपा आता, " भीतीनें गर्भगळीत झालेला टॉमी सांगत होता.

" तूं काय केलस रे टॉमी ! " कॅ. ऑसबोर्ननीं विचारले.

" आता नाहीं मी दगड मारणार मि.लायन; खरंच नाहीं मारणार!" भयभीत नजरेनें सिंहाकडे पहात टॉमी ओरडत होता.

त्याच्या वडीलानीं त्याला रागें भरत मग जरा शांत केलें पण त्या पिंजऱ्यापासून खूप लांब जाईपर्यंत त्याची भीति कांहीं कमी झाली नाहीं. आणि मग इतर प्राणी पहात ते हिंडत असता तो खूप दूर उभा राहूनच त्या वन्य पशूचें दर्शन घेत होता. एका रुंद शेपटाच्या मेंढीच्या जवळ जायला सुद्धा तो तयार होईना, इतकी धास्ती त्यानें घेतली होती त्या दिवशीं.

---

## : : ३ : :

दुसरे दिवशीं सकाळीं ताज्यापाण्याचा व अन्नाचा भरपूर पुरवठा करून घेतल्यावर पॅसिफिकने नांगर उचलून आपलीं सर्व शिडे मोकळीं केलीं. समुद्र अतिशय शांत होता आणि वारा अनुकूल वहात असल्यानें पुढले कांही दिवस त्यांचा प्रवास मोठ्या मजेत आणि वेगानें चालला होता. पण हें फार दिवस टिकलं नाहीं आणि वारा जवळ जवळ तीन चार दिवस अजीबात पडला. समोर पसरलेला तो अथांग जलाशय शांत होता. एकहि मोठी लाट त्यावरून उसळत नव्हती, वाऱ्याची एकादी झुळूकहि वहात नव्हती आणि सर्व सृष्टि जणु विश्रांति घेत होती. मधूनच एखादा अलबॅट्रॉस पक्षी अंतराळांत तरंगतांना दिसे आणि संथपणें तरंगत तरंगत त्यांच्याकडे फेकलेल्या अन्नाचे तुकडे मधेंच झेंप घेऊन तो उचलून घेई.

"हा कोण हो मोठा पक्षी रेडी ?" विल्यमनें विचारलें.

"हा अलबॅट्रॉस; हा सर्वांत मोठा समुद्रपक्षी बरं का. याचे पंख खूप लांब असतात. पंखांच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत त्यांची लांबी आकरा फूट असते. आपले हे पंख पसरून हे पक्षी स्वस्थ झोप देखील घेतात वर, असं म्हणतात. केपच्या उत्तरेकडे हे फारसे नाहीं दिसत."

"पपा, सगळयाच पक्षांना कां नाहीं हो पोहता येत ?" आपल्या वडीलांकडे वळून विल्यमनें विचारलें. मागे एकदां टॉमीनें आपल्या कोंबड्या त्या डबक्याकडे पिटाळल्या होत्या, तुम्हाला आठवतं आहे ? तेव्हां त्यांचे पंख भिजले आणि त्या नुसत्या फडफड करूं लागल्या नी

त्यांतल्या एक दोन बुडल्या देखील. मग हे समुद्रपक्षी कसे तरंगतात इतका वेळ पाण्यावर ?"

"या जलपक्षांच्या पखांना एक प्रकारचं तेल असतं म्हणून त्यांचे पंख ओले होत नाहींत. तूं बदकांना आपल्या चोंचीनें पख साफ सूफ करतांना नाहीं पाहिलींस ? आपल्या पिसांवर तीं हें तेल पसरीत असतात."

"मोठं चमत्कारिकच आहे !"

"अंहं, चमत्कारिक नव्हे विल्यम. अरे परमेश्वराची योजना आहे ही. असल्या लहान प्राण्यांच्या बाबतींत सुद्धा कशी सोय त्यानें केली आहे पहा—तर, काय चमत्कार आहे, असं म्हण !"

"खरं आहे तुमचं म्हणणं," रेडी म्हणाले. "तरी सुद्धा मोठी माणसं देखील असंच बोलत असतात पहा."

मग चौथे दिवशीं बॅरॉमीटर इतका खालीं गेला कीं कॅप्टननें आता सपाटून वादळ होणार म्हणून बर्तवलं आणि त्याला तोंड देण्यासाठीं जारीनें तयारी सुरू केली. कारण असा एखाद्याच ठिकाणीं हवेचा दाब जर विलक्षण कमी झाला तर अधिक दाबाच्या बाजूनें हवा तिथे वेगानें घुसू पहाते आणि वादळ सुटतं. आणि तसंच झालं. मध्यरात्रींच्या सुमारास आकाशांत ढग वेगानें गोळा होऊं लागले आणि त्यांच्या जणुं एकावर एक अशा राशी जमा होऊं लागल्या आणि त्यांच्या पोटांतून विजेचा चमचमाट चौफेर सुरू झाला; वारा सोसाट्याचा सुटला आणि मग परत शांत झाला.

"रेडी, वाऱ्याचा रागरंग काय दिसतो तुम्हांला ?" कॅप्टन ऑसबोर्ननें विचारलें.

"खरं सांगायचं कॅप्टन साहेब तर एकाच दिशेनें तो फार काळ स्थिर राहील्स काही दिसत नाहीं. आधीं कदाचित उत्तरेकडचा

सुटेल, पण लौकरच तो दिशा बदलील आणि चागला सोसाट्याने वाहील तो."

"तुम्हाला काय वाटतं मॅकिंटॉश ?"

"मला वाटतं एकाच दिशेनें वहात राहील तो जोरात. म्हणून बाजूचे शटर्स बंद केले लौकर तर बरे."

जरा वेळानें मग कॅप्टन नी रेडी दोघेच डेकवर राहिल्यावर रेडी म्हणाला: "मॅकिंटॉशच मत चुकीच आहे कॅप्टनसाहेब. दुसरीं माणस होतीं मघाशीं म्हणून बोललो नाहीं मी. पण मला तर नक्की अस वाटत कीं चागलच तुफान आता होत घातल आहे. या बाजूला मी अनेक वेळा सफरी केल्या आहेत, हें तुम्हाला पण माहीत आहे. या गेल्या तीन दिवसाच्या शातेतत नी या वातावरणात मला कसला तरी चमत्कारीक वास येतो आहे आणि आत्ता हा जो वारा वाहतो आहे, त्यावरून तुफानी वारा वाहणार अस मला नक्कीच वाटतं आहे—आणि सर्वांत वाईट म्हणजे हा झंझावात टिकणार पण पुष्कळ दिवस. मी दोन चार दिवस नीट निरीक्षण करतो आहें. आणि हे समुद्रावर वावरणारे पक्षी, याच ज्ञान अचूक असत या बाबतींत; याच्यावरून मला अस नक्की वाटतं कीं आजची ही शातता ही वादळापूर्वीचीच आहे!"

"माझंहि तसच मत आहे रेडी. हे नाळीवरलं लहान शीड जरा घट्ट करा आणि ती शीडाची दाडी खाली घ्या. मी जरा पुढे होतों."

त्यांची सर्व तयारी पुरी झाली नाहीं तोच वायव्येकडून वाऱ्याचे तुफानी झोत वाहूं लागले, लाटा उंच उसळूं लागल्या आणि डोक्यावरलीं सर्व शीडं वारा भरून ताठ होऊन गलबत अतिशय वेगाने पळूं लागलं. सुकाणू धरण्यासाठीं तीन तीन लोकाना उभ रहाव लागत होतं इतका वेगानें मौजा चहूंकडून उसळत होता. आणि [illegible]

असल्यानें विश्रांतीसाठीं सुद्धा एकहि खलाशी जागा सोडून खालीं जाऊं शकत नव्हता. तीनच्या सुमारास वारा जरा कमी झाला, पण जणुं काय त्या विश्रांतीनें ताजातवाना होऊन रेडीनीं कल्पना केल्याप्रमाणें दिशा पालटून तो घोंघाऊं लागला. पुढील बाजूचीं दोन शिडें दोऱ्या तुटून पार लांब फेंकलीं गेलीं. वर आकाश काळंकुट्ट झालं होत आणि सभों-वार उसळत्या फुटऱ्या लाटांचा एक प्रचंड कटाहच उत्पन्न झाला होता. पुढलीं शिडें फाटून गेल्यामुळें जहाजाची दिशा पालटावी लागली आणि हें चालू असतांच एका प्रचंड लाटेनें एक खलाशी आपल्या पोटात कायमचाच गडप केला. त्याला वांचविण्याचे सर्व प्रयत्न निष्फळ ठरले.

"किती वेळ चालणार हे आतां?" ऑसबोर्न पुटपुटले.

"काहीं कळत नाहीं. पण वरची ढगाची ही धावपळ काहीं बरी दिसत नाहीं मला. ती दोन ढगं पहा कशीं—"

पण त्याचं वाक्य पुरं होण्यापूर्वींच वर आकाशांत वीजेचा भयानक कडकडाट होऊन, जहाज एकदम पुढे कललें आणि एक किंकाळी वर आकाशात उठली. सर्वजण सावरून नीट पहातात तों पुढील नाळीकडील मुख्य डोलकाठी वीज पडून दुभग होऊन पेटून आगीचा एकदम लोळ उठला होता.

पण सुदैवानें वर उंच उसळत असलेल्या लाटांच्या सततच्या माऱ्या-मुळे आग लौकरच विझली. नाहींतर सबंध जहाज काहीं वेळांत अग्नीच्या भक्षस्थानीं पडलें असतें. पण आतां डोलकाठी तुटल्यामुळें आणि लाटाच्या तुफानी माऱ्यामुळें जहाज सारखं हेंदकाळत होतं. रेडीनें दोन खलाशांना सुकाणूं सभाळण्यास सांगून नि इतरांना पुढें घेऊन कुऱ्हा-डींच्या साहाय्यानें तीं तुटलेली अवजारें नि डोलकाठ्या तोडून मोकळ्या केल्या. एक तासाच्या खटपटीनंतर त्याना आपलं काम पुरं करतां

आलं आणि मग व आणखी प्राणहानी झाली आहे की काय, याचा तपास त्यांना करतां आला. वीज पडून आणि डोलकाठी मोडून पडल्यामुळें चार खलाशांचा बळी घेतला होता आणि आतां फक्त कॅप्टन, दोन मेट्स आणि आठ खलाशीच काय ते जहाजावर शिल्लक उरले होते.

## : : ४ : :

आज वादळाचा तिसरा दिवस होता. खलाशी आपल्या प्रयत्नांची शिकस्त करीत होते. स्वतःच्या प्रयत्नानी आपली सुटका करण्याची शक्यता असेतोंपर्यंत खलाशी सहसा निराश होत नाहींत. पण आतां तिसरा दिवस उजाडला होता तरी तुफानाचा जोर किंचितहि कमी झाला नव्हता. आणि लाटांच्या तडाक्यामुळे जहाजहि खूपच खिळ खिळं झालं होतं आणि वादळाचा जोर जर कमी झाला नाहीं तर जहाज तग धरणार नाहीं अशी भीति सर्वानाच उत्पन्न झाली होती.

कॅप्टनच्या शिरावर तर मोठीच जबाबदारी होती. जहाज, त्यांतील मौल्यवान माल आणि मानवी जीव हीं सर्व सुरक्षित ठेवण्याची जबा-बदारी त्यांचीच होती आणि त्या जबाबदारीच्या जाणीवेचा परिणाम त्याच्या चेहेऱ्यावर आज स्पष्टपणे दिसत होता.

त्या तुफानी वाऱ्यापुढें तें जहाज सारी रात्र पळतच होते. पण सकाळीं त्याचा जोर जरा कमी झाला आणि डेकवरील सगळी नास-धूस साफ करायला खलाशाना थोडीतरी उसंत मिळाली होती. कॅप्टनच्या देखरेखीखालीं साफसुफीचे आणि तात्पुरत्या दुरुस्तीचें काम चालू असताच सीग्रेव्ह नि विल्यम वर डेकवर आले.

" बघ विल्यम, सृष्टीच्या सामर्थ्यापुढे आपलं माणसाचं सामर्थ्य किती क्षुद्र आहे तें बघ ! " भयचकित नजरेनें आपल्या सभोंवार पहात असलेल्या विल्यमला सीग्रेव्ह म्हणाले.

" बघ, विल्यम नीट बघ; " रेडी म्हणाले. " तुला ती बायबलां-तली ओळ आठवते कायरे ?—मला आठवते आहे चांगली, कारण मी पुष्कळ वेळां वाचली आहे ती आणि त्याचा अनुभवहि घेतला

आहे. 'जहाजांतून समुद्रावर संचार करणाऱ्याना परमेश्वराची सृष्टि आणि त्याने उत्पन्न केलेली सागरी किमया ही नीट पाहता येते.'"

"पण पपा, आपण जायचं कसं आता सिडनेला, कारण डोल-काटी नी शिड तर गेली निघून?"

"का बाबा; आपल्याकडून होईल तो प्रयत्न तर आपण केलाच पाहिजे. आम्हा खलाशाना ही नेहमींचीच शिकवण असते. आज संध्याकाळपर्यंत बघ काहीतरी शिड आम्ही उभीं करतों कीं नाहीं ते. आणि त्या प्रभूची इच्छा असली तर आपण सिडनेला पोंचूच. पण आपले काही खलाशी या पाण्याने आपल्या पोटात घेतले हे आहेका तुला माहीत? आमच्यातले पाच लोक गेले वाहून काल. जीवन आणि मृत्यु हीं नेहमींच अशीं हातात हात घालून वावरत असतात बघ. अशीं अनेक तरणी माणस अकालीं मृत्युमुखीं पडलेलीं मी पाहिलीं आहेत. पण त्या प्रभूनें मला अजून जीवदान दिलं आहे आणि आपलं आयुष्य सत्कारणी लावण्याची संधी पण दिली आहे."

"दुसरा कोणतातरी धंदा शिल्लक असेपर्यंत मी काही आपल्या मुलाना खलाशी व्हायची परवानगी देणार नाहीं, रेडी."

"एकेकाळीं मला असं वाटे कीं, मुलाच्या इच्छेला पालकानी विरोध करूं नये म्हणून. पण आता मात्र अस वाटत कीं तो पालकाचा अधिकारच आहे. कारण मुलाना त्या वयात बर वाईट कळण्याची काय अक्कल असते? प्रत्येक तल्लख बच्च्याला समुद्रावरील जीवन हवस वाटतं. पण ते काहीं खरं नव्हे. त्याला शाळा, नी घरचा कामच पुष्कळ वेळा खरोखरी नकोसा झालेला असतो. आणि म्हणूनच ते तो मार्ग स्वीकारतात. आपण स्वतंत्र होऊ अस त्यांना वाटत असतं. पण ती त्याची चूक असते. आरंभींची पुष्कळ वर्षं तरी हें खलाशी जीवन म्हणजे गुलमाचंच जीवन असत. घरच्या शिक्षेपेक्षा इकडे आमच्या

शिक्षा जास्तच कठोर असतात आणि त्यानीं पाठ फिरवलेल्या घरांतलं प्रेम आणि माया तर त्याला कधींच बघायला देखील मिळत नाहींत. अनेक जण मग पस्तावतात आणि तशी संधी मिळाली तर ते घरीं परत जायला एका पायावर तयार असतात; आणि लाजेनें जर ते अडखळले नसते तर आपल्या वडीलाची त्यानीं सरळ क्षमाहि मागितली असती."

× × × ×

इकडे वर डेकवर सर्व लोक कामाला जुडले होते. सुतार डोलकाठीची दुरुस्ती करूं पहात होता तर कांही लोक जहाजाला पडलेल्या एका भोकातून आत येणारं पाणी उपशीत होते. पण वादळाचा जोर रेडीच्या म्हणण्याप्रमाणें परत वाढला होता आणि त्याचबरोबर पाणी आंत येण्याचा वेगहि वाढतच होता. आणि नेमका याच वेळीं दुर्दैवानें नाळीवर उभा असलेला कॅप्टन ऑसबोर्न डोलकाठीच्या खालीं पडणाऱ्या तुकड्याचा फटका डोक्यात बसून बेशुद्ध होऊन खालीं पडला. कॅप्टन बद्दल सर्व खलाशाना अत्यंत आदर असल्यामुळें सर्व कामं आत्तापर्यंत सुरळीत चाललीं होतीं. पण आतां त्याच्या गैर हजेरींत मॅकिंटॉश त्यांचा नावडता असल्याने जहाजावर बजबजपुरी माजली. पाण्याचा आत येण्याचा वेगहि कमी झाला नव्हता आणि पपावर काम करणारे लोक आता थकून जाण्याच्या बेतांत आले होते. अशा स्थितींत जहाजावर राहणं जास्तजास्तच धोक्याचं होत होतं म्हणून जहाजावरून निघून आपला जीव कसा बचावतां येईल याचाच सारे खलाशी विचार करीत होते.

"आपल्याजवळ एक चागली बोट आहे, नाहीं का ?" मॅकिंटॉश म्हणत होता. "मला वाटतं आपण त्या बोटींतून आपला जीव वाचवूं शकूं. प्रवाळाच्या बेटांच्या अगदीं जवळपासच आपण आत्तां आहों असं

मला वाटतं. तर बरोबर आवश्यक तेवढ खायचं प्यायच सामान घेऊन आपण आपल्याला वाचवूं शकूं. तुम्हाला काय वाटतं रेडी, बरोबर आहे माझं म्हणणं ? ”

“ तुमच म्हणणं बरोबर आहे, मॅकिंटॉश; पण केबिनमधल्या त्या कुटुंबाच नी त्यांच्या मुलाबाळांच काय करायच ? आणि कॅप्टनची काय वाट ? काय विचार आहे तुमचा ? ”

“ कॅप्टनला आपण घेऊन जायचं; ” सर्व खलाशी ओरडले.

“ आणि तें सीग्रेव्ह कुटुंब ? ”

“ वाईट आहे मोठ तें, अगदीं कठोरपणाचं आहे; पण आपण साऱ्यांनाच नाहीं वाचवूं शकत. ”

“ बरोबर आहे तुमच म्हणण, मला पटल. ” मॅकिंटॉश म्हणाला. “ सबसे जीव प्यारा ! काय—असच ना ? ”

सर्व खलाशांनीं एकमतानें होय असं उत्तर दिलं आणि त्याच्याशीं वादविवाद करण व्यर्थ आहे, हें रेडीनें पण ओळखलं. ते सर्वजण मग आपली बोट सज्ज करण्याच्या कामाला लागले. अर्ध्यापाऊण तासांतच त्यांची सर्व तयारी पुरी झाली आणि त्याच वेळीं सीग्रेव्ह वर डेकवर आले आणि त्यानीं सभोंवार दृष्टि टाकली. होडी पाण्यात लोटली आहे, आत सर्व सामान चढवलेलं दिसतं आहे आणि कॅप्टनच्या संज्ञाशून्य देहाजवळ रेडी बसले आहेत, अशा देखावा त्याच्या नजरेस पडला.

“ हें काय चाललं आहे रेडी ? ” त्यानीं विचारलं. “ गलबत सोडून चालले आहेत काय हे ? आणि यानीं कॅप्टनला ठार मारलं कीं काय ? ”

“ नाहीं, तेवढं नाहीं केलं त्यानीं मि. सीग्रेव्ह; डोलकाठीच्या फटकाऱ्यानें बेशुद्ध पडले आहेत कॅप्टन. पण दुसऱ्या गोष्टीविषयीं म्हणाल

तर तो निश्चय ठरला आहे त्याचा. ती पाहिलीत बोट जय्यत तयार आहे."

"पण माझी पत्नी कांहीं जाऊ शकत नाहीं--ती हलू पण नाहीं शकत--फारच नादुरुस्त आहे आज ती!"

"तुम्हांला कळलं नाहीं नीट, मि. सीग्रेव्ह; तुम्हाला, तुमच्या पत्नीला किंवा मुलाना कोणालाच आपल्याबरोबर न्यायची इच्छा नाहीं आहे त्यांची."

"काय! आम्हाला असच मृत्युमुखात ढकलणार? दयाघन परमेश्वरा! केवढ क्रौर्य हे--काय रानटी पणा हा!"

"क्रौर्य खरं, पण सृष्टीचा नियम आहे हा, मि. सीग्रेव्ह जीवाबावरचा प्रसग आला, कीं मग कोणी कोणाचा नाहीं, जो तो स्वतः पुरता, कारण जीवन हे मोठें गोड आहे. या बोटींत जर एवढी जागा नसती तर ते एकमेकांशीं सुद्धा असेच वागले असते. असच जगात घडत असत नेहमीं. अनेक वेळा मी आपल्या डोळयानीं पाहिल आहे हे;" रेडी गंभीरपणे म्हणाले.

"दुर्दैव, दुर्दैव! पण मी पाहतो त्याना काहीं मागून" सीग्रेव्ह म्हणाले. "त्यानाही काहीं हृदय आहे कीं नाहीं निदान मॅकिंटॉश तरी त्याना समजावतील. तुम्हाला नाहीं वाटत रेडी?"

"खरं सांगायचं मि सीग्रेव्ह, तर त्याचच अंतःकरण सर्वांत अत्यंत कठोर आहे आणि इतर कोणाशीं बोलण्यात काही अर्थ नाही. आणि तुम्हालाहि त्याना तसा फारसा दोष देता येणार नाहीं; ती बोट लहान आहे, आणि आवश्यक अन्न आत घेतल्यावर मग अधिक माणसाना आत जागा नाही--ही वस्तुस्थिति आहे. म्हणून तुम्हाला नि तुमच्या सर्व माणसाना जर आत घेतल तर सर्वांचाच विनाश ठेवलेला आहे. असं जर नसत तर मीहि प्रयत्न केला असता त्याच मन वळवण्याचा: पण ते व्यर्थ आहे."

"मग काय करायचं तर, रेडी?"

"त्या दयाघनावरच सोपवू या सारं आपण; त्याच्या मर्जीला येईल तसं करील तो."

"पण तुम्ही नाहीं जात त्यांच्याबरोबर?"

"नाही, मि. सीग्रेव्ह. हा गेला तासभर विचार करतो आहे मी त्याचा, आणि इथेच तुमच्या बरोबर राहायचं ठरवलं आहे मी. कॅप्टनला नेताहेत ते, जगले तर जगतील ते. मलाहि न्यायला तयार आहेत ते, पण मी मात्र इथेंच राहणार आहे."

"कशाला, उघड्या डोळ्यानीं मृत्यूला कवटाळायला?" सीग्रेव्हनीं आश्चर्यानें चकित होऊन विचारलें.

"जशी प्रभूची इच्छा असेल तशी, मि. सीग्रेव्ह! मी तर म्हातारा आहे, आणि मला त्याचं काहीं वाटत नाहीं. आता एक दोन वर्षं आधीं गेलं काय नि नाही काय, मला सारखंच. पण हा कोवळा मोहोर मात्र अकालीं करपून गळावा, असं मला वाटत नाहीं. मी राहिलों तर माझा उपयोग होईल तुम्हाला, कारण एक अनुभवी वृद्ध दर्यावर्दी आहे मी. आणि काय केलं असता जगणं शक्य आहे, या माहितीच्याच केवळ अभावीं तुम्हीं सर्वांनीं मरून जावं, असं मला वाटत नाहीं. ती माहिती तुम्हाला मी देऊं शकेन. पण हे आलेच पहा खलाशी—सगळी तयारी झालेली दिसते त्यांची आणि आता ते या ऑसबोर्नना घेऊन जातील. गरीब बापडे!"

त्या आलेल्या खलाशांनी त्या अजूनहि पूर्ण बेशुद्धीत असलेल्या कॅप्टनचा देह वर उचलला. जाता जाता त्यातल्या एकाने रेडींना हाक मारली. "चला रेडी, आता वेळ नका घालवूं."

"जा तू, रौले, मी इथेच राहणार आहे जहाजावर," रेडींनीं उत्तर केलें. "तुमचा प्रवास सुखाचा होवो. मि. मॅकिंटॉश, एक

वचन हवं आहे तुमचं मला; तुम्ही द्याल तें असं वाटतं मला. कांहीं दुसरं तिसरं नाहीं, ईशकृपेनें तुम्ही जर सर्व वाचलात, तर या मागें राहिलेल्या लोकांना तुम्हीं विसरूं नका; आणि या बेटाच्या आसपास त्यांचा शोध करण्याची तेवढी खटपट करा."

"असा वेडेपणा नका करू, रेडी! चला आमच्या बरोबर," मॅकिंटॉश त्यांना म्हणाला.

"मी इथेच थांबणार आहे, मि. मॅकिंटॉश. फक्त मी मागतों तेवढं वचन द्या मला. मि. सीग्रेव्हच्या मित्रमंडळींना ही हकीगत कळवा आणि परमेश्वराने आम्हांला जर वांचवल तर आमचा शोध कुठे करायचा तें पण त्याना सांगा. देता एवढं मला वचन?"

"होय, तुमचा राहाण्याचा निश्चयच ठरला असला तर देतों वचन. पण,"—त्याच्या कानाजवळ तोंड नेऊन मॅकिंटॉश पुढें म्हणाला, "पण वेडेपणा आहे हा तुमचा; चला, उठा रेडी!"

"गुड–बाय, मि. मॅकिंटॉश!" रेडी म्हणाले, आणि त्यांनीं आपला हात पुढे केला. "तुम्ही आपल वचन पाळणार?"

मग मॅकिंटॉश आणि इतर सर्व खलाशी यांनीं आपल्याकडून रेडींच मन वळविण्याचा खूप प्रयत्न करूनहि रेडी त्याना संमती देईनात म्हणून त्यांनीं मग होडी जहाजापासून दूर लोटली आणि त्यांनीं ईशान्येचा मार्ग पकडला.

## : : ५ : :

बोट जहाजापासून दूर होऊन आपला मार्गक्रमण करूं लागल्यावर वृद्ध रेडी आपले हात छातीवर आडवे धरून त्या बोटीकडे शातपणें पहात काहीं वेळ उभे होते. सीग्रेव्हहि त्याच्या बाजूला तसेच स्तब्ध उभे होते. त्याचं हृदय भरून आल होतं. बोट जसजशी दूर निघून जात होती तसतशी त्याच्या हृदयातली उरली सुरली आशाहि दूर निघून नाहींशी होत होती. ते स्वतः, त्याची पत्नी नि मुलें बाळें आणि तो धीर गंभीर वृद्ध दर्यावर्दी, हीं सारींच आता मृत्यूच्या दाराशीं उभीं होतीं. त्याच्या चेहेऱ्यावर दारुण निराशेची दाट छाया पसरली होती आणि तोंडातून शब्द बाहेर फुटत नव्हता. अखेरीस काहीं वेळाने रेडी त्याच्याकडे वळले.

" ते वांचणार आणि आपण सारे मरणार, असं त्याना वाटतं आहे मि. सीग्रेव्ह; पण त्या सर्वश्रेष्ठ नियामक शक्तीचं अस्तित्व ते विसरताहेत बेटे. तिनें ठरवायचं आहे तें. त्या शक्तीपुढें आपले मानवाचे प्रयत्न म्हणजे केवळ पालापाचोळा आहेत. "

" खर आहे; " मंद स्वरांत सीग्रेव्ह म्हणाले. " पण या बुडत्या गलबतावर कसली शक्यता आहे ?—आपल्या बरोबर हे किती दुबळे-प्राणी आहेत पहा बरं—मला तरी कांहीं आशा नाहीं दिसत. "

" आपण शिकस्तीचा प्रयत्न करावयाचा आहे, आणि बाकीचं त्याच्या इच्छेवरच सोंपवायचं आहे; " सुकाणूच्या मदतीनें जहाज वाऱ्याकडे फिरवून रेडीनीं उत्तर दिलें. आणि निराशेनें मटकन खालीं बसलेल्या सीग्रेव्हच्या खांद्यावर थोपटीत नी त्याना धीर देत ते पुढे म्हणाले, " असे निराश नका होऊं मि. सीग्रेव्ह. मला जर कांहींच

आशा दिसली नसती तर मी तस स्पष्ट म्हटलं असतं. पण काळयाकुट्ट अंधारात सुद्धां आशेचा, अधुक का होईना, पण किरण असतोच असतो—आणि ज्याच्या इच्छे शिवाय एकाद चिमुकल पाखरूं सुद्धां खालीं मरून पडत नाहीं, त्या सर्वेश्वरावर आपण विश्वास हा ठेवलाच पाहिजे! पण आता एक अनुभवी खलाशी या नात्याने, आपल्या शक्याशक्यते विषयीं मी काय सांगतो, ते ऐका. या वादळामुळें आपल्या जहाजात जवळजवळ निम्याने पाणी शिरल आहे. तरी सुद्धा आता वादळ शांत झाल आहे म्हणून पाणी त्या पाहिल्या वेगाने काहीं आत शिरणार नाहीं अस मला वाटत. तर देव दयेने आहे हीच हवा जर टिकली तर जहाज काही लौकर बुडणार नाही. आणि आता आपण या प्रवाळाच्या बेटाच्या जवळ असल्यामुळे आपल जहाज एखाद्या बेटाजवळ नेण काहीं अशक्य नाहीं—नव्हे, जवळ घेऊन जाणं आपल्याला खास शक्य आहे. मी बोटींत जायच नाकारलं तेव्हा याचा विचार मी केला आहे. आणि मी जर मागे तुमच्या बरोबर राहिलो नसतो, तर जीवबाचविण्याची शक्यता असून सुद्धा तुम्हाला ते कधीं शक्य झाल नसत. म्हणून या अडचणीच्या बिकट प्रसंगी परमेश्वराच्या साहाय्याने तुम्हाला शक्य ती मदत करावी या हेतूनेच मी मागे राहिलों आहें. तर आता तुम्ही खालीं जाऊन हवा चांगली निवळली आहे आणि आपण नीट सुरक्षितपणें कुठेतरी जाऊन उतरू असा आपल्या मंडळीला धीर द्या. इतर लोक आपल्याला सोडून गेले आहेत हे जर त्याना माहीत नसेल तर तें त्याना सांगू नका. शक्यतर त्याना अज्ञानातच राहूं दे काही वेळ. पण विल्यमला सांगायला मात्र काहीं हरकत नाहीं, तर त्याला द्या इकडे वर पाठवून. मी सांगतो त्याला सार काही."

"काय कराव आणि तुमचे आभार कसे मानावे, रेडी—तुमच्या या स्वार्थत्यागाला काय नाव द्यावं तें मला समजत नाहीं. तुमचा

सल्ला उत्तम आहे, आणि मी तसाच वागेन ही खात्री बाळगा. आणि समोर आ पसरून उभ्या असलेल्या या मृत्यूच्या मुखातून जर आपण वाचलों तर माझी कृतज्ञता—— ”

“ त्याचा उल्लेख नका करूं मेहेरबानी करून. मी आता म्हातारा झालों आहे आणि माझ्या गरजा पण फारच थोड्या आहेत. आणि माझं आयुष्य पण तस फारस आता उपयोगाच नाहीं. परमेश्वरानें ठेवलेल्या परिस्थितीत मी माझं कर्तव्य करतों आहे, एवढच समाधान मला हव आहे. आणि सर्व जन्मभर संकटच अनुभवल्यानंतर आता मला काय मिळवायच आहे? आणि माझ्या मृत्यूची दखल घेणारं अस तरी या जगात माझं नात्यागोत्याचं आता कुणी असेलस मला वाटतहि नाहीं. ”

सीग्रेव्हनीं त्याचा हात कृतज्ञतेनें दाबला नि ते कांहींच उत्तर न देता खालीं गेले. त्यांची पत्नी अजून झोपलेलीच होती, आणि मुल सुद्धा आपआपल्या आथरूणात स्वस्थ पडलीं होतीं. जूनो नि विल्यम फक्त बसलेलीं होतीं.

विल्यम त्याना आलेले पाहून पुढे आला आणि हळूच म्हणाला: “ तुम्ही वर होतात म्हणून मी कॅबिनमधून हललो नाहीं. पण दूध घेऊन अजून इकडे कोणींच फिरकलं नाहीं; आणि आम्हालाहि काहीं खायला नाहीं मिळालं. ”

“ तू जा वर आता विल्यम; रेडींना काहीं सागायच आहे तुला. ”

वर गेल्यावर रेडीनीं त्याला सर्व परिस्थिति नीट समजावून सांगितली आणि आईला उगाच घाबरवून न सोडतां त्याला करता येईल तेवढी मदत त्यानें सीग्रेव्हना आता दिली पाहिजे, असंहि त्याला सागितलं. विल्यम आरंभीं जरा बावरला पण थोड्याच वेळांत

त्यानें स्वतःला सावरलें. "पण आतां आई जागी झाल्यावर मुलांचं खाणं झालं का, म्हणून तिने विचारल्यावर काय सांगूं?" म्हणून त्यानें विचारलें.

"मी तुला एकदा दाखवलं म्हणजे तूं सुद्धां काढशील दूध. आणि जहाज पण आता संथपणें जात असल्यानें मलाहि थोडा वेळ मिळेल खालीं यायला."

विल्यम आणि रेडी या दोघानीं मिळून मग त्याच्या खाण्याची तयारी केली. समुद्र आता अगदीं शांत होता आणि वाराहि संथ आणि अनुकूल असा वाहात असल्यानें जहाज तीन मैलाच्या वेगानें मार्ग कापीत चाललं होतं. वर नीलाकाशात स्वच्छ सूर्य प्रकाशत असल्यानें कालच्या वादळाची कसलीच खूण कुठें दिसत नव्हती. मिसेस सीग्रेव्ह अजूनहि शांतपणे झोंपल्या असल्याने त्याना त्रास होऊं नये म्हणून मुलाना आणि जूनोला घेऊन सीग्रेव्ह डेकवर आले. विल्यम खालींच आपल्या आईजवळ बसला. वर डेकवर आल्यानंतर जूनोनें आपल्या सभोंवार दृष्टि टाकली आणि वादळाने केलेल्या नुकसानीची तिला पूर्ण कल्पना आली. पण त्याचबरोबर वर खलाशा-पैकीं कोणीच न दिसल्यानें ती चकितच होऊन गेली. मग अर्थातच सीग्रेव्हनीं झालेल्या सर्व गोष्टींची तिला पूर्ण कल्पना आणून दिली आणि मिसेसनां हें कांहीं सांगायचं नाहीं असें तिला बजावलें. तिनें तें चटकन कबूल केलें. त्याच्यावरील संकटाची तिला पूर्ण कल्पना आली होती आणि तिनें चिमुकल्या आल्बर्टला पोटाशीं घट्ट कवटाळलें आणि तिच्या डोळयातून चार दोन अश्रु खालीं गालावर ओघळले. टॉमी नि कॅरोलिननीं सुद्धा ही अशी मोडतोड कशानें झाली आणि सारे खलाशी कुठे गेले आणि कप्तान साहेब कुठे आहेत म्हणून विचारलें.

"तें पहा तिकडे मि. सीग्रेव्ह," एका वहात येत असलेल्या समुद्र वेलीकडे बोट दाखवीत रेडी म्हणाले. "आतां तेवढ्यावरच नाहीं विसंबतां येणार, पण दुसऱ्याहि कांहीं खुणा नि चिन्हं दिसताहेत. ते लाटांवर तरंगत असलेले पक्षी पहा. ते जमिनीपासून फार लांब नाहीं जात. म्हणजे आता आपण कुठेसे आहोंत हे नकाशावरून बघायला कांहीं हरकत नाहीं. काय मजा आहे बाळपणाची! पहा, ते बाबालोक पहा कसे खेळताहेत बागडताहेत, त्याना आहे कां कांहीं आपल्या वरल्या सकटाची कल्पना. घरात असल्यासारखेच चालले आहेत त्यांचे खेळ. मला असं वाटतं कित्येक वेळीं—चमत्कारिक वाटेल तुम्हाला ते, पण—कीं हें असं लहानपणींच देवा घरीं जाणं बर, आणि आपण आईबापानीं त्याच्यासाठीं शोक करण हें स्वार्थीपणाचं आहे."

"कांहींसं खर," मुलाकडे पहात खिन्नपणें सीग्रेव्ह म्हणाले.

"आता बारा वाजले आहेत, तर खालीं जाऊन मी आपला अक्षांश शोधून काढतों आणि मग नकाशा आणतों वर."

सीग्रेव्ह आता एकटेच मागें राहिले. त्याचा कांहीं तरी विचार चालला होता; आणि तें स्वाभाविक होतं. त्यांचं जहाज मोडकळीस आल होत, सभोंवार अथांग सागर पसरला होता, खलाशी त्याना एकटेच टाकून गेले होते आणि त्यांची आजारी पत्नी नि लहान कच्चीं बच्चीं त्यांच्या मानेला बिलगलीं होतीं. आणि हे एकटेच मागें राहिलेले रेडी पण गेले असते आपल्याला सोडून तर? मग पूर्ण निराशा – मिट्ट अंधार! आणि आतां भविष्यात काय आहे? जास्तींत जास्त आशा म्हणजे एखाद्या बेटाचा आश्रय मिळणं, पण तें ओसाड असलं तर, किंवा त्यावर रानटी लोक असले तर—मग त्यांच्या हातून हाल हाल होऊन मृत्यु, नाहीं तर उपासमार! या विचारांनीं ते कांहीं काळ विषण्ण झाले. पण जरा वेळानें आतांपर्यंत संरक्षण केल्याबद्दल

देवाचे उपकारहि त्याच्या मनात उभे राहिले. "तुझीच इच्छा प्रभु–माझी नाहीं!" आणि मनातील इतर विचार मग नाहींसे होऊन येणाऱ्या कसोटीला धैर्यानें तोंड देण्याला त्याच्या मनाची तयारी झाली. नाहीं तरी, 'आहे नारायण जवळीच,' हा विचार मनाला केव्हाहि धीरच देतो.

इतक्यात हातात नकाशा घेऊन रेडी वर आले. एका अक्षांशावर त्यांनीं तावडी खूण केली होती आणि ते काहीं तरी सांगणार इतक्यात समोर पहात असलेले सीग्रेव्ह म्हणाले : "ते समोर काहीं तरी हवेंत तरंगल्यासारखं काहीं तरी दिसतं आहे, रेडी. ढग तर काहीं नाहींत तीं. तीं पहा माझ्या या बोटासमोर."

"हो, काहीं तरी दिसतं आहे खर," रेडी म्हणाले. "ती जमीन नाहीं आहे दिसत, पण त्यावरील झाडाच हे परावर्तित प्रतिबिंब दिसत आहे तुम्हाला. म्हणून अस वर तरंगल्यासारख दिसत आहे तें. नक्की तें बेटच असलं पाहिजे; पण खालून दुर्बीण आणतों हं माझी, म्हणजे कळेल निश्चितपणे."

"जमीनच आहे ती मि. सीग्रेव्ह," खालून आणलेली दुर्बीण डोळ्याला लावून रेडी म्हणाले—"होय, जमीनच," विचार करीत ते पुढे म्हणाले. "जरा आधीं दिसली असती तर; पण तरी सुद्धां देवाचे आभारच मानले पाहिजेत आपण."

"पण आतां वारा काहीं नाहीं फारसा."

"नसूं दे; तरी पण तो येईल अशी आशा करायला कांहीं हरकत नाहीं आपल्याला;" रेडी म्हणाले. "नाहींच आला, तरी आपण आपली शिकस्त करू. पण आतां मी सुकाणूं फिरवतों हं. नाहीं तर आपण भलतीकडेच जाऊं वाहवत. आणि आतां आणखी एक

सांगतों तुम्हांला कीं, पाणी जरी फारसं आत येत नसल तरी चोवीस तासापेक्षा काहीं आपलं जहाज वर राहीलसं काहीं मला वाटत नाहीं. मला वाटल होत त्यापेक्षा त्या बाजूनें धोका जास्ती आहे आपल्याला. पण आता जमीन दृष्टीच्या टप्यांत आली आहे आणि आपण सुरक्षितपणे जमीन गाठण्याची हमखास शक्यता दिसते आहे. म्हणून देवाचे प्रथम आभार मानले पाहिजेत आपण, ही तरी कृपाच आहे त्याची."

"तथास्तु; सत्य आहे तुमच म्हणणं."

रेडीनीं मग सुकाणु हातात धरून त्या बेटाच्या दिशेने सरळ नाळ धरली आणि त्याची कल्पना होती त्या पेक्षा ते बेट पुष्कळच जवळ होतं. आस्ते आस्ते वारा पण चागला जोराने वाहू लागला आणि जहाजाचा वेगहि खूप वाढला. आणि अजून पर्यंत वर आकाशात तरंगत असल्या प्रमाणे दिसणारीं झाडे आता जमीनीला लागल्या सारखीं दिसूं लागलीं आणि काहीं वेळानें तर नारळीची झाडी उघड्या डोळ्याना स्पष्टच दिसू लागली. रेडी मधूनच सुकाणु सीग्रेव्हच्या हातात देऊन नीट निरीक्षण करण्यासाठीं पुढे नाळीवर जात. तीन एक मैल अतर आता फक्त त्याना तोडायच होतं. रेडी परत सुकाणू जवळ येऊन म्हणाले, "आपला मार्ग मला नीट दिसतो आहे आता. या असल्या बेटात वाऱ्याच्या दिशेला पाणी खोल असत आणि खडकाळ भाग हा विरुद्ध दिशेला असतो. तर आपल्याला आधीं आत शिरण्यासाठीं नीट रस्ता पाहिला पाहिजे. म्हणजे आपण एकदा किनाऱ्याजवळ जाऊन पोंचलों आणि जहाज जरी खालीं बसल, तरी मग ते लाटानी दूर वाहवत जाणार नाहीं. कित्येक वेळा या बेटाचा किनारा भिंतीसारखा सरळ उच असतो आणि तीस चाळीस पुरुष सुद्धा पाणी खोल असत तिथे. पण आपल जहाज सुरक्षितपणें लावायची जागाहि दिसते आहे

मला. ती तीन झाड दिसताहेत का अगदीं किनाऱ्यालगत ? त्याच रोखानें आपल जहाज जायच आता. तर तुम्ही उभ रहा नाळीजवळ आणि तुमच्या हाताच्या खुणेने उजवी डावी मला दाखवा. मी सुकाणु धरून तस वळवीन जहाज; समजल ?"

"हो हो, समजलं रेडी," सीग्रेव्ह म्हणाले आणि ते पुढे नाळी-कडे जाऊन हातानें खुणा करून रेडींना वाट दाखवूं लागले. बेटा-जवळ जहाज येऊ लागतांच पाण्याचा रग बदलू लागला आणि तें पाहून रेडींच्या चेहऱ्यावर समाधान दिसू लागले. कारण त्याचा अर्थ त्याना वाटलं होतं त्या पेक्षा पाणी उथळ आहे असाच त्यांनीं केला. किनाऱ्यापासून तीन चारशे फूट आल्याबरोबर जहाज खालीं घासू लागलें—प्रवाळाच्या झाडाचे शेंडे जहाजाच्या घर्षणानें फुटत होते. कारण पाण्याखालीं त्याच जसं रानच माजलेलं असत—परत तें अधिक जोरात घासलें आणि मग एकदम धक्का देऊन त्यामुळे वर उसळलेल्या पाण्यानें थोडें अधिक पुढे जाऊन तें कायमचे खालीं खडकावर बसलें. रेडींनीं हातातील सुकाणूं सोडून जहाजाच्या चोंहो बाजूनीं खालीं डोकावून पाहिलें. जहाज खालच्या प्रवाळाच्या बैठकीवर घट्ट आसन ठोकून विसावलें होतें.

---

## : : ६ : :

" अजून पर्यंत तर सारं ठाकठीक आहे, " रेडी सीग्रेव्हना म्हणाले. " तर आतां प्रथम देवाचे आभार मानू या. "

आपली प्रार्थना सरवून ते वर उठताच विल्यम वर येऊन म्हणाला: " जहाजाच्या त्या घासण्याच्या आवाजानें आई उठली आहे आता; पण घाबरली आहे जराशी. तुम्हीं जाता खालीं ? "

" कुठं गेलां होतां तुम्हीं सारींजण; आणि गडबड कसली चालली आहे ? " सीग्रेव्ह खाली जाताच त्याच्या पत्नीनें विचारलें. " किती भयकर झाला तो आवाज, कसला कोण जाणें; मी तर घाबरूनच गेले आहे त्यानें. "

" तसं भ्यायला नको आहे आता. मोठच संकट टळल आहे म्हणायचं. पण आतां झोप मिळाल्यावर बरं वाटतं आहे ना चागल?"

" हो, चागलं बर वाटत आहे—पण काय झालं आहे तें सांगा पाहू मला आधीं ! "

" तुला झोप लागण्यापूर्वीं नी नतर पुष्कळच गोष्टी झाल्या आहेत; पण तुझ्या कानावर मुद्दामच घातलं नाहीं त्यांतल काही. पण आपण लौकरच आता किनाऱ्यावर पाय ठेऊं मला वाटतं—"

" किनाऱ्यावर—म्हणजे काय ? "

" होय, किनाऱ्यावर. पण अशी घाबरू नको आणि मी काय सांगतों तें शांतपणें ऐक आणि आत्तांपर्यंत सुरक्षित राहिल्याबद्दल देवाचे आभार पण मान. "

सीग्रेव्हनीं मग सर्व हकीगत आपल्या पत्नीच्या कानांवर घातली. तें सर्व ऐकून त्याची अगदीं घाबरगुंडी उडून त्या अश्रु ढाळू लागल्या.

पण सीग्रेव्हनीं त्यांना हळूहळू चुचकारून धीर देत देत शांत केलें. तेवढ्यात मुलाना घेऊन जूनो पण आत आली. त्यांना आत आलेलीं पाहून सीग्रेव्ह वर डेकवर आले.

" या; आपलं जहाज या खडकात आता कायमचच बैठक मारणार असं दिसत आहे मला; बरं का मि. सीग्रेव्ह. " रेडी म्हणाले. " आणि तुफान झाल्याशिवाय काही ते जागेवरून एक इंच भरहि हलणार नाहीं आणि तें सुद्धा तुकडे तुकडे होऊन. पण त्याची सध्या तर काही धास्ती नाहीं."

" पण आता किनाऱ्यावर उतरायच कस—आणि उतरल्यावर जगायच कस रेडी ? "

" मी केला आहे त्याचा विचार. पण आधीं तुम्ही नि विल्यम मला जरा हात लावा म्हणजे ही बारकी बोट आपण करू दुरुस्त. तेवढ सुतार काम येतं आहे मला. त्यावर मग आपण ती डाबरी ताडपत्री बसवूं घट्ट, कीं त्या बोटींतून आपल्याला किनाऱ्यावर येईल उतरता. "

" आणि मग उतरल्यानतर ? "

" मग काय हो, नारळी तर खूप दिसताहेत बेटावर. त्याच्या जोरावर जगू कीं आपण, आपलं अन्न संपल्यावर पाण्याचीच जरा काळजी वाटते आहे मला. कारण बेट फार सखल नि लहान दिसतं आहे. पण सारंच काहीं आपल्या मनासारख नाहीं जमणार हे पण उघडच आहे. "

" तुम्हाला आमच्याजवळ देवाने ठेवले ही त्याची मोठीच कृपा आहे रेडी. पण काहीं विचार मनात उभ राहातातच पुन्हा पुन्हा. या ओसाड बेटावर आपण फेंकले गेलो आहोंत. आणि या वाटेनें एखादं जहाज येणहि कठीण दिसत. म्हणजे इथून सुटका होण अशक्यच जवळ

जवळ. म्हणजे आपलं नशीब एकंदर मोठं खडतर आहे, हें तुम्ही पण कबूल कराल रेडी."

"तुमच्या पेक्षा वयानें वृद्ध असल्यानें मला तुम्हांला असं सांगावंसं वाटतं मि. सीग्रेव्ह कीं, अशा या तक्रारी, कुरकुरी करून तुम्ही परमेश्वराचे घरीं दोषी ठरताहात. बुक ऑफ जॉन मधें काय म्हटल आहे? 'परमेश्वराजवळून आपण नेहमींच चांगल्याची अपेक्षा करायची नि वाईटाची कधींच नाहीं?' आणि या वरपांगी अनिष्टातून इष्टाची उत्पत्ती होणार नाहीं कशावरून? वाईटातून चांगलं कधींच नाहीं का निघालेलं? माफ करा हं मला मि. सीग्रेव्ह; तुम्हाला दुखवण्याचा नाहीं माझा हेतु. पण तुम्हाला हें सांगणं माझं कर्तव्यच होतं असं वाटलं मला."

"अगदीं योग्य कानपिचक्की दिलीत, रेडी; तुमचा मी आभारीच आहे त्याबद्दल. आता अशी कुरकूर करणार नाहीं मी कधीं; उलट संकटावर कुरघोडी करण्याचाच करीन मी प्रयत्न."

"आणि त्या दयाघनावर विश्वास ठेवा मि. सीग्रेव्ह, कीं त्याला योग्य वाटलं कीं तो तुम्हाला परत तुमच्या इष्टमित्रात नेऊन सोडील आणि तुमच्या धनदौलतीला पण बरकत देईल."

"ठीक आहे रेडी, आत्तापासून तुमच्या हुकमतीखालीं मी काम करणार, तुम्हीं माझे वरिष्ठ—कारण अनुभवी ज्ञानाचं प्रभावी सामर्थ्य तुमच्याजवळ आहे, तर बोला, आता रात्रीं आहे काहीं काम?"

"मला आहे थोडेस, पण उजाडेपर्यंत तुमची मदत मला नाहीं व्हायची. थोडीं हीं लाकडं मात्र द्या हं इकडे ओढून आणून, कारण मला नाहीं एकट्याला ओढवणार तीं. हं—बस; आता जा तुम्ही खालीं आणि विल्यमला म्हणावं कुत्र्यांना मोकळें करून त्यांना थोड

खायला घाल. त्या बिचाऱ्याची आठवणच नव्हती मला. आज रात्रपाळी मी करणार आहे. कारण कामहि खूप आहे मला आणि खूप विचार पण करायचा आहे मला; तर आतां गुड–नाईट, सर."

दुसऱ्या दिवसासाठीं काहींबाही तयारी करीत रेडी काहीं वेळ डेकवर बसले होते आणि नंतरहि मग काम संपल्यावर समोर पहात ते किती वेळ तरी विचारात अगदीं गढून गेले होते. अखेरीस श्रमानें आणि जागरणानें थकून जाऊन ते तसेच एका पेटीवर आडवे होऊन गाढ झोपी गेले. सकाळीं कुत्र्याच्या भुंकण्यानें ते जागे झाले. विल्यमनें त्यांना मोकळें सोडल्यानंतर ते सारं जहाजभर भटकून मग अखेरीस डेकवर येऊन रेडींच्याजवळ झोपी गेले होते. आणि आता जागे होऊन ते मोठ्या आनंदानें रेडींचे हात चाटीत होते. "अरे चोरांनो, आलंत का इथे तुम्ही," पेटीवरून उठत रेडी म्हणाले. "तुमचाहि आम्हाला चांगला उपयोग आहे बाबांनो. ए व्हिक्सन, बस खालीं बस—तुझा मालक दुरावला बाई तुला; गरीब बिचारा!"

"थांबारे बाबांनो जरा," आपल्याशींच रेडी पुटपुटले. "आधीं मला या फळीवर खडूनें नीट नोंद करू दे साऱ्याची—नाहीं तर आम्ही काय म्हातारेबुवा आता, जायचे विसरून सारंच."

एक फळी पुढें घेऊन त्यांनीं लिहिण्यास सुरुवात केली:—तीन कुत्रे, दोन बकऱ्या नि एक करडू; पांच डुकरं—मला वाटत, कोंबड्यी—अगदीं पुरेशीं, तीन नाहीं तर चार कबूतरं (हो नक्कीच), गाय एक; पण ती उठेलशी काहीं दिसत नाहीं, मग तो मरीनो मेंढा आणि मेंढ्या—म्हणजे पुरेसे आहेत हे लोक. हं; आतां आधीं आपण उतरलों कीं प्रथम काय हवं उतरून घ्यायला?—तंबूसाठीं एक मजबूत वासा आणि शीड, एक दोन दोऱ्यांच्या गुंडाळ्या, एक

दोन चांगल्या चटया, दोन कुऱ्हाडी, हातोडी, खिळे नि काहीं तरी तोंडांत टाकण्यासाठीं—आणि एक दोन सुऱ्या. एवढं सध्यां पुरे मला वाटतं;" वर उठत रेडी म्हणाले. "आणि आधीं विस्तव पेटवून पाणी ठेवून दोन तीन मासाचे तुकडे ठेवावे शिजत त्यात. म्हणजे बरोबर न्यायला होतील त्याना ते. सीग्रेव्हनां पण उठवावे आता, कारण भरपूर काम आहे आज सारा दिवसभर."

त्यानीं मग खालीं जाऊन प्रथम मनात योजलेलीं काम करून नतर सीग्रेव्ह, विल्यम नि जूनो याना उठवून वर डेकवर आणलीं; आणि त्याच्या मदतीनें कप्यावरून ती छोटी बोट खालीं घेऊन ती उपडी केली, आणि मग त्या बोटीचा खालचा भाग दुरुस्त करायला त्यानीं सुरुवात केली. आवश्यक ती तळाची दुरुस्ती करून बोटीच्या भेगातून आतून बाहेरून घट्ट डाबर लाऊन ती पाण्यात लोटण्यासाठीं तयार करीपर्यंत रेडीना दुपार झाली. "आता मला वाटत हिला पाण्यांत लोटायला काहीं हरकत नाहीं" ते सीग्रेव्हना म्हणाले. आणि मग सीग्रेव्हच्या मदतीनें त्यांनीं ती बोट खालीं पाण्यात सोडली आणि तळातून फारच थोड पाणी आत येताना पाहून त्यानीं समाधानाचा सुस्कारा सोडला.

"हं, आता आधीं काय न्यायचं, सामान कीं मुलं?"

"तुमचं काय मत आहे रेडी?"

"मला वाटतं पाणी अगदीं शांत असल्यामुळें कुठेंहि उतरायला आपल्याला हरकत नाहीं. तर आधीं आपण दोघे जाऊ या पहाणी करण्यासाठीं. दोनएकशें यार्ड अंतर दिसतं आहे, कांहीं फार नाहीं. म्हणजे फार काहीं वेळ नाहीं लागणार आपल्याला"

"ठीक, रेडी; मी खालीं जाऊन मिसेसना कळवून येतों."

" तोपर्यंत थोडं सामान टाकतों मी पण आंत आणि एक शीड करतों उभं."

रेडीनीं मग एक बंदूक, कुऱ्हाड काही दोरखंड आणि एक शीड असं आत टाकल आणि ते दोघेहि आत उतरून किनाऱ्याकडे गेले. खालीं उतरतांच किनाऱ्यावरील नारळीच्या दाट झाडीमुळे त्याना आत कांहींच पहातां येईना पण त्याच्या उजवीकडे एकदोन फर्लांगावर त्याना झाडीच्या पुढल्या बाजूला थोडी मोकळी जागा दिसली.

" हं, ते बर दिसत आहे ठिकाण आपल्याला तंबू ठोकायला," तिकडे बोट दाखवीत रेडी म्हणाले. " चला बसा परत बोटींत आणि जाऊ या तिकडे."

पाच दहा मिनिटातच ते त्या ठिकाणाजवळ आले. तिथे पाणी चागल उथळ आणि अगदीं नितळ स्वच्छ अस दिसत होत. होडीं-तून त्यांना खालच्या शिंपा नी इकडून तिकडे फिरणारे लहान मासे नीट दिसत होते. पाण्यापासून शंभर दीडशें फूटापर्यंत वाळूच मोकळं पटांगण पसरल होत आणि मग त्याच्यापुढे नारळीची झाडी सुरू झाली होती.

" मोठी सुंदर जागा दिसते आहे बुवा !" सीग्रेव्ह उद्गारले. " आणि मनुष्यप्राण्यानें मला वाटनं इथे पाऊल काहीं टाकल नसेल कधीं. हे नारळ खालीं गळून पडून नवी नवी झाड तयार होऊन त्याच हें एक वनच झाल आहे तयार. अस किती तरी शतक मला वाटत मनुष्यवस्तीसाठीं हें तयार होऊन राहिल असेल. या बाबानों आणि आमचा उपभोग घ्या, असच म्हणत असतील हीं झाड."

" परमेश्वरानें अशीच आपली दौलत विखुरली आहे चोंहीकडे;" रेडी म्हणाले. " आणि आपल्याला कल्पनाहि नसते त्यावेळीं होतो तिचा उपयोग. पण आपण थोडे पुढे फिरून येऊ या आधीं. बंदुक

मात्र असू द्या बरोबर—काहीं तशी आवश्यकता नाहीं दिसत, पण काहीं नेम नाहीं सांगता येत. या लहान बेटावरून रानटी जनावरं नमतात फार करून. फार तर एखाद दुसर डुक्कर असायचं केव्हातरी सोडलेल. बरं पण तो उचवटा बरा दिसतो आहे तात्पुरता तबू उभा करायला. दुसरी चागली जागा मग काढू सावकाशीनें हुडकून. पण आज आपल्याला खूप फेऱ्या हव्या करायला रात्रींपर्यंत. तर आता बोटींतल सामान टाकू या आणून. आणि मग मला वाटत जूनो आणि विल्यम याना आणू आपण प्रथम इथे. कारण त्याची मदत होईल आपल्याला."

"अंह, आधीं जूनो, मुल आणि कुत्रे आणू आपण. म्हणजे तुम्ही परत खेप मारीपर्यंत जूनो आणि मी काहीं काम करू इथे. आणि मिसेसना आणायच्या वेळीं मी तुमच्या बरोबर येईन म्हणजे झाल."

ते परत जहाजावर जाऊन पोचताच सीग्रेव्ह खालीं आपल्या पत्नीला धीर द्यायला आणि बेटावर काय पाहिल ते पण त्याना सागायला गेले. त्या वेळात फळ्या नि काहीं लाब वासे रेडीनीं रात्रींच एकत्र बाधलेले बोटीजवळ आणून ठेवल आणि ते पाण्यात सोडून ते बोटीला नीट घट्ट बाधले. तवढ्यात जूनो आणि टॉमी वर डेकवर आलीं रेडानीं त्याना बोटींत नीट सोडलें आणि मग सामान म्हणून दोन पावडीं आणि काहीं सुनारकीचीं हत्यार पण त्यानी आत टाकलीं आणि परत एकदा बोट किनाऱ्यावर आली. टॉमी आरभीं बुजऱ्या सारखा इकडे तिकडे पहात होता. पण वाळवंटावर पुष्कळशा शिंपा त्याच्या दृष्टीस पडताच त्याची कळी खुलली आणि तो आनदानें नाचत ओरडत शिंपा गोळा करू लागला. परत एकदा जमीनीला पाय लागल्यामुळे सगळे कुत्रेही आनंदानें भुकत किनाऱ्यावर बागडू लागले

आणि सभोंवार दृष्टिक्षेप केल्यावर खूष झालेली जूनोहि हंसून म्हणाली, " काय सुदर आहे जागा, रेडी ! "

" आता ही भरलेली बंदुक जरा लांब ठेऊ या आपण, नाहींतर टॉमीची स्वारी जायची त्याच्याशीं खेळ करायला. आपण दोघे हीं शिडं आणू उचलून आणि मग हे वासे नी दोरखड नेऊ. चलरे टॉमी, हें पिकाव घे खाद्यावर, म्हणजे तुला पण थोड काम झाल. "

दोन खेपांत त्यानीं बोटींतलं सर्व सामान त्या टेपाडावर आणून टाकल. टॉमीची स्वारी पण दुसरं पिकाव खाद्यावर घेऊन येत होती; आपणसुद्धा काम करतों आहों या कल्पनेनें तोहि खुशींत होता.

" हीं दोन झाडं बरीं दिसताहेत आपल्या कामाला. तशीं फार लांब पण नाहींत एकमेकापासून. " रेडी म्हणाले. " याना बाधू या आपण हे वासे आणि त्यावरून ही ताडपत्री टाकून तिचीं दोन्हीकडचीं टोकं खिळवूं जमीनीला. म्हणजे झाला एक तबू तयार. मग आणखी शिड आणलीं की दुसरा तबू करूं तयार असाच आणि त्याच्या दोन्ही बाजू पण तशाच बंद करून टाकू. आपण दोघे आधीं हा वासा नीट बाधूं या दोन झाडाना नि मी बोट घेऊन परत जाईन. तोंपर्यंत तुम्ही नि जूनो तंबू करा पुरा. "

" पण वासा उंच कसा बाधायचा रेडी ? "

" कां बर, आधीं हा एक बाधू हात पोंचतात इतक्या उंचीवर आणि मग त्यावर उभे राहून दुसरा त्याच्यावर उच बाधता येईल आपल्याला. पुढल्या खेपेला मी आणखी वासे घेऊन येईन दुसऱ्या तबूसाठीं. "

त्याप्रमाणे त्यानीं वासा उंच बाधून त्यावरून ताडपत्री फेकून घेतल्यावर आत चागली ऐसपैस जागा तयार झाल्यावर रेडी म्हणाले, " तुम्ही थोड्याशा खुर्च्या तयार करा आतां या लाकडांच्या आणि

त्यानीं या ताडपत्रीचीं टोकं टाका कायम करून जमीनींत. आणि नतर मग तुम्ही नि जूनो मिळून त्या खुंट्यांच्या बाजूने ताडपत्रीवर वाळूचा बांध घाला, कीं दोन्ही बाजू बद झाल्या. आणि मग दुसऱ्या दोन बाजू शिडानीं बंद केल्या कीं झाला तबू तयार. "

" ठीक, ठीक; ताडपत्री नीट ताठ खेंचून बाधून टाकण्याला जुनो लावील हात. मी बघतों तिकडे आता. "

" बर, पण जुनो, खुंट्या तयार होई पर्यंत तूं पावड्यानें ही आपल्या तंबूच्या आतली जागा कर सारखी आणि आंतली ही घाणहि कर साफ सगळी. आणि आत कांही कीड मुंगी काय दिसते तें पण पहा बरका नीट. आणि तुम्ही हो टॉमी बुवा कशाला हात लाऊन कापून नका घेऊ हात पाय नि कुठे जाऊ पण नका लाब. जर कांहीं माझ्या मदतीची अपेक्षा असली तर बदुकीचा बार काढा मि. सीग्रेव्ह, म्हणजे मी ताब डतोब येईन बोटीवरून. "

× × × ×

जहाजावर जाताच रेडीनीं आधीं खालीं जाऊन मिसेस सीग्रेव्ह नी विल्यम याना झालेल्या कामाची वर्दी दिली. आपल्या यजमानाबद्दल मिसेस सीग्रेव्हना थोडी काळजी वाटली पण रेडीनीं बदुकीची खूण त्याना सागितल्या नतर त्याना जरा बरे वाटलें. ते मग कोठीच्या खोलींत जाऊन त्यानीं तिथलीं सर्व नवीं शीड, दाभण, खजूरी दोरे आणून जिन्याजवळ ठेवले. तोंच बदुकीचा आवाज झाला, आणि मिसेस सीग्रेव्ह घाबरून जाऊन धावतच केबिन बाहेर आल्या. रेडीनीं ताबडतोब दुसरी बदुक घेऊन बोटींत उडी टाकली आणि ते घाई घाईने किनाऱ्यावर आले. धापा टाकीतच ते तंबूशीं येतात तों जूनो आणि सीग्रेव्ह तंबूंत कामात असलेले आणि टॉमी मुसमुसून जोराजा-रांत रडत ओरडत असलेला त्याच्या नजरेस पडला. टॉमीच्या स्वारीने

नेहमीं प्रमाणे बंदुकीशीं घडपड केली होती आणि बदुक उडून तिचं तोंड वर असल्यामुळें दोन नारळ खालीं पडले होते. त्या आवाजामुळें बोटीवरील लोक घाबरून जातील म्हणून त्याच्या वडीलांनी त्याला थोडासा प्रसाद चाखवला होता आणि टॉमी आता आपला पश्चात्ताप मोठ्यानें ओरडून व्यक्त करीत बसला होता.

पण त्याची आई फार घाबरू नये म्हणून रेडी तसेच जहाजावर परत गेले आणि त्यानी टॉमीचा पराक्रम त्याच्या आईला सागून ते परत आपल्या कामाला लागले. एकदोन चटया, ब्लॅकेट, कपडे, एक पेटी, हत्यार, सुया दोरा वगैरे जेवढ बोटींत जाण शक्य होत तेवढ सगळ सामान घऊन ते परत किनाऱ्यावर आले आणि मघाप्रमाणें सीग्रेव्ह आणि जूनोच्या मदतीने दुसऱ्या तबूची त्यानीं पूर्वतयारी केली. आणि मग जहाजावर आणखी दोन खेपा टाकून त्यानीं मास, बिस्किटडबे, बटाट, काटे, चमचे, भाडी अस कितीतरी सामान त्यानीं किनाऱ्यावर आणल. " आता दोन एक तासांत सूर्यास्त होईल मि. सीग्रेव्ह, तर आता आपण तुमच्या पत्नींना आणूया किनाऱ्यावर. " ते सीग्रेव्हना म्हणाले. " आजच्या रात्री पुरती सोय झाली आहे आपली. आणि देवदयेने उद्याहि पण जर अशीच हवा राहिली तर पुष्कळच काम करता येईल आपल्याला. "

त्या प्रमाणें जहाजावर जातांच सीग्रेव्ह व रेडी खालीं केबिनमध्ये गेले. मिसेस सीग्रेव्ह जाण्याच्या कल्पनेनें प्रथम फार घाबरल्या पण मग त्यानीं मोठ्या धीराने आपली तयारी केली. आजारामुळें त्याना फारच अशक्तता आली असल्यानें त्याचीच सर्वाना जास्त काळजी वाटत होती. आपल्या पतीच्या मदतीनें त्या डेकवर आल्या. त्याच्या मागून आल्बर्टला घेऊन विल्यम आणि कॅरोलिन रेडींच्या खाद्यावर अशीं वर आलीं. कशीं तरी त्या सर्वाना बोटींत उतरवून विल्यम नी रेडी यानीं वल्हीं उचललीं आणि थोड्याच वेळात तीं किनाऱ्यावर

उतरलीं. प्रथम मिसेस सीग्रेव्हना त्यानीं उचलून आणून चटईवर बसवले. पण तेवढ्याहि श्रमानें त्याना तहान लागून त्यानीं पाणी मागितलें.

" काय गाढव मी तरी ! " रेडी उद्गारले. " बाकीच्या कितीतरी गोष्टी आणल्या मी जहाजातून, पण जीवनाला अत्यत आवश्यक ती गोष्ट आणायला तेवढा नेमका विसरलो. त्यातली खरी गोष्ट अशी आहे पण, कीं मी उतरल्यावर वेळ मिळताच इथेच पाणी शोधून काढणार होतों हिंडून. बरं पण, आता आणतो हं पाणी. "

त्यानीं ताबडतोब परत जाऊन गोड्या पाण्याचीं दोन पिंपें किना ऱ्यावर आणलीं आणि जूनो आणि विल्यमनीं तीं लोटीत लोटीत वर तंबूजवळ आणून ठेवलीं. दोन घोट पाणी प्यायल्या बरोबर मिसेस सीग्रेव्हना हुशारी आली आणि त्यानीं रेडींना धन्य वाद दिले. " आता विश्राती घ्या रेडी थोडी तुम्ही. खूप थकलेले दिसताहात तुम्ही पण रेडी. "

" हो, थकलो आहे खरा. माझहि वय झालं आहे आता. पण एक दोन घास पोटात जाऊन जरा पाय लांब केले कीं होईन ताजा तवाना. "

होते खरेच रेडी थकलेले, पण थोडी बिस्किट नि मास त्यानीं पोटात ढकलल्यावर त्याना बरें वाटलें. इकडे जूनाने मुलाना पण तेंच खायला देऊन त्याना तबूत नेऊन निजवलीं.

" आज पुरे झाल काम आता मला वाटत, " रेडी म्हणाले. " आजचा दिवस पुरा भरला आहे आपण. तर आता झोंपण्यापूर्वी एकदा देवाची प्रार्थना करू या आपण. "

मि. सीग्रेव्हनीं गुडघे टेंकून परमेश्वराची मनोभावाने प्रार्थना केली आणि तीं सर्व आता बाहेर काळोख पडत असल्यानें विश्रातीसाठीं आत तबूत जाऊन आडवीं झालीं.

---

## : : ७ : :

सकाळीं सर्वांच्या आधीं सीग्रेव्ह आथरुणावरून उठून तंबूबाहेर आले आणि त्यानीं सभोंवार दृष्टि टाकली. वर आकाश स्वच्छ नि दीप्तिमान असं पसरलं होतं. पूर्वेकडून झुळझुळत येत असलेला शीत मंद वारा सागराच्या नितळ पृष्ठभागावरून वहात होता आणि लहान लहान वीचिबालिका हसत खिदळत पाठशिवणीचा खेळ खेळत होत्या. पांढरीशुभ्र स्वच्छ वाळू चोंहीकडे पसरली होती. डावीकडे जमीन वर चढत चढत दोन तीन लहान टेंकड्या तयार झाल्या होत्या आणि त्या पलीकडे दूरवर नारळीचीं दाट झाडे पसरलीं होतीं. उजवीकडे पाण्यां तून प्रवाळाची एक लांब भिंत किनाऱ्याला येऊन भिडली होती आणि त्यापलीकडे लहान झुडपानीं खूप गर्दी केली होती. आणि त्याच्याहि पलीकडे दूर 'पॅसिफिक' एखाद्या प्रचंड महासागरी राक्षसाप्रमाणें खडकावर पसरलं होतं. सूर्याचे किरण आता अधिकाधिक प्रखर होत होते, पण सीग्रेव्हच्या माथ्यावर आपले झुबकेदार मुकुट वाकवीत नारळीनीं एक विशाल छत्र उभं केलं होतं. त्या फुटलेल्या जहाजाच्या दर्शनानें उत्पन्न होणारे उदासीन विचार, त्या प्रशांत सौंदर्य दर्शनानें मवाळून आपल्याच विचारात गर्क असलेल्या सीग्रेव्हना आता तितकेसे तापदायक वाटत नव्हते. त्यांच्या मनात विषण्ण समाधानाचं एक चमत्कारिक मिश्रण आता वावरत होतं.

"जगाचा चिंताजाळ विसरण्यासाठीं एखादं प्रशांत सौंदर्यानें भारावलेलं असं स्थान मला जर शोधायचं असतं, तर हेंच स्थळ मी खास पसंत केलं असतं." सीग्रेव्ह आपल्याशींच विचार करीत होते. "किती सुंदर दृश्य आहे हें!—किती शांत—नि किती समाधान

मिळतं आहे मनाला—आणि किती गोड हुरहूर उत्पन्न करत आहे हें मनांत! सारी आशा सुटली असता परमेश्वरानें आमचं रक्षण केलं, आणि या संपन्न बेटावर नेमकं आणून सोडल आम्हाला—आणि तरी सुद्धा मी वेड्यासारखा कुरकुरत होतों—आणि तेंहि केव्हा, तर त्याची कृतज्ञतेनें प्रार्थना करून करुणा भाकण्याच्या वेळीं! क्षमस्व भगवन्! माझीं सर्व माणस वाचलीं आणि काय थोड सामान झालं नाहींस आणि या एकांतवासात आलो काही दिवस—पण किती दिवस? अस्स! अजूनहि मन बंड करत आहे ह!—त्या सर्वज्ञाला योग्य वाटेल तितके दिवस." ते मागें वळले. रेडी अजून निद्रामग्नच होते. "मोठा उमदा माणूस! फार थोर—त्या खडबडीत बहिरंगाच्या आड, कस वज्रासारख कठीण नि लोण्यासारख मृदु अस अंतःकरण नांदत आहे—हा अलौकिक त्याग त्यानीं केला नसता, तर आमच दुबळ्याच काय झालं असत?"

त्याना येताना पाहून कुत्रे धावत धावत येऊन त्याच्या आंगावर उड्या मारू लागले आणि विल्यम पण उठून बाहेर आला. त्याला रेडीना उठवूं नको अशी खूण त्यानीं केली.

"पण जूनोला उठवावी नाहीं वाटतं आता?" विल्यमनें विचारलें. "आईला जागी केल्याशिवाय हळूच उठवतो तिला मी."

"बर, बर उठव, तोंपर्यंत रेडीनीं स्वयपाकाची भाडीं काय काय आणलीं आहेत तें पाहतों मी. पण ही पहा जूनो आलीच बाहेर. तर आपण आता काहीं तरी न्याहारीसाठीं करूं या तयार"

"पण विस्तव कसा पेटवायचा बाबा? आपल्याजवळ काही पेटी नाहीं आहे काड्याची."

"नाहीं खरी; पण दुसरे मार्ग आहेतच कीं विल्यम. मऊ मऊ लाकडाचे तुकडे कठीण लाकडावर घासून विस्तव पेटवतात काहीं

लोक. पण आपल्याजवळ दारू आहे बंदुकीची. म्हणजे चकमकीनें किंवा आपल्या मॅग्निफाईंग ग्लास मधून सूर्यकिरण घेऊन आपण ती पेटवूं शकतों."

"पण शिजवायचं काय, त्यावर? आपल्याजवळ चहा कॉफी कांहींच नाहीं. पण बटाटे आहेत बाबा रेडीनीं आणलेले."

"हो; पण मला वाटत आजचा दिवस बिस्किट, बीफ आणि पोर्क यावरच भागवाव आपल काम. आपल्याला बटाट्याचा लागवडीसाठीं उपयोग करता येईल, नाहीं का. पण आपण दोघेच गेलो जहाजावर तर? आपल्याला सुद्धा आता वल्हवायला शिकलंच पाहिजे. सगळंच त्या म्हाताऱ्या रेडींच्या आगावर नाहीं टाकून चालायच. चल तर, विल्यम."

ते दोघेहि मग बंदरावर गेले आणि त्यांनीं होडी पाण्यात ढकलली. "चहा नि कॉफी कुठे आहेत ठेवलेलीं ते मला माहीत आहे बाबा. आईला चहा फार हवा असतो सकाळचा आणि बकऱ्याच दूधपण मी काढीन बेबीसाठीं." विल्यम म्हणाला.

त्याना वल्हीं मारण्याचा तसा सराव नव्हता तरीहि ते थोड्याच वेळात जहाजाजवळ आले, आणि बोट दोराने जहाजाला घट्ट बांधून ते आत शिरले. विल्यमने अगोदर चहा कॉफी पैदा केली आणि त्याचे वडील इतर सामान गोळा करीत असता तो बकऱ्याच दूध काढायला गेला. आणि दूध काढल्यावर एका स्वच्छ बाटलींत ते भरून घेऊन तो आपल्या वडीलाकडे गेला.

"मी या दोन टोपल्या भरल्या आहेत सामानानें. तुझ्या आईला लागतील त्या. आणखीं काय नेऊया या खेपेंत?"

"दुर्बीण घेऊं या पहिल्यानें आणि असतील नसतील तेवढे सारे कपडे—आईला बरं वाटेल त्यानीं. आणि थोडीं पुस्तकं पण नेऊं या

की बाबा; त्यांतल्या त्यात बायबल नि प्रार्थना गीत तर लागेलच आईला---हीं पहा, हीं इथेच आहेत तीं. "

" शाबास विल्यम! आता मी हें सार खालीं होडीत नेऊन ठेवतों आणि पुन्हा येतो वर आणखी न्यायला, बर का. "

थोड्याच वेळानें मग ते बोट घेऊन परत किनाऱ्यावर आले. जूनो सामान वाहून नेण्यासाठीं उभीच होती तिथे. तिची आघोळपण उरकलेली दिसत होती.

" ह, काय जूनो, कसं काय वाटतं आहे आत्ता?"

" फारच छान, " जुनो म्हणाली आणि मग समोर बोट दाखवीत ती म्हणाली. " ते पहा, खूप खूप मासे आहेत तिथे. "

" आहेत खरे हं जूनो. रेडीनीं गळ आणले असतील बहुतेक. चल, तू हे कपड्याच बडल ने; आम्ही दोघे बाकीच सामान आणतो. ते सामान घेऊन तंबूजवळ आले तो रेडींखेरीज बाकीं सर्व उठलीं होतीं. विल्यमनें सूर्यकिरण मॅग्निफाईंग ग्लासवर धरून कागद पेटवले आणि तीन धोंडे माडून त्याची चूल बनवली आणि वर चहाच आधण चढवल. अर्ध्या एक तासातच पाण्याला उकळी फुटून चहा तयार पण झाला. इकडे जूनोने तिन्ही मुलाचे हात पकडून त्याना पाण्यातून बुचकळून काढलीं आणि परत त्याचे कपडे चढवून ती कप बशाची तयारी करूं लागली. न्याहारीची सर्व तयारी झाल्यावर विल्यमने रेडींना उठवायचे का म्हणून सीग्रेव्हना विचारले.

" हो, आता उठवूं या त्याना—त्यानाहि चागली भूक लागली असेल. "

विल्यमने जाऊन रेडींचे खादे हलवले. " झाली झोंप पुरशी रेडी ? " रेडी उठून बसताच विल्यमने विचारलें.

" वा वा विल्यम; छानच लागली होती झोंप हं ! आता उठून तुमच्या न्याहारीसाठीं पहातों ह काही. "

" हो हो, जरूर रेडी ! " विल्यम हंसत म्हणाला.

रेडीनीं आगात जॅकेट चढवून ते बाहेर आले. तबूच्या पलीकडे दृष्टि टाकतात तों मिसेस सीग्रेव्ह, मुलं जूनो सारीं खालीं बसलीं आहेत आणि समोर फराळाची जय्यत तयारी दिसते आहे, असं त्याच्या नजरेस पडल.

" गुड मॉर्निंग रेडी; झोंप झाली नीट ? तुम्ही फार थकला होतां म्हणून मुद्दामच उठवलं नाहीं तुम्हाला सीग्रेव्हनीं; " मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या.

" धन्यवाद, धन्यवाद, मिसेस सीग्रेव्ह ! तुम्हाला पण बरं दिसतं आहे आज. आणि माझ्या शिवाय तुमचं ठाकठीक चाललं आहे, हें पाहून मात्र फार आनंद वाटला हं मला; " हंसत रेडी म्हणाले.

" असं कसं रेडी ? " मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या. " तुमच्या वाचून नाहीं चालायचं हो आमचं. तुम्ही नसतात तर आज कुठे असतों बरं आम्ही ? "

" अहो न्याहारीची तयारी केली फक्त आम्ही तुमच्या शिवाय, " सीग्रेव्ह म्हणाले. " पण तुम्ही नसतात तर या न्याहारीची मुळीं जरूरीच नसती पडली आम्हाला. पण आम्ही काय केलं तुम्ही उठण्यापूर्वी तें मी सागतों तुम्हांला चहा घेता घेता. पण आतां आधीं नेहमींच वाचन करताना तुम्ही ! " मिसेस सीग्रेव्हनीं नेहमींप्रमाणें बायबलातला कांहीं भाग वाचला आणि मग सर्वांनीं गुडघे टेकले आणि सीग्रेव्हनीं प्रार्थना केली.

त्याची न्याहारी चालू झाल्यावर आपण बोटीवरून काय काय सामान आणलं ते विल्यमनें रेडींना सांगितलं आणि जूनोने मुलांना पाण्यातून कशीं बुचकळून काढलीं तें पण त्यानें सांगितल.

" बरं, पण जूनो पुन्हां नको हं अशी आघोळ घालीत जाऊं

मुलांना; " रेडी म्हणाले. " या असल्या बेटाच्या आसपास शार्कमासे पुष्कळच असतात. म्हणून हें असं पाण्यात जाणं फार धोक्याचं आहे."

" अगबाई देवाचीच खैर म्हणायची आज!" आगावर शहारे देत मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या.

" खरं आहे. पण या वाऱ्याच्या बाजूला ते सहसा नसतात, आणि आपण त्याच बाजूला आहोंत सध्या. " रेडी म्हणाले. " तरीहि या सथ पाण्यात येणं शक्य आहे ते. आपलं सगळं सामान आणून झालं जहाजावरून कीं मग आपण ठरवू आपली रहाण्याची जागा आणि मग स्नानासाठीं म्हणून जागा पण तयार करता येईल आपल्याला."

" म्हणजे काय रेडी ? "

" म्हणजे असं कीं आपल्याला गोड पाणी कांहीं नाहीं मिळाल अजून; आणि त्यावांचून तर आपलं मुळींच चालायच नाहीं. या बाजूला जर पाणी नाहीं मिळालं तर इथून हलावं लागेल आपल्याला. पण आधीं सारं सामान आपल्याला जहाजावरून इथे आणून टाकलं पाहिजे, नाहीं का. तर चला आता जाऊं याच आपण. तुम्ही आणि विल्यम गलबतावर सामान गोळा करा आणि मी तें बोटींतून आणून टाकीन आणि जूनो तें मग तंबूत नेऊन ठेवील. चला."

तो सबंध दिवस मग त्यानीं जेवढं म्हणून उपयोगीं असं त्याना वाटलं तेवढं सारं सामान त्यानीं जहाजावरून आणलं. सर्व लहान लहान शिड, दोऱ्या दोरखंड, ताडपत्र्या, पिंपं सर्व लहान मोठीं हत्यारं, लाकडी फळ्या, मोठे मोठे खिळे हें त्यांनीं जेवणाची वेळ होईपर्यंत किनाऱ्यावर आणून टाकलं आणि मग भरपूर जेवण झाल्यानतर, खुर्च्या टेबलं, मेणबत्त्या, दोन बॅग्स कॉफी, दोन तांदूळ भरलेल्या, दोन बिस्किटांच्या, बरचसं बीफ आणि पोर्क, दोन कणकेच्या बॅग्स पाण्याची पिंपें, धार लावायचा दगड, औषधाची पेटी हें सर्व सामान

किनाऱ्यावर येऊन दाखल झालं. परत आल्यावर रेडी म्हणाले, "आतां आपल्या बोटींतून थोड थोड पाणी यायला लागल आहे बर का, तर आता तिची दुरुस्ती केल्याशिवाय काहीं फार सामान नाहीं आपल्याला नेता येणार. आणि जूनोनें पण अजून निमें सामान काहीं तबूत नाहीं नेऊन टाकल—तिला एकटीला जडच आहे तस ते. तर आता मला वाटत काळोख पडण्यापूर्वी सारीं जनावर नेऊं या आपण. त्यांना पाण्यातून नेणं काही तितकंस बर नाहीं वाटत मला. पण होडींतून नेणंहि त्रासाचं आहे. तर आधीं एक डुकर सोडून बघूं या आपण; तोंपर्यंत विल्यम सर्व कोंबड्याचे पाय बाधून तू तयार ठेव त्याना बोटींत. ती गाय काही उठेलशी दिसत नाहीं. तिला गवत घालून ठेवतों आणि नाहीं उठली तर तिला मारून तिच मास ठेऊं खारवून."

रेडी खालीं गेले आणि लगेच डुकराच केकाटण ऐकायला आलं. जरा वेळाने एक डुकर खाद्यावर घेऊन रेडी वर आले आणि त्यानीं तें पाण्यात टाकलं. आरभाला ते थोडं धडपडल पाण्यात पण मग किनाऱ्याकडे तोंड करून तें सरळ निघाल. त्याच्याकडे पहात ते उभे असताच रेडी एकदम म्हणाले. "हं, वाटलच होतं मला तसं! तो पहा एक काळा शार्क त्याच्या पाठीवर कसा झपाट्यानें निघाला आहे तो—तो पहा, पकडल त्यानें ते! पहा आता, देवाचे उपकार माना सीग्रेव्ह, सकाळीं मुलं वांचलीं म्हणून."

"खर आहे, रेडी—देवाची मोठीच कृपा आहे ती! त्या पोराच्या जवळपास सुद्धा वावरत असेल त्यावेळीं एखादा."

"फारसा लाब नसेल निदान;" मग आता तंगड्या बांधून टाकायच्या बाकीच्या बोटींत. हें सामान आपण टाकलच आहे थोडसं आधीं, म्हणजे झालं पुरेसं ओझं या खेपेपुरतं."

होडी घेऊन रेडी गेल्यानंतर विल्यमनें बकऱ्या आणि करड डेक-

वर आणलीं; आणि रेडी परत आल्यावर तीं त्यानीं एकेक बोटींत सोडलीं. आणि त्याना खाण्यासाठीं म्हणून त्यांच्या खाण्याचा एक गोण पण होडींत टाकला. ते किनाऱ्यावर आले पण होडींत या वेळेला बरंच ओझं असल्यानें आंत पाणीपण आता जास्त भरलं होत.

"बस, आजचं काम संपलं आता. आपल्या बोटीनें पण चांगली कामगिरी केली आहे आणि तिची थोडी दुरुती करून तिला जरा विश्रांती दिल्याशिवाय आपण जहाजावर परत नाहीं जाऊ शकत."

विल्यमनें बकऱ्या नीट तंबूत नेऊन सोडल्या आणि त्या बिचाऱ्या तिथे स्वस्थ बसून राहिल्या. पण डुकरानीं आणि कोंबडयानीं मात्र जमीनीला पाय लागताच पलायनच केलें.

जूनोनें त्याच्याकरतां कॉफी अगदीं तयार ठेवली होती. कॉफी-पान चालू असता विल्यमनें त्या डुकराचीं हकीगत सांगताच जूनो पार घाबरून गेली. कारण तिच्यामुळे आज भलताच प्रसंग ओढवला असता असं तिला वाटत होत.

"आता उद्याचीं काय काम रेडी?" सीग्रेव्हनीं विचारले.

"उद्या आणखी एक तंबू उभारूं या आपण सामान ठेवण्या-साठीं. एका दिवसाचं काम आहे तें. आणि आता दोनएक महि-न्यानी पावसाला सुरवात होईलसं वाटत मला. म्हणून सामान सुर-क्षित ठेवायला हवं तंबूत. नंतर मग आपण या बेटाच्या आतल्या भागाचं संशोधन करूं आणि आपलीं घर कुठे बांधायचीं तें पण ठरवूं. असं आश्चर्य नको तुला वाटू देऊ विल्यम. इतकं कठीण नाहीं आहे काम ते. या नारळीच्या सारखं उपयुक्त असं दुसरं झाड नाहीं बघ; आणि लाकूड पण हलकं, आपल्याला सहज उचलण्यासारखं."

"इतकं उपयोगी आहे म्हणता हे झाड रेडी?" मिसेस सीग्रे-व्हनीं विचारलें.

" पहा तर खरं, ऐका हं. आधीं लाकूड म्हणून उपयोग आहे त्याचा घरासाठीं. मग त्या नारळाच्या चोडांचा उपयोग दोऱ्या-दोरखंडासाठीं करतां येतो. त्या पानाचा उपयोग घर शाकारण्यासाठीं करतात. फळ खायला तर चांगलंच लागतं आणि त्याचा उपयोग भाजींत देखील करतात. कोवळ्या फळाचं पाणी फार गोड आणि ताकद देणारं आहे. खोबऱ्याचं तेल काढतात, करवंटी जळण म्हणून वापरतात किंवा त्यांचा पिण्याचं भांड म्हणून उपयोग होतो. त्याची ताजी माडी प्यायला चांगली असते पण आंबली कीं झाली दारू तयार. असं नारळीसारखं माणसाच्या इतक्या तऱ्हेनें उपयोगी पडणारं दुसरं झाड नाहीं माझ्या पहाण्यात. "

" सुदैवानें मग आपल्या इथे खूप नारळी आहेत. "

" होय, विल्यम, अगदीं भरपूर आहेत नारळी इथे; " रेडींनी उत्तर केलें. " पण जर हीं झाडं थोडीं असतीं तर पंचाईत होती. कारण मग आपण तीं हवीं तेवढीं तोडूं नसतो शकलों. अशा बेटांवर माणूस उपाशीं नाहीं मरणार कधींच पण, आणि त्याच्या साऱ्या गरजा पण हें झाड भागवील. बरं पण, परवाचा कार्यक्रम पण ठरवू या की आजच. उद्या दिवसभर तंबूचं काम आहेच. परवां बेटांत हिंडायला जाऊं आपण, काय ? "

" चालेल, पण कोणी कोणी जायचं ? मला वाटतं मी आणि तुम्ही असे जाऊं या दोघे. "

" तुम्ही दोघांनीं जाऊन कसं चालेल पण ? " मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या. " सीग्रेव्ह नाहीं आले तर नाहीं का चालणार, रेडी ? "

" चालेल, पण त्यांच्या सल्ला मसलतीचा उपयोग जास्त झाला असता मला; " रेडी म्हणाले. " पण तुमचंहि बरोबर आहे म्हणणं. एकटा विल्यम कांहीं पुरेसं संरक्षण नाहीं तुम्हांला; किंवा तुम्हांला तरी

तस नाहीं वाटणार म्हणा. आणि मी एकटं जाणं पण इष्ट नाहीं. कारण काय होईल नि कसली अडचण येईल तें काहींच सांगता येत नाहीं. पण न्यायचं कोण बरोबर, जूनो कीं विल्यम ? ''

" मलाच न्या कीं रेडी, " टॉमी म्हणाला.

" वा, मग तुला संभाळायला जूनोला पण नेली पाहिजे, नाहीं का ? " रेडी हंसत हंसत नि त्याला थोपटीत म्हणाले. " आणि शिवाय तुझी आई नाहीं तुला जाऊं देणार. कारण तूं आपल्या धाकट्या भावडांना सांभाळतोस, चुलीसाठीं काटक्या, लाकड गोळा करतोस, नाहीं का ? मी आपला जूनो किंवा विल्यमलाच नेईन. "

" मला जरी भीति वाटते आहे कीं नाहीं रेडी, तरी तुमची अडचण होऊन नाहीं चालायच रेडी. तर तुम्हाला जर हवा असला तर विल्यमला न्या खुशाल आपल्याबरोबर. परमेश्वर तुमचं दोघांचंहि रक्षण करीलच. मी काळजी करून काय होणार ! जा विल्यम, खुशाल जा तूं. सीग्रेव्हनां नेलंत तरी चालेल विल्यमबद्दल, खरच. "

" विल्यम चालेल मला, मॅडम, " रेडीनीं उत्तर दिले. " मी एकटा देखील आनंदानें गेलों असतों; पण एकाला एक दोघे असले तर बरें. समजा आजारी पडलों, किंवा काहीं दुखापत झाली मला—मी काय पिकल खोड आहे आता—तर कांहीं विशेष नाहीं म्हणा, होईन जगातून नाहींसा आणि थोडी होईल तुमची गैरसोय—एवढच. "

" माफ करा हं रेडी, " मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या. " आई अशी वेडी होते कधीं कधीं. ठरलं आतां, विल्यम जायचा. "

" वेडी नाहीं, भितरी म्हणा, " रेडीनीं उत्तर केलं. " बर तर, आतां पुढें आमच्या प्रवासाची तयारीः पाणी तर हवंच, शिदोरी पण

हवीच बरोबर; बंदूक, कुऱ्हाडी दोन—लहान व मोठी, आणि हे दोन मोठे कुत्रे. विल्यम तूं पाणी घे भरून बाटल्यांत, मी पिशव्या करतों तयार. मि. सीग्रेव्ह तुम्ही धार द्या लावून कुऱ्हाडींना आणि आमचा टॉमी दगड ओढील धार लावण्याचा, होय ना रे टॉमी ? ”

टॉमीनें एकदम वर उडी मारली. धारेचा निसणा कांहीं त्याला ओढणं जड नव्हत पण त्याला कामाचा कटाळा. पण आता रेडींनीं त्याला खुलवल्यानतर तो आनंदाने तयार झाला तें काम करायला.

“ आणि निघायचं केव्हा रेडी ? ”

“ सकाळीं उजाडत उन्ह पडण्यापूर्वी निघाव, ते चागल. ” रेडी म्हणाले. “ आणि निदान दोन दिवस तरी मला वाटत लागतील आम्हाला. जास्तीत जास्त शनिवारीं सकाळीं यायला कांहीं हरकत नाहीं दिसत. त्याच्या आधीं येण्याचाच प्रयत्न करीन मी कांहीं झाल तरी. ”

“ गुड—नाइट—आणि गुड—बाय पण, आई, ” विल्यम म्हणाला, “ कारण सकाळीं कांहीं भेट नाहीं होणार आपली ! ”

“ परमेश्वरच तुझा पाठीराखा बरं बाळ ! रेडी नीट काळजी घ्या बरं त्याची आणि तुम्ही पण जपा नीट आपल्याला. ” मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या आणि डोळयात गर्दी करीत असलेले अश्रु लप-विण्यासाठीं त्या आत तंबूत गेल्या.



## :: ८ ::

सकाळीं उजाडतं न उजाडतं तोंच रेडी उठून त्यानीं सर्व तयारी आटोपली आणि मग विल्यमला उठविलें. त्याच्या पिशव्या भरून तयारच होत्या. प्रत्येक पिशवींत पानगुडाळलेल्या दोन पाण्याच्या बाटल्या आणि बीफ नि पोर्क सारख. पण या शिवाय रेडींच्या मोठ्या पिशवींत काही थोडी बिस्किट आणि दुसऱ्या तशाच कांहीं आवश्यक वस्तू भरल्या होत्या. रेडींच्या खांद्यावर बदुक नि हातात मोठी कुऱ्हाड आणि विल्यमच्या खांद्यावर एक लहान पावड नि हातात कुऱ्हाड, आणि पुढे कुत्रे तयार होऊन उभे राहिलेले. सभोवार भरपूर उजेड पडताच त्या दोघानीहि पाय उचलला आणि थोडयाच वेळात ते दिसेनाहींसे झाले.

"हे बघ विल्यम," वीस एक कदम गेल्यावर रेडी म्हणाले. परत यायचा रस्ता कसा शोधून काढायचा माहीत आहे तुला ? हीं झाड किती दाट वाढली आहेत आणि यातून रस्ता कांहीं नाहीं तयार केलेला."

"मी पण त्याचाच विचार करीत होतो रेडी. ती टॉम थंबची गोष्ट आहे ना, त्यात त्याने वाटेंत वाटाणे टाकले होते जागोजागीं. पण ते पाखरानींच पळवले सारे नि तो फसला."

"असं खरं. पण आपण फसून नाहीं चालायचं. आपण ती अमेरिकन पद्धति आणू या अमलात. आपल्या कुऱ्हाडींनें प्रत्येक दहा झाडानतर एका झाडाची साल थोडी तासायची, एकदा उजवीकडे नि एकदा डावीकडे. आणि यात त्रास काहींच नाहीं. वाटेने चालतां चालता लताच हें काम करायचं. तर आपण पण करू या आतां आरंभ. उज-

वीकडचं काम तूं कर कारण तुला तें सोपं जाईल आणि मी डावीकडचं झाड ताशीन. फार खोल नाहीं हं पण तासायचं, कुऱ्हाडीच्या नुसत्या वजनानें देखील होत हें असं काम बघ."

"वा वा! कल्पना मोठी छान आहे हं रेडी."

"पण माझ्याजवळ आणखीं एक आहे सोबती; हें आपलं छोटं होकायंत्र. झाडावरच्या खुणा आपल्याला नुसता रस्ता दाखवतील पण हा दोस्त दिशा दाखवील. आत्तां आपण उजवीकडून चाललों आहोंत हें आपल्याला माहीत आहे. पण पुढें वांकणं वाढत गेलीं कीं दिशा नाहीं कळायची; तेव्हा मग याचा उपयोग करावयाचा."

"हं, हें समजलं रेडी; पण हें पावडं कशा करता आणलं आपण?"

"अरे, आपल्याला गोड पाणी पण काढायचं आहे नाहीं का शोधून. वाळूंत खणून थोडं पाणी सापडेल आपल्याला, आणि त्या साठीं हें पावड. तुझ्या पपापेक्षा मी जगाचा अनुभव जास्त घेतला आहे त्यामुळें त्याना सहज न आठवणाऱ्या गोष्टी मला सुचतात; त्याचं एवढं आश्चर्य नको तुला वाटायला. अरे अनेक प्रकारचे हाल मी काढले आहेत. जगायच कीं मरायचं, जगायच तर कसं याचा विचार मला अनेक वेळा या पूर्वी करावा लागला आहे. त्याच प्रमाणें लोकांच्या असल्या प्रकारच्या अनेक गोष्टी माझ्या कानांवर पण आल्या आहेत. आणि अडचणींच्या वेळींच आपली बुद्धी जरा चाळवली जाते आणि तिला चागली धार चढते. गरज ही शोधकतेची आई आहे, असें म्हणतातच ना नाहींतरी."

"आत्ता आपण कुठल्या बाजुला चाललों आहोंत, रेडी!"

"वारा ज्या दिशेला वाहतो आहे तिकडे चाललों आहोंत आपण. वारा आत्तां आपल्या पाठीकडून येतो आहे. असं बोट वर करून पहा म्हणजे कळेल तुला."

" नाहीं बुवा समजत कांहीं, " बोट वर धरून विल्यम म्हणाला.

" बोट ओलं करून धर वर, म्हणजे कळेल बघ. "

विल्यमनें तस करतांच त्याला वारा भासला. " पण हें कस हो झालं ? "

" अरे तुझ्या ओल्या बोटाला वारा लागतांच ते गार झाल, आणि तुला कळलं. पण हे कुत्रे कां असे भुकत पुढे पळताहेत ? "

" काय असेल हो रेडी ? "

" थांब, उभा रहा विल्यम, " आपली बंदुक सरसावीत रेडीनीं सांगितलें. " मी पाहातों पुढे होऊन. " बंदुक नीट हातात धरून रेडी मोठ्या सावध गिरीनें पुढे जाऊ लागले. कुत्रे अधिकच जोरानें भुकू लागले. इतक्यांत नारळाच्या झावळ्याखालून चार पाच डुकर एकदम बाहेर पडून ओरडत ओरडत धूम पळत सुटलीं आणि कुत्रे त्याच्या पाठीवर.

" वाहवा, वाहवा, " रेडी हासत म्हणाले. " ही गावठी डुकर मला अशीं भेवडावतील अशी नव्हती बुवा माझी कल्पना ! ए रॉम्युलस, ए रीमस, चला या मागें ! हा पहिला प्रसंग बरका आपल्यावरचा. "

" यापेक्षा नसले भयंकर आणखीं प्रसंग, तर काहीं हरकत नाहीं. पण मीं खराखुराच घाबरलों होतों हं रेडी. "

" काहीं नवल नाहीं त्यांत. कारण रानटी जनावर किंवा तसंच म्हटल तर रानटी लोक सुद्धा असतील या बेटावर. पण भीति वाटण निराळं आणि घाबरणं निराळं. घाबरून माणूस पळून जाईल, नुसता भिऊन, पळून नाहीं जाणार. "

" पण काहींहि झाल तरी तुम्हाला संकटांत सोडून पळून नाहीं जाणार मी. "

" माझी खात्री आहे तशी. पण तरीहि भलतच साहस मात्र नाहीं करता कामा हं तूं. हं, चला आतां पुढें, पण आधीं हा घोडा

उतरवतो बंदुकीचा. तो असा उतरविण्याचा विसरल्यामुळे पुष्कळ वेळां अपघात घडतात. तर ध्यानात ठेव नीट, गोळी झाडण्याच्या वेळे-पर्यंत चाप चढवायचा नाहीं बंदुकीचा."

मग एक तास दीड तास दोन्ही बाजूच्या झाडांवर खुणा करीत ते त्या नारळीच्या राईतून चालले होते. आणि मग विश्रांती नि न्याहारी साठीं ते खालीं बसले.

"कुत्र्याना पाणी नको देऊ हं, विल्यम; आणि खारवलेलं मास पण. नुसती बिस्किट द्यायचीं त्याना. का माहीत आहे का? त्याना नीट तहानच लागली पाहिजे. आणि आपण सुद्धा फार पाणी नाहीं प्यायच ह. कारण जेवढं जास्त पिशील तेवढी तुझी तहान वाढतच जाईल."

"मग हे खारवलेलं मास नाहीं फार खाता उपयोगी."

"अगदीं बरोबर; पाणी सापडेपर्यंत जेवढं कमी खाशील तेवढं चागल."

"पण आपण कोवळे नारळ पाडू कीं पाण्यासाठीं."

"खर. त्या बाबतींत दैववान आहो आपण. पण निवळ त्या-वरच नाहीं भागायच आपल सारं वर्ष. चल तर, दमला नसलास तर पुढें जाऊ या."

"चला तयार आहे मी. पण हीं तींच तीं झाड पहाण्याचा मात्र कंटाळा आला आहे मला."

"मग जरा पाय उचल जोरात. कारण माझ्या कल्पनेप्रमाणें आपण निम्यापेक्षा अधिक मजल मारली आहे;" रेडी म्हणाले.

रेडी नि विल्यम मग फारसं न बोलता अर्धा पाऊण तास चालत होते. चालताना एक गोष्ट त्याच्या लक्षात आली कीं, पाया-खालच्या जमीनीला कधीं चढ तर कधी उतार, असं बराच वेळ चालल होतं.

" हा असाच चढ उतार आहे या भागात ते बरं आहे विल्यम. कारण इथेच पाणी सापडण्याचा जास्त संभव आहे. "

" आणि हा तर बराच चढ दिसतो आहे पुढें, टेकडीच दिसते आहे ती जवळ जवळ. "

" आता जमीनीचा चढउतार जास्तच त्रासदायक होऊ लागला. नारळीची झाडे पण दाट झालीं. होकायंत्राकडे पहात पहात त्यांचा प्रवास चालूच होता. पण जरा वेळाने विल्यम दमल्यासारखा दिसूं लागला, कारण त्या दाट झाडीतून वाट काढणं फारच बिकट झालं होतं.

" किती मैल चाललों असू हो आपण, रेडी ? "

" आठ एक मैल असेल, मला वाटत. "

" बस, एवढेंच ! "

" हो, तासाला दोन मैलापेक्षा काही जास्त नाही चाललो आपण. असं झाडावर खुणा करीत आणि दिशा पहात पहात चालण असंच सथ असत. पण आता आपण या टेकडीच्या माथ्यावर आलों आहो तर पुढे झाडी जरा विरळ झालेली दिसते आहे मला. "

" होय कीं रेडी; वरचं निळं आकाश पण दिसत आहे आता. "

" तुझे डोळे तरणे आहेत माझ्यापेक्षा तेव्हा दिसत असेल तुला. पण आता कळेलच तें लौकर. "

ते आता एका सखल जागेवर उतरले पण जरा वेळाने त्याना परत चढ लागला. आणि त्या चढाच्या माथ्यावर आल्याबरोबर विल्यम ओरडला: "तो पहा, तो पहा रेडी, समुद्र दिसतो आहे! तो पहा समुद्र! "

" अरे हो; मला देखील आनंदच झाला आहे विल्यम. "

" त्या गचाळ झाडींतून बाहेर पडतो कीं नाहीं असं वाटल होतं मला, " विल्यम म्हणाला आणि तो अधीरपणे पुढे घुसला आणि चार

पांच मिनिटातच झाडी बाहेर मोकळ्या जागेवर जाऊन उभा राहिला. रेडीहि त्याच्या मागोमाग येऊन पोचले आणि ते दोघेहि एक दोन क्षण शांतपणें समोरील देखाव्याकडे पहात उभे राहिले.

“ ओः ! किती छान दिसतो आहे देखावा ! आईला तर फारीच पसंत पडेल हे ठिकाण. ते पहिलं ठिकाणच सुंदर आहे असं वाटलं होत मला, पण ही जागा तर त्याच्या तोंडात मारण्यासारखीच आहे. ”

“ आहे खरच सुंदर हं, ” रेडी विचार करीत म्हणाले.

खरोखरीच ते दृश्य मोठं रमणीय होतं. किनाऱ्यापासून एक दोन फर्लांगानंतर नारळींची सुंदर राई सुरू झाली होती. आणि आता ते राईबाहेर उभे होते तिथून चाळीस फुटापर्यंत एकदम उतार होता आणि त्याच्यापुढें लहान लहान झुडुपानी आच्छादिलेली उंच टेपाड विखु रलीं होतीं. आणि मग त्याच्याहि पुढें पन्नास पाऊणशे कदमावर समुद्राची मर्यादा. त्या लांब पट्टीवर पांढरी शुभ्र चकचकीत वाळू पसरली होती आणि कांही ठिकाणीं खडकाचे चिंचोळे हात त्या वाळूला कुरवाळण्यासाठीं किनाऱ्यावर घुसले होते. खडकाच्या आगावर लाटाचा खेळ चालला होता आणि त्याच्या बाजूला नि समोर दूरवरपर्यंत स्वच्छ निळंभोर पाणी शांतपणें हेलावत होतं. खडकांच्या पलंगावरून समुद्रपक्षांचे थवे आराम घेत होते तर कांहीं चीत्कारत वर उंच गिरक्या घेत फिरत होते, आणि मधूनच खालीं तीरासारखीं झेप घेऊन चोंचीत मासा पकडून परत फडफडत वर उड्डाण करीत होते. किनाऱ्याचा आकार नालाकृति दिसत होता आणि समोर अथांग महासागर शांतपणे विस्तारला होता आणि ती समोरची क्षितिज रेषा अत्रुटित अशी कितीतरी दूरवर स्पष्टपणें दिसत होती.

रेडी कांहींच न बोलता आपल्या आजूबाजूचें नि समोरचें दूरवरचें

क्षितिज शांतपणें पहात होते आणि मग त्यानीं आपली दृष्टी एकदां आत बेटाकडे वळवून ते म्हणाले. " आता आपल्याला पाण्याच्या तपासाला लागलं पाहिजे आधीं. "

" पण इतके गंभीर का दिसताहात रेडी ? "

" कारण माझ्या कल्पनेप्रमाणें आपल्या जवळपास दुसरं बेट नाहीं दिसत मला; म्हणजे इथून सुटण्याचा संभव कमी. आणि हे समोर पाणी फारच खडकाळ दिसत आहे, मग आत यायला वाट ? पण आधीं आता पोटपूजा करू या आपण आणि मग सावकाश करूं निरीक्षण. "

त्यानीं मग जवळच्या दोन झाडावर दोन खोल नि रुंद अशा खुणा केल्या आणि ते खालीं बसून त्यानीं नि विल्यमनें भुकेला घांस देण्यास सुरवात केली. खाणं होताच रेडी तसेच खालीं पाण्याजवळ गेले आणि त्यानीं मागें दृष्टी टाकली. पावसाळी पाणी कुठल्या बाजूनें वहात येतं हे ते पहात होते. "त्या तिकडे एक दोन जागा दिसताहेत," हातानें तिकडे दाखवीत रेडी म्हणाले; " त्या जागा नीट तपासून पाहिल्या पाहिजेत. पण त्याच्या आधीं या किनाऱ्याचंच नीट निरीक्षण करूं या आपण. आत येण्याचा मार्ग पाहिला पाहिजे आपल्याला. कारण तो जर नाहीं सापडला तर मग आपलं सामान इकडे आणण मोठं मुष्कीलीचं होईल; अर्थात इकडे यायचं ठरलं तर. तर आधीं आज ही तपासणी नि मग उद्या गोडं पाणी. "

" ते कुत्रे पहा रेडी, खार पाणी पिताहेत; गरीब बिचारे ! "

" त्यांना आवडायचं नाहीं ते पाणी; ते अत्ताच पहा कसं करताहेत ते. पण चल आता, त्या टोंकापर्यंत जाऊन पाहूं या आपण कुठे खडकांत वाट दिसते का नाहीं ती. सूर्य आता कलला आहे आणि मग आपल्याला झोंपेची पण कांही सोय पाहिली पाहिजे

" पण तें काळं काय दिसत आहे तिकडे वाळूंत ? "

" अरे वा, चागल आहे कीं! कासव आहे ते विल्यम. अंडीं घालण्यासाठीं येतात तीं किनाऱ्यावर या वेळीं आणि वाळूत पुरून ठेवतात तीं आपलीं अंडी. "

" आपल्याला पकडतां येतील तीं ? "

" हो, त्याच्या पुढल्या बाजूने हळूच गेल तर येतील. मागून गेलं तर आपल्या त्या मऊ पजानीं वाळू उडवतील आपल्या डोळ्यात तीं आणि जातील निसटून. त्याच्यापुढे जायच झपाट्याने आणि त्याचे पुढचे पाय पकडून त्याना उलटीं पाठीवर पाडायचीं पटकन, कीं त्याना परत सुलट नाहीं होता येत. आपण इकडे आलों राहायला कीं आपण एक पाण्याजवळ खडकात त्याच्यासाठीं एक पॉंड करू तयार उच भिंत घालून आणि त्याना पकडून त्या लहानग्या तळ्यात देऊं ठेऊन. म्हणजे आपल्याला हव तेव्हा त्याना परत धरता येईल. "

" ह, ही छान आहे ह युक्ती तुमची रेडी; " विल्यम म्हणाला.

" ते तिकडे एक बरच मोठ बेट दिसत आहे बघ. पण आपल्या वाऱ्याच्या विरुद्ध दिशेला आहे ते. म्हणून त्यावर जाण फारस सोप नाहीं आहे. पण आज एवढच पुरे; आता झोंपायला जागा काढूया शोधून चागली. "

ते मग परत फिरले आणि नारळींची राई जिथून सुरू झाली होती तिथे एका उचवट्यावर त्यानीं पडलेले झाप पसरल आणि एक मऊ बिछाना तयार केला.

" चला, आता झोंपूया आपण विल्यम. तो सूर्य पहा गेला अस्ताला. " रेडी म्हणाले.

" आपल्या कुत्र्याना थोडं पाणी पाजू का हो रेडी ! तो पहा रीमस ती बाटलीच चाटतो आहे बिचारा. "

" अहं, मुळींच देऊं नको. क्रूरपणा वाटतो हा, पण उद्या त्याची मदत पाहिजे आहे मला गोडपाणी शोधून काढायला. तर आता आधीं देवाचं स्मरण करूया आणि आपला भार घालूया त्याच्यावर. उद्या काय होईल ते काही सागता नाहीं येत आपल्याला. गुड-नाइट!"

× × × ×

इंग्लंडातल्या आपल्या घरातल्या खोलींत उबदार अंथरुणावर झोंपल्यासारखेच ते दोघे अगदीं गाढ झोंपले होते; आणि ते जागे झाले त्यावेळीं सूर्य वर आला होता. त्याच्याजवळ बसलेले दोन्ही कुत्रे तहानेनें व्याकूळ झालेले दिसत होते. त्याच्याकडे पहातांच विल्यमचे हृदय कळवळलें. " ह, विल्यम, आता निघण्यापूर्वी काही खायच कीं आधीं भटकून यायच?" रेडीनीं विचारलें.

" रेडी, त्याना सोडून माझ्यानें एक थेंब भरहि पाणी नाहीं पिव-वणार आणि मला सुद्धा तहान लागलीच आहे."

" तुझ्या एवढीच मला देखील त्या मुक्या प्राण्याची कींव येते आहे विल्यम. पण त्याच्या नि आपल्या दोघाच्या कल्याणासाठींच पण मी पाणी पाजणार नाहीं आहे त्याना. तर आपण आधीं त्यासाठींच बाहेर पडूया. पाण्याचा प्रवाह ज्या बाजूने वहात असेल पावसाळ्यात ती जागा बघूया अगोदर." ते तिथे जाऊन पोचताच कुत्र्यानीं ती सारी जागा तीनचार वेळा हिंडून हुंगली आणि मग ते धापा टाकीत स्वस्थ बसले.

" पाहिलस विल्यम, पाण्याची संभाव्य जागा ते कसे शोधतात ते? पाण्यापासून आपण काहीं फार लाब नाहीं आलों नाहींतर पाहिलं असतं वाळून खणून."

" वाळून!—पण तें खार नसेल का?" विल्यमने विचारलें.

" नाहीं समुद्रापासून पुरेसं दूर असेल तर नाहीं. कारण या वाळू-

५

तून पाणी नीट चांगलं गाळून गाळून येतं आणि आपण जर बऱ्याच अंतरावर खणलं तर चांगलं गोड पाणी सापडतं आपल्याला."

"ते पहा रेडी, ते पहा ते कसे जोराजोरानें त्या खोलगटांत उकरताहेत ते!"

"शाबास, शाबास! मला भीति पडली होती कीं आपल्याला पाणी सापडणार कीं नाहीं म्हणून. पाहिलंस कसा झाला फायदा जरा कठोर झालों आपण म्हणून. नाहीतर आपल्याला हें बेट सोडावं लागलं असतं. पण आधीं आता त्या बिचाऱ्याना आपण मदत करूया आपलीं पावडीं घेऊन; म्हणजे त्यांच्या श्रमांचं नि हालाचं चीज होईल लौकर."

मग त्या जागेजवळ जाऊन त्यानीं मोठ्या माराकुटीनें त्या कुत्र्याना बाजूला करून दोन तीन फूट खालीं खणलें आणि लगेच पाण्याचा एक लहान झरा आत झुरझुरू लागला. त्याबरोबर नाक आत खुपसून त्या कुत्र्यानीं आधीं पोटभर पाणी पिऊन घेतलं.

"पहा त्यांच्याकडे विल्यम; कसं समाधान वाटतं आहे त्याना पहा आता. त्याचेच आभार मानले पाहिजेत आपल्याला. ही एवढी एक कमतरता होती, पण तीच गोष्ट अत्यंत आवश्यक होती आपल्या सगळ्यांनाच. म्हणजे आता आवश्यक तेवढं सारं आहे या बेटावर—पण आपण समाधान मानलं तर हं! त्या पैशाच्या मागे लागून तळमळणाऱ्या लोकापेक्षां अधिक सुखी आहों आपण मग. बघ, आतां भरलं त्यांचं पोट. आतां करायची का न्याहारी?"

"हो हो; आता गोड लागेल मला तें. आणि मग मीहि पिईन पाणी पोटभर;" विल्यमनें उत्तर केलें.

"भरपूर पाणी होईल हें, मला वाटतं." आपल्या पिशव्या ठेवलेल्या जागेकडे येत असतां रेडी म्हणाले. "मात्र थोडं आणखी वर

सावलींत खणल म्हणजे झालं. पाणी आटणार पण नाहीं म्हणजे उन्हानें आणि गार पण राहील तें. इथे राहिलोंच आपण तर वर्षभर पुरेसं काम आहे बघ आपल्याला आत्तां आपण आहों या जागीं घराला छान जागा आहे मोठी "

" आतां एक काम राहिल." त्यांची न्याहारी आटोपतांच रेडी म्हणाले. " आपल्या होडीला या खडकाच्या वेढ्यातून आत यायला वाट काढली पाहिजे शोधून. त्या समोरच्या टोंकाजवळ लाटा किनाऱ्याजवळ फुटत नाहींसं वाटत आहे मला. म्हणून तिथून मार्ग असणं संभवनीय आहे, माझ्या मतानें. असलाच तर खैर झाली."

त्या जागीं जाऊन पोंचतांच त्याना रेडींचा तर्क बरोबर होता असं दिसून आलं. तिथे पाणी चागल खोल होत आणि बाहेर पडायची वाट पण चांगली रुंद होती. समुद्राचं पाणी संथ होतं आणि इतकं स्वच्छ होत कीं तळाजवळ घिरट्या घालणारे मासे चागल स्पष्टपणे वरून देखील पहाता येत होते. " तो पहा !" दूर तिकडे पन्नास साठ फुटांवर असलेल्या शार्कमाशाकडे बोट करून विल्यम म्हणाला. " तो पहा केवढा शार्क आहे तो, रेडी !"

" हा, पाहिला विल्यम. पुष्कळ असली पाहिजे त्याची वस्ती या बाजूला नक्की. आपल्या त्या बाजूपेक्षा इकडे एकाला पन्नास सापडतील बघ. ठीक पण. आता इकडे केव्हां यायचं त्याचा विचार केला पाहिजे आपल्याला."

" आज जायचं का आपण परत ?"

" हो, काही हरकत नाहीं दिसत. आत्तां बारा वाजले असतील. म्हणजे भरपूर वेळ आहे आपल्याला परत जायला. हे पावड कुऱ्हाड परत न्यायला नको. बदुक मात्र नेलीच पाहिजे. पण आधीं पाणी किती भरल आहे त्या खाड्यात ते बघू या."

रेडीनीं खणलला तो खड्डा पाण्यानें पूर्ण भरला होता. रेडीनीं तें पाणी चाखून पाहिलं. चागल गोड होतं ते. त्यांना अतिशय समाधान झालं तें पाहून. मग आनंदानें शीळ घालून त्यानीं कुत्र्यांना जवळ बोलावले आणि पावड कुऱ्हाड झांपाखालीं झाकून ठेऊन त्यानीं आपला परतीचा प्रवास सुरू केला.

त्यानीं केलेल्या खुणाच्या मदतीनें त्याचा प्रवास येतापेक्षां पुष्कळच झपाट्यानें चालला होता, आणि येताचा तो आठ तासाचा मार्ग त्यानीं जवळ जवळ आता दोन तासातच संपवला होता. झाडी आतां पुष्कळच विरळ झाली होती आणि वाऱ्याच्या झुळुका त्याच्या आगाभोंवतीं वागडू लागल्या होत्या.

"या वाऱ्यावरून आपण बहुतेक येऊन पोंचलोसं वाटत मला, रेडी," विल्यम म्हणाला; "पण अशी काळोखी आल्यासारखी का बरं वाटत आहे?"

"मी पण तोच विचार करीत होतो. मला वाटत वादळाची पूर्व-तयारी आहे ही बहुतेक; तर आपण जरा जोरात पाय उचलूं या आपला."

ते जात असता त्याच्या सभोवार होणारा माडाच्या झावळ्यांचा सळसळाट आणि वाऱ्याचा घुमल्यासारखा येणारा आवाज वाढू लागला आणि ते बाहेर मोकळ्यावर येताच वर आकाशाचा घननील वर्ण पार नाहींसा होऊन त्यावर काळी छाया दाटत आहे, अस त्याच्या दृष्टीस पडलं. रेडींचा तर्क बरोबर होता.

"वादळ होणारच थोड्या वेळात, विल्यम. तर आपण आधीं तंबूत जाऊन सर्व सामान नीट सुरक्षित ठेऊं या."

कुत्रे आता पुढे भुंकत पळत सुटले होते आणि त्याचा आवाज ऐकून सीग्रेव्ह नि जूनो तबू बाहेर आलीं, आणि रेडी आणि विल्य-

मला येतांना पाहून त्यानीं ती बातमी मिसेस सीग्रेव्हना दिली आणि दोन चार मिनिटातच मिसेस सीग्रेव्हनीं विल्यमला बाहुपाशात कवटाळला.

" तुम्ही परत आलात रेडी हे फार चागल झाल," त्याचा हात घट्ट पकडून सीग्रव्ह म्हणाले. " ही हवा फारच खराब दिसते आहे झालेली आत्ता."

" मला वाटतं वळवाचा पाऊस येणार आज सपाटून. पावसाळ्याचं पूर्वचिन्ह आहे ते. पण आम्ही चागली बातमी आणली आहे आणि या पूर्वसूचनेचा फायदा घेऊन शक्य तितक्या लौकर इथून आपल्याला हललं पाहिजे या नतर अजून दोन एक महिने सापडतील आपल्याला पावसापूर्वी. पण आज आधीं आपली बोट घेऊं या आढून किनाऱ्यावर. कारण समुद्र खवळून लाटा खूप दूरपर्यंत येतील धावून रात्रीच्या. त्याच्या तडाक्यापासून लांब आणून ठेवली पाहिजे आपली बोट. कारण तिची मोठीच मदत व्हायची आहे आपल्याला."

जूनो, सीग्रेव्ह, विल्यम नि रेडी या चौघानी मग आपल्या बरोबर पाच सहा लाब वासे घेतले आणि त्यानी ते बोटीच्या तळाखालीं सारीत सारीत त्यावरून त्यानीं ती बोट ढकलीत ढकलीत पाण्यापासून खूप लाब अतरावर आणून ठेवली.

" माझ्या मनातून ही दुरुस्त करून एकदा जहाजावरून फेरी टाकून यायच होतं. कारण आपल्याला उपयोगी अस पुष्कळच सामान अजून त्यावर असण्याचा सभव आहे. पण आता अस दिसत," वर आकाशाकडे दृष्टी टाकून ते म्हणाले, " कीं जहाजावर परत काहीं जाऊ शकणार नाहीं आपण. हा वारा कसा घुमतो आहे पहा आणि हे सीगल्स् त्यावर घिरट्या मारून कसे चीत्कारत आहेत. पण इथे थाबून नाहीं चालणार आपल्याला—आपले तंबू जरा जास्त सुरक्षित

केले पाहिजेत आज, कारण त्यांना भलत्याच वाऱ्याला तोंड द्यावं लागणार आहे, असं दिसतं.''

सीग्रेव्हच्या मदतीनें रेडींनीं मग आणखी एक एक ताडपत्री तंबू-वरून आंत पाणी येऊं नये म्हणून टाकली आणि त्यांची तोंडं चांगली ताणून बंद केलीं. जूनोनें हातात पावडं घेऊन तंबूच्या सभोंवार एक चर खणून तयार केला. हें सर्व काम चालू असतां रेडींनीं आपण काय काय पाहिलं त्याची सीग्रेव्हना माहिती दिली, आणि त्या गावठी डुकरांनी त्याची उडवलेली धाबरगुडी पण त्यानीं सागताच सगळ्यांचीच हंसून हंसून मुरकुडी वळली.

सूर्य अस्ताला गेला आणि बाहेर वाऱ्याचा जोर विलक्षण वाढला आणि लाटाची घन गर्जना किनाऱ्यावर जोराने घुमूं लागली. वृद्ध रेडींखेरीज बाकीचीं सर्व माणसं बिछान्यावर आडवीं झालीं होतीं. रेडी मात्र झोपण्यापूर्वी बाहेर उभे राहून वादळाच्या रौद्र दर्शनाचा लाभ शात चित्ताने घेत होते. होडीला टेकून आपल्या तीक्ष्ण करड्या डोळ्यानी ते निश्चलपणे समोर पहात होते. महासागराचं काळकुट्ट विशाल वक्षस्थल त्याच्या समोर अथाग पसरलं होतं आणि मधूनच डोक्यावर फेसाचा पांढरा मुकुट धरणाऱ्या लाटा उच उंच वर उसळत होत्या. '' ह ! हे परमेश्वरी दूत त्याच्याच आज्ञेने आज बाहेर पडले आहेत, आणि त्यांचं कार्य कसं एकमताने चाललं आहे—एक जण उसळू लागला कीं दुसरा पण उसळाला लागतो; आणि एकाचं घुमण्याचं संगीत सुरू होताच दुसऱ्याची संवादी गर्जना उठू लागते. —त्यांचा संताप नि सामर्थ्य आता एकमतानें थैमान घालतं आहे. पण एक आठवडाच जर हे आधीं बाहेर पडले असते, तर माझ्या-सारख्या म्हाताऱ्यावर अवलबून असलेले हे जीव—काय झाल असत यांचं ! आई, बाप, लहान मुलं आणि तें कोंवळं बालक, आणि मी

जीर्णगात्र म्हातारा—सारीं समुद्राच्या तळाशीं केव्हाच जाऊन तुझ्या बोलावण्याची वाट पहात राहिलों असतों, नाहीं बरं ! पण तुझ्या दयाळु हातानें त्याना आवरून धरल, आणि तुझ्याच कृपेने आम्ही आज असे सुरक्षित आहोत. आम्हाला येथपर्यंत वाहून आणणार हें जहाज सकाळपर्यंत तग धरील कीं नाहीं कोण जाणें ? बहुतेक नाहीच. परमेश्वराच्या या बलशाली दूताच्या सामर्थ्यापुढे दुबळ्या मानवी हातानी उभा केलेला हा लाकडी डोलारा किती वेळ टिकणार ! मातीच्या मडक्यासारख्या केव्हांच ठिकऱ्या उडतील त्याच्या; आणि त्याचे ते फुटके तुटके अवशेष उद्या सकाळला लाटाच्या या उकळत्या कटाहात असहायपणें नाचत राहातील. बर; पण एका अर्थानें उपकारच होईल आमच्यावर तो. कारण आमच्या या दुबळ्या हाताना किती दिवस लागले असते या सगळ्या फळ्या फोडून मोकळ्या करायला ? पण आता या लाटा त्यांना केव्हाच मोकळ्या करून आमच्या उपयोगासाठीं त्याना आमच्या पायांशींच जशा आणून सोडतील. ”

इतक्यात वर आकाशांत प्रचंड कडकडाट होऊन तो सारा भूभाग विजेच्या चमचमाटाने पार उजळला. पावसाचे सपाटे येंव खालीं सटसटूं लागले आणि काळोख इतका मिट्ट पसरला कीं रेडींना मोठ्या माराकुटीनेच आपला तंबू गाठता आला.

वाऱ्याचा आणि पावसाचा मग नंगा नाच सुरू झाला. वीजाच्या प्रचंड कडकडाटानें मुलं दचकून ओरडूं लागलीं आणि तीं परत लौकर झोंपी म्हणून जात ना. तंबूंच्या चौंहोबाजूनी पावसाच्या मुसळधार सरी त्यावर आपटत होत्या आणि वाराहि त्याच्या भोंवती सैतानासारखा नाचतच तंबू वर उखडून फेकून द्यायला पहात होता. दोऱ्याचे करकर आवाज होत होते नि तंबू आता उडून जातो कीं काय अशी भीति क्षण.क्षणाला वाटत होती. अखेरीस मध्यरात्रीच्या सुमारास बाहेरच्या बाजूला असलेला मिसेस सीग्रेव्हचा तंबू एकदम आवाज होऊन दोऱ्या

तोडून खालीं आदळला आणि मुलाच्या नि बायकाच्या किंकाळ्याचा एकच आवाज रेडींच्या कानावर आला. त्याबरोबर सीग्रेव्ह नि ते एक-दम तसेच तिकडे धावले. पण वाऱ्याचा नि पावसाचा जोर इतका विलक्षण होता आणि काळोख तर इतका मिट्ट कीं त्याना तबूखालीं जाऊन त्या सर्व माणसाना बाहेर आणता आणता त्याचा जीव अगदीं मेटाकुटीला आला. रेडींनीं पहिल्यानें टॉमीला उचलला, आणि त्याला आपल्या तबूंत आणून ठेवला. सर्व कपडे भिजल्यामुळें आणि भिऊन गेल्यामुळें त्याचें सप्तमसुरी संगीत आवेशाने चालू होते. विल्यमनें आल्बर्टला खाकोटीस मारून टॉमीजवळ आणून ठेवले. त्याच्या मागून कॅरोलिनला घेऊन जूनो बाहेर पडली आणि मग सीग्रेव्हनीं आणि रेडीनी मिसेस सीग्रेव्ह आणि लहान बाळाला बाहेर आणून दुसऱ्या तबूंत नेऊन सुरक्षित ठेवलें. सुदैवाने इजा अशी कोणालाच झाली नव्हती त्यामुळे घाबरलेल्या मुलाना शांत करून त्याना परत झोपवणं एवढच शिल्लक उरलं होत. बाकीचीं मात्र सृष्टीच ते रौद्र संगीत ऐकत उजाडेपर्यंत तशीच बसून राहिलीं होतीं. सकाळीं रेडीनीं बाहेर येऊन पाहिलं. वादळाचा जोर कमी झाला होता पण आकाश अजून निवळलं नव्हतं आणि ढगाची धावपळ अजून तशीच जोराजोरानें चालली होती. पाऊस अजून पडतच होता, खालची सारी जमीन अगदीं मऊ होऊन गेली होती, प्रचंड डोंगरी लाटा समुद्रावर उसळत होत्या आणि उसळणारा फेस कितीतरी दूरपर्यंत किनाऱ्यावर फेकला जात होता. क्षितिजरेषा अधुक अस्पष्ट झाली होती—आकाश पाण्याच्या भेटीचं स्थान नेमकं सागता येत नव्हतं आणि सारा किनारा जसा पाढऱ्या झालरीनें शोभत होता. रेडीनीं आपली दृष्टी जहाजाकडे वळ-वली. जहाज मुळींच दिसत नव्हतं पण त्याच्या मोकळ्या फळ्या, लाकडं आणि इतर सामान मात्र पाण्यावर इतस्ततः पिस्कारलं होतं.

—

: : ९ : :

आज प्रथम त्या पडलेल्या तंबूची दुरुस्ती करणं जरूर होतं. म्हणून ती वरील ताडपत्री त्यांनीं आधीं ओढून जरा कोरडी होण्यासाठीं दूर नेऊन पसरून ठेवली आणि आतील कपडे नि बिछाने पण बाहेर नेऊन वाळण्यासाठीं पसरले. "आता सायंकाळपर्यंत ती ताडपत्री पुष्कळच हलकी होईल आणि मग ती परत पसरणं सोपं जाईल. त्याच्या-पूर्वी आता आपण हें किनाऱ्यावर वाहून आलेलं सामान गोळा करून ठेऊं या, नाहींतर ते काही परत आपल्या हाताला लागणार नाहीं," रेडींनीं सीग्रव्हना म्हटले. त्यानाहि तें पटून मग तीं सारींजण बाहेर किनाऱ्यावर न्याहारी उरकताच गेलीं. रेडींनीं प्रथम एक भक्कम दोरी आणली आणि तिच्या मदतीनें किनाऱ्यावर वहात येणारी पिपे ते ओढून लांब आणून ठेऊं लागले. हे काम त्याना दुपारपर्यंत पुरलं. तरीसुद्धा अजून अर्धा अधिक माल किनाऱ्यावर पडलेलाच होता. तरीहि पण आता त्याना पडलेला तंबू उभारण्याचं काम असल्यामुळे हे सामान गोळा करण्याचं काम दुसऱ्या दिवसावर सोंपवून त्या सर्वांनी तो तंबू एकदाचा नीट उभा केला आणि रात्रीपुरती निवाऱ्याची सोय करून घेतली.

दुसऱ्या दिवशीं आकाश पूर्णपणें निवळलं, वाऱ्याचा जोर अजिबात कमी झाला आणि समुद्राचं रौद्र स्वरूप मावळून प्रशांत सरोवराचं रूप त्यानं धारण केलं. रात्रीं आणखीहि काही वस्तू किनाऱ्यावर येऊन पडल्या होत्या. आणि त्या परत वाहून जाणं शक्य नसल्याने तें सर्व सामान त्याना नीट गोळा करता आलें. त्याच ते काम चालू असता रेडींची स्वारी बोट दुरुस्तीला जुंपली होती. पण ती दुरुस्ती पूर्ण

व्हायला एकदोन दिवस तरी लागले असते; म्हणून सीग्रेव्हनीं विल्य-मला बरोबर घेऊन बेटाचा दुसरा भाग स्वतः पाहून यायचं ठरवलं. आता रेडी सोबतीला असल्यामुळें मिसेस सीग्रेव्हनीं त्याच्या जाण्याला आडकाठी केली नाहीं. म्हणून वादळाच्या तिसऱ्या दिवशीं विल्यम व सीग्रेव्ह बाहेर पडले. आता वाट दाखविण्यासाठीं झाडाच्या खुणा असल्यानें ते दोन तासातच बेटाच्या दुसऱ्या बाजूला येऊन पोचले.

" आहे कीं नाहीं ठिकाण सुरेख, बाबा ! " विल्यमनें विचारलें.

" निःसंशय बाळ; " सीग्रेव्हनीं उत्तर दिलें. "मला पहिलं ठिकाण अतिशय सुरेख वाटलं होतं, पण याची सर त्याला कधींच येणं शक्य नाहीं. तुमचा तो झरा पाहूं या चल आता."

झरा पाण्यानें पूर्ण भरून वहात होता आणि पाणीहि चागलं स्वच्छ होत. तिथून मग ते फिरत फिरत किनाऱ्यावर जाऊन प्रवाळाच्या एका खडकावर बसले.

" आपल हें बेट आणि या पॅसीफिक महासागरात हजारोनीं पसर-लेलीं बेटं, टांचणीच्या डोक्याएवढया चिमुकल्या प्राण्याच्या करामतीनें तयार झालेलीं आहेत, अशी कल्पना तरी येईल का कुणाला विल्यम ? "

" खरंच बाबा ! "

" अरे हो; तो तुकडा घे इकडे. हीं बारीक भोकं पहा याषरचीं. या प्रत्येक भोकांत एक लहान जीव रहात होता. आणि त्यांची जशी वाढ होऊ लागली तसे हे प्रवाळाचे शेंडे फादाडेपण वाढूं लागले. "

" हें कळलं; पण हें बेट कशावरून बनवलं यानीं ? "

" हीं सर्व बेटं यानींच बनवलीं आहेत. समुद्राच्या तळाशी प्रथम हे प्रवाळ वाढतात. मग त्यांची वाढ होत होत ते समुद्राच्या पृष्ठ भागा-पर्यंत वर येतात. पण मग वाऱ्यांच्या नि लाटांच्या माऱ्यामुळें त्यांची वाढ खुंटते. कारण त्यांच्या फांद्या त्यानीं फुटतात आणि तें आतले

प्राणी जगणार नाहींत म्हणून पाण्याच्यावर पण ते येत नाहीत. मग पुढे किती काळ लोटतो तें काही नक्की सागता येत नाहीं. पुढे मग कुठून तरी एखादा लांकडाचा ओंडका वहात येऊन त्यावर अडकतो. पण त्याच्यामुळे वाऱ्याला थोडाफार अडथळा होतो म्हणून त्याच्या आसऱ्याने मग प्रवाळांची त्या दिशेला वाढ सुरू होते आणि एक सपाट असा खडक तयार होतो. कसा, पाण्याच्या पृष्ठभागाच्या अगदीं जवळ. विश्रांतीसाठीं समुद्रपक्षी येऊन टेकतात त्याच्या वर मग आणि त्यांची विष्ठा आणि दुसऱ्याहि काही वाहून आलेल्या वस्तूमुळे पाण्याच्या वर तो खडक आस्ते आस्ते चढूं लागतो. आणि जमिनीवरून दूरवर आलेले काहीं पक्षी विसाव्यासाठीं त्यावर बसणं काही अशक्य नसतं. आणि त्याच्या विष्टेंत जमीनीवरील कसल तरी बी तिथे पडतं आणि त्यांचीं मग हळूहळू लहान झुडप झाड लागतात तयार व्हायला. मात्र याला किती वर्षांचा काळ लोटेल ते काहीं सागता येणार नाहीं."

"ह, हें शक्य आहे बाबा."

"म्हणजे आतां बेटाचा पाया झाला तयार बर का. आणि एकदा आरंभ झाला कीं मग पुढे वाढ होते लौकर. प्रवाळाना आता वाऱ्यापासून संरक्षण मिळत आणि त्यांची वाढ झपाट्याने चालू होते. असा त्यांचा विस्तार होतो. आतां पक्षी नुसते विश्राती साठींच नव्हे तर घरटीं बांधण्यासाठीं पण येतात या नव्या जमीनीवर. अशी याची वाढ सारखी होत राहते. यावरच एकादा नारळ वहात येऊन पडतो, रुजतो आणि त्याचे नारळ पुढे तिथेच पडत राहून त्याची भली मोठी राईच तयार होते. गमत आहे कीं नाहीं बाळ ? आपल्या एका इतक्या क्षुद्र जंतूकडून एवढ मोठं काम करून घेणाऱ्या त्या सृष्टिकर्त्याच केवढ अद्‌भुत सामर्थ्य आहे हें बर !"

"खर आहे बाबा."

" आपण फक्त डोळ्याचा उपयोग मात्र केला पाहिजे कीं आपण परमेश्वरावर भक्ति श्रद्धा निखालस ठेऊं. ही शिंप बघ, त्याचा सुंदर रंग बघ—किती नाजुक कुसर आहे ही; कोणाची कुशल कुचली असल सुदर काम करू शकेल ? "

" कुणाचीच नाहीं—मला नाहीं शक्य वाटत. "

" अस हजारो ठिकाणीं त्याचं कौशल्य विखुरलं असेल. या सागराच्या तळच सौंदर्य कुणी पाहिलं आहे ? पण त्याला काय आहे याचं. त्याच्या नुसत्या इच्छामात्रे करून या सर्व गोष्टी, या कानाचं त्या कानाला न कळता, अनत काळ चालत आल्या आहेत नि चालत राहणार आहेत. "

ते दोघेहि मग काहीं वेळ स्तब्ध बसले होते. अखेरीस सीग्रेव्ह उठल: " चल आतां विल्यम, परत जाऊ या आपण. सूर्यास्ताला तीन एक तास आहेत अजून; तोंपर्यंत आपल्याला घर गाठलंच पाहिजे. "

× × × ×

तिथून हलण्याची त्याची बहुतेक तयारी पुरी झाली होती रेडीनीं बोट दुरुस्त करून तिच्यात एक शीड उभारण्याची सोय पण केली होती. विल्यम आणि सीग्रेव्ह यानीं किनाऱ्यावर पसरलेल आणि वाहून आलेल सर्व सामान गोळा करून उचावर नेऊन ठेवल होत त्या पिंपातला आणि पेट्यातला माल ते आज नीट पाहू शकत नव्हते. आज नुसता त्याना साठवून ठेवायचाच कार्यक्रम चालला होता. जूनो आणि मिसेस सीग्रेव्ह नेण्याच सामान बाधून तयार करीत होत्या. तुफानानतर मग आठव्या दिवशीं रेडीनीं एका तबूचं सामान आणि सर्व बिछानें बोटींत नेऊन ठवले आणि त्यानीं विल्यमला बरोबर न्यायचं ठरवलं. तें सामान टाकून ते परत आल्यावर मग दुसऱ्या वेळेला अतिशय आवश्यक वस्तु त्यानीं घेऊन जायचं आणि त्याच

वेळीं बाकी सर्व मंडळींनीं पायीं पायीं बेटाच्या त्या दुसऱ्या बाजूला जायचं, असं ठरलं. आणि त्यानंतर मग पावसापूर्वी जेवढ्या मारतां येतील तेवढ्या खेपा बोटीनीं मारायच्या असं ठरवून रेडींनीं विल्यमला घेऊन आपली बोट हाकारली.

सकाळची शांत वेळ होती. वारा मजेशीर वहात होता आणि तो किनाऱ्याकडे वहात असल्यानें त्याना चांगलाच अनुकूल होता. "हें बरं आहे हं विल्यम; जाताना वारा पाठचा आहे तर नुसत्या शीडाच्या जोरावर आपण बोट नेऊं शकतो. आणि येताना बोट रिकामी तर आपल्याला वल्हवायला हलकं."

"किती मैल असेल हो रेडी हें त्या बाजुपासून?"

"सहा सात असेल, जास्त नाहीं, विल्यम. म्हणजे बेट रुंदीला कमी आणि लांबीला जास्त आहे असं दिसतं. आता सामान नुसतं उतरून टाकू किनाऱ्यावर आणि जाऊं या परत."

बोटींतील सामान थोड्याच वेळात उतरून झालं आणि त्यानीं तें झऱ्याच्या बाजूला एका उंचवट्यावर नेऊन ठेवलं. "इथे आपल्याला वारा कमी लागेल विल्यम; म्हणजे आपल्या तंबूना त्रास नाहीं होणार."

"आपल्या झऱ्याचं पाणी किती चढलं आहे ते पाहून आणि थोडं पाणी पिऊन मी येतों हं, रेडी," विल्यम म्हणाला.

त्याने परत येऊन सांगितलं कीं, इतकं सुरेख पाणी नव्हतं मी चाखलं कधीं, आणि आपला खड्डा पण पुरेपूर भरून वहातो आहे. त्यानीं मग आपली बोट परत हाकारली आणि दोन तीन तास वल्हवल्या नंतर ते पहिल्या जागीं परत आले. त्याचं स्वागत करण्यासाठीं टॉमी आणि मिसेस सीग्रेव्ह आपले रुमाल हलवीत वाळवंटात उभीं होतीं.

"आता मी येणार हं रेडी," टॉमी रेडींना म्हणाला.

"आज नाहीं हं बच्चा; जरा मोठा झालास कीं मग तू नि मी करू फेऱ्या हव्या तेवढ्या"

" मासा टॉमी, तुम्ही दूध काढाला चला बकरीचं; " जूनो म्हणाली.

" हा, हां, टॉमी काढणार दूध, " जूनोच्या पुढें धांवत जात टॉमी म्हणाला.

" तुम्हाला हें रोज रोज खारवलेलं मास खायचा कंटाळा आला असेल नाहीं, मॅडम ? " ते फराळाला बसल्यावर रेडी म्हणाले. " पण आपण एकदा त्या बाजूला जाऊन पोंचलों कीं मग आपण करू कांही निराळी व्यवस्था. सध्यातरी काबाड कष्ट आणि जाडं भरडं अन्न, असंच चालणार काही दिवस. "

" मुल जोंपर्यंत टाकठीक आहेत, तोंपर्यंत नाहीं त्याची फिकीर. पण तुमच्या सांगण्यावरून त्या बाजूला नंदनवनच असेलसं वाटत आहे मला. कधीं निघायच आपण रेडी ? "

" अजून दोन दिवस नाहीं, मॅडम. कारण तुम्ही तयार केलेलें हे सामान तर तिकडे जाऊन पोचल पाहिजे. उद्या तुम्ही जर जूनोला मोकळी केलीत तर ती आणि विल्यम पायीं पायीं तिकडे जातील, आणि मग तंबू उभारून करूं तयार. "

दुसरे दिवशीं इतर कोणी उठण्यापूर्वी रेडीनीं सामान भरून आपली बोट हाकारली आणि त्यातल सर्व सामान किनाऱ्यावर उतरून झाल्यावर बीफ नि बिस्किटाचा समाचार घेत ते जरा स्वस्थ बसले. म्हणजे त्यांच शरीर स्वस्थ होत पण मन मात्र तंबू कुठे ठोकायचा याचाच विचार करीत होतं.

दहाच्या सुमाराला हातातल्या दोरीनें बकरीला मागून ओढीत विल्यम राईच्या बाहेर पडला. इतर बकऱ्या त्याच्या मागून येत होत्या. त्याच्या मागें जूनो एका मेंढीला दोरी लाऊन घेऊन येत होती आणि बाकीच्या मेंढ्या निमूटपणें मागून येत होत्या. " हे पहा आम्ही आलों, रेडी ! " विल्यम हसत म्हणाला. " काय या शिंचानीं त्रास दिला

येताना. ही नॅनी झाडाच्या एका बाजूला तर मी दुसऱ्या, असा प्रकार चालला होता सारखा. आणि आजहि आपल्या त्या डुक्कर कंपनीनें गंमत केली जूनोची. काय किंचाळली आहे ती म्हणता, त्यांना पुढे पळतांना पाहून!"

"मला तीं रानटी असं वाटलं, मासा;" जूनो म्हणाली. "आहा! किती छान आहे ही जागा; मिसिसला तर खूप खूप आवडेल ही."

"होय जूनो, त्यांना फारच आवडेल, आणि तुलापण आवडेल. धुवायला आंघोळीला पाणी खूप आहे इथे, बरका."

"आपलीं तीं कोंबडी कशीं आणायचीं इथे पण. तीं अजून पार रानटी काही नाहीं बनलीं, पण ती हातात नाहीं सापडत मात्र."

"अरे तीं रात्री तंबूत परत आलीं कीं नाहीं, की आणू त्यांना आपण पकडून."

"आणि तीं कबूतरं नी डुकर! त्यांना अशींच द्यायचीं का सोडून मोकळीं?"

"तेंच बरं मला वाटतं;" रेडी म्हणाले.

"म्हणजे मग तीं बंदुकीनीं हवीं तर मारायला?"

"असं तर खरं, विल्यम. इथे जर खूप दिवस राहावं लागलं आपल्याला तर येईल ती वेळ. नाहींतर तसं भरपूर अन्न आहे आपल्या जवळ. पण आता तंबू उभारून सामान लावूं या त्यात. कारण तुझी आई अगदीं दमूनच येईल, चालून आली कीं. तिची सोय आधीं हवी करून ठवायला, नाहींका."

"तिची प्रकृती पुष्कळच सुधारली आहे. आणि आता या सुंदर जागेंत तर ती लौकरच पूर्ण बरी होईल."

"आपल्याला पुष्कळ कामं आहेत या वर्षी. पण पुढल्या वर्षी आपलं राहणं मात्र पुष्कळच सुखाचं होईल. आधीं आपल्याला एक

घर बांधलं पाहिजे, आणि त्याला खूप दिवस लागतील. मग एक छोटी बाग करू तयार आपण. तुझ्या बाबांनीं खूप बियाणं आणलं आहे इंग्लडहून."

"वा वा, मग काय गमतच होईल; आणि मग काय करायचं?"

"मग एक कोठीसाठीं घर बांधाव लागेल, आपल्या तिकडे पडलेल्या साऱ्या सामानासाठीं. आणि त्यासाठीं आपल्या या छोटया बोटींतून किती खेपा लागतील टाकायला, त्याचा कर विचार "

"होय, तें खरं आहे हं रेडी. पण मग काय उगल करायचं?"

"अरे त्याला काय तोटा. एक माशासाठीं तळ नी एक कांसवासाठीं, असं हव तयार करायला. आणि एक स्नानासाठीं जागा. पण त्याच्या पूर्वी त्या झऱ्याच्या जागीं एक चागली विहीर हवी खणून तयार करायला; कीं मग गोड्या पाण्याचा तोटा नाहीं कधींच. म्हणजे हें सर्व मिळून एक वर्षाला पुरेस काम झालं कीं नाहीं?"

"एकदा आई नि मुलं येऊ द्या इथे, कीं जोरात करू मग आपण काम."

"ते सारं लौकर माझ्या डोळ्यांसमोर हव आहे पुरं व्हायला," रेडी म्हणाले. "हें सारं पुरं होईपर्यंत देवानें मला आयुष्य मात्र द्यावं."

"अस काहो म्हणतां रेडी? तुम्ही म्हातारे असलात तरी तुमची प्रकृती अगदीं उत्तम आहे रेडी."

"आत्ता आहे खरी; पण बायबल काय म्हणतं?—'जीवनातच मृत्यु लपलेला आहे.' तूं अजून मोठा व्हायचा आहेस, आणि पुढें पुष्कळ आयुष्य आहे तुझं शिल्लक; तरी सुद्धा तुला उद्याच बोलावणं

येणार नाहीं, असा काय नियम आहे? मग मी तर काय, शिणलेला, झिजलेला बुड्ढा—अधिक आयुष्याची मी कशी अपेक्षा करायची! अ ह—विल्यम! तरी सुद्धा माझी गरज असेपर्यंत राहणार मी असं वाटत आहे मला; आणि मग अगदीं शांतपणे डोळे मिटीन मी. हें बेट सोडण्याची माझी काहीं इच्छा नाहीं; आणि मला राहून राहून असं वाटत आहे कीं माझी हाडं इथेंच पडणार. ईश्वराची इच्छा असेल तसं होईल!"

ते बोलायचे थांबल्यानंतर मग दोघेहि काहीं वेळ अगदीं स्तब्ध होते, पण हात मात्र तंबूचा कॅनव्हस पसरण्याचं काम निमूटपणें करीतच होते. अखेरीस खुंट्या मारून झाल्यानंतर विल्यमने शांततेचा भंग केला.

"तुमचं पहिलं नाव मास्टरमन आहे नाहीं?"

"होय विल्यम."

"जरा चमत्कारीक वाटत नाहीं तें! दुसऱ्या कोणा माणसावरून पडलं आहे का नाव तें?"

"होय, विल्यम, मोठे श्रीमंत गृहस्थ होते ते. माझं आयुष्य मोठं मनोरंजक आहे विल्यम, आणि पुष्कळच शिकतां येईल तुला त्या पासून. पण आपलं काम सगळं पुरं होईपर्यंत नाहीं तें सांगणं शक्य. साठीची उमर आहे आज माझी, आणि खलाशी लोक इतके दिवस फार करून नाहीं जगत. कारण हें आयुष्य फार खडतर असतं हें एक आणि शिवाय दारू पिणं; आणि अतिशय बेदरकारपणें हे लोक वागतात नेहमीं."

"पण तुम्ही तर हल्लीं नाहीं काहीं पीत."

"नाही मुळींच नाहीं विल्यम. पण तरुण वयांत तो गाढवपणा मीहि केलाच आहे. चला, जूनो, तीं आंथरुणं आण आतां

आत. अजून तीन तास वेळ आहे आपल्याला, तर आतां काय करूं या बरं?"

"चूल केली तयार तर!"

"तेंच सांगणार होतों मी, नसतंस सुचवलंस तर. उद्या मीच येईन तुमच्या सगळ्यांच्या खूपच अगोदर. आणि तुम्ही येईपर्यंत न्याहारी अगदीं तयार ठेवीन तुमच्यासाठीं."

"मी बाटली आणली आहे एक पाण्याची आपल्याबरोबर. तेवढीशी पाण्यासाठीं कांहीं नाहीं, पण बेबी साठीं दूध न्यायला."

"शाबास विल्यम; अकलेबरोबर मायाळूपणा पण दाखवलास तूं या वेळीं. मग दूध काढल्यानंतर बकऱ्या सोडून द्यायला कांहीं हरकत नाहीं. आता त्या फार दूर नाहीं भटकणार. इथें त्यांना चरवण खूप आहे."

एका तासा भरांतच मग रेडीनीं चूल बांधून तयार केली आणि जूनोनें दूध काढल्यानतर विल्यम आणि ती पायीं परत निघालीं. रेडी खालीं किनाऱ्यावर आले. त्यानीं एक लहानसं कासव जवळच पाहिलं. ते हळूच त्याच्या बाजूनें पुढे गेले आणि त्यानीं तें उलटून टाकलं. "उद्यांच्या न्याहारीसाठीं होईल हे," ते म्हणाले आणि मग बोटींत पाय ठेऊन त्यानीं वल्हे उचललें.

---

## : : १० : :

त्या रात्रीं जेवणानंतर सर्वजण झोंपी गेल्यानंतर रेडी आणि विल्यमनी सान्या कोंबड्याचे पाय बांधून तीं एके जागीं तयार ठेवलीं आणि ते पण झोंपी गेले. सकाळीं दिवस उगवताच सारींजण कपडे करून तयार झालीं आणि मिसेस सीग्रेव्हच आटोपल्यानंतर त्यानीं तो पण तंबू पाडून बाधून तयार केला आणि तो बोटींत नेऊन ठेवला. त्याची सकाळची छोटी हजेरी मग त्यानीं झटपट उरकून तेंहि सर्व सामान बोटींत चढवल गेल आणि त्यांच्या डोक्यावर तीं रात्रीं तगडया बाधून ठेवलेलीं कोंबडीं विराजमान झालीं. रेडी मग एकटेच आपली बोट घेऊन निघाले. त्याच्या मागोमागच इतर मंडळीनीं त्या नारळींच्या राईतून आपला प्रवास सुरू केला. कुत्रे बरोबर घेऊन विल्यम पुढे, आल्बर्टला घेऊन सीग्रेव्ह, कॅरोलीनला घेऊन जूनो आणि शेवटीं टॉमीचं बोट धरून त्याची आई. त्यानीं त्यांच्या त्या तात्पुरत्या निवासस्थानाकडे नि जहाजाच्या फुटक्या तुटक्या अवशेषाकडे एकदा शेवटचा दृष्टिक्षेप केला नि त्यानीं पाऊल उचलले. आणि थोड्याच वेळात तीं झाडींत दिसे नाहशी झालीं.

इकडे निघाल्यापासून दोन तासातच रेडी नवीन जागेवर येऊन पोंचले. पण आतील सामान किनाऱ्यावर आणून टाकण्यापूर्वीं त्यानीं कालचं कासव मारून ते साफ धुतलें आणि त्यांतला काहीं भाग कापून त्यात थोडं खारवलेलं पोर्क टाकलं आणि तें भांड झाकण ठेऊन त्यानीं चुलीवर ठेवलें.

बोटींतून सर्व सामान काढून रेडीनीं तें तंबूत आणून ठेवल्यावर थोडी विश्राति घेतली, इतक्यांत कुत्र्याच भुकणं त्याच्या कानावर

आलं आणि त्याच्या मागोमाग पंधरा मिनिटानींच सर्वजण दमून उन्हाने जरा लाल झालेलीं अशीं त्याच्याजवळ येऊन दाखल झालीं.

त्याच्या सांगण्यावरून कॅरोलिन आणि टॉमी याना आळीपाळीनें कोणाला तरी कडेखाद्यावर घ्यावं लागलं होतं. आणि एकदा टॉमीला पाठुंगळी घेऊन विल्यम चालत असल्यामुळे तो वाट चुकला आणि त्याना जरा वेळ उगाच भटकावं लागलं. मधे एकदा त्यांची आई पण दमून गेल्यामुळे त्याना विसांवा देण्यासाठीं त्यांना अर्धा तासपर्यंत थांबावं लागलं होतं. आणि आत्ता सुद्धा त्या इतक्या दमल्या होत्या कीं तंबूत थोडा वेळ आडव्या झाल्याशिवाय त्या बाहेर येऊन कांहींच पाहूं शकल्या नाहींत.

" तुम्हीं जर नसतां रेडी तर आमची काय अवस्था झाली असती याचा पुरावा मिळाला आम्हाला या प्रवासात, " सीग्रेव्ह म्हणाले.

" तुम्ही आल्यानें माझ्या मनावरचं ओझं मात्र उतरलं खरं, " रेडी म्हणाले. " आणि आता आपलं जेवण झालं कीं आपण तंबू घेऊं उभारून. उद्या मग मला दोन चार खेपा मारून आपल्या कोठींतलं सारं सामान आणलं पाहिजे इथे. मग आपला इथला घर-बांधणीचा कार्यक्रम होईल सुरू. "

मिसेस सीग्रेव्हना आता पुष्कळ हुशारी वाटत होती, पण दमून भागून गेलेलीं मुलं मात्र स्वस्थपणें घोरत होतीं. म्हणून अर्धा पाऊण तास न्याहारीसाठीं त्याना सर्वांनाच थांबावं लागलं.

" एवढा सुरेख वास कसला येतो आहे पण रेडी ? " विल्यमनें वास घेत विचारलें.

" अरे, मेजवानी आहे तुम्हांला आज, मेजवानी ! खारवलेल्या मासाचा कंटाळा आला आहेना तुम्हाला ? "

" काय हो, काय शिजतं आहे एवढ ? वास तर खरंच छान सुटला आहे रेडी; " मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या.

" टर्टल् सूप आहे मॅडम. तुम्हाला आवडेल बहुतेक तो. आणि जर आवडला तर पुष्कळ वेळा आपल्याला करताहि येईल तो. "

" खरच झाला आहे छान; पण थोड मीठ हवं आहे त्याला. जूनो आण ग थोड मीठ. "

" थोडंच उरलं आहे आता मॅम; " जूनो म्हणाली.

" मग त्या तिथून आण की. खूप भरल आहे तिथें; " समुद्राकडे बोट दाखवीत सीग्रेव्ह म्हणाले.

" पण ते आणायचं कसं मासा ? " जूनोनें विचारले.

" पाणी उकळून किंवा इकडे कुठें तरी एक जागा तयार करून त्यात पाणी साठवून तें सावकाश उन्हानें वाळवून घट्ट होऊन द्यायच. उन्हाने पाणी जात आटून आणि मीठ उरतं खाली. असच करतात मीठ. "

" मी दाखवीन हं जूनो तुला ही सारी युगत. मग कर तयार पुष्कळ मीठ तू. " रेडी म्हणाले.

" हें नव्हत हं मला ठाऊक. मोठीच काळजी झाली दूर. आणि रेडी, तुम्ही आज खरीच मेजवानी दिलीत हं आम्हाला. "

जेवणानतर त्यानीं मग सायकाळपर्यंत तो दुसरा पण तबू उभा करून पुरा केला आणि मग परमेश्वराची त्या नवीन घरात त्यानें सर्वांना नीट सुरक्षित राखाव म्हणून प्रार्थना करून तीं सर्वजण झोंपीं गेलीं.

× × × × ×

सकाळीं सीग्रेव्ह आधीं उठून बाहेर आले आणि मग रेडी पण बाहेर आल्यावर ते त्याना म्हणाले: " रेडी, मला आज खरं बरं वाटत

आहे, आणि इथे आल्यापासून मनहि शांत झालं आहे माझं. त्या बाजूला त्या सर्व वस्तु मला वारवार आपल्या फुटक्या जहाजाची नि घराची आठवण करून देऊन अस्वस्थ करीत. पण इथे आपण जसे काही स्वखुशीनेंच रहायला आलों आहोंत असं वाटून बरं वाटतं आहे."

"आणि हाच विचार आतां अधिकाधिक बळावत जाईल पहा. आणि नुसती कुरकूर करण हें व्यर्थच; नव्हे, पातकच नव्हे का तें?"

"कबूल करतों मी आपली चूक, रेडी. आणि आजची काय कामगिरी ती आता सांगा."

"मला वाटतं गोड्या पाण्याची तरतूद करूं या आपण आज. तर तुम्ही आणि विल्यम—हा आलाच तो पण. गुड-मॉर्निंग विल्यम!—मी आत्ताच सांगत होतों कीं तुम्ही तो झरा करा स्वच्छ. मी आणखी एक पावड आणलं आहे काल, म्हणजे तुम्हाला दोघांना येईल काम करता. तिकडे उगमाजवळ आपलं मोठं पिंप आत बसेल एवढा मोठा खड्डा खणायचा, आणि त्यात तें पिंप बसवलं कीं तेवढं भरून तयार राहील पाणी नेहमीं. आपण पाणी भरे भरेतों तें पाणी पिंप परत भरलेलंच ठेवील."

"ठीक; तुम्ही येईपर्यंत करतो आम्ही ही कामगिरी."

न्याहारी उरकून रेडी निघून गेल्यानंतर त्या बापलेकांनीं बारा वाजे पर्यंत विहीर खणून तयार केली आणि मग ते तंबूत गेले. हा वेळ पर्यंत रेडी पण आपली बोटींतली प्रभात फेरी उरकून परत आले होते. म्हणून त्यासर्वांचं गप्पा गोष्टी करीत जेवण उरकल्यावर रेडींनीं एका मोठ्या पिंपाच्या तळाशीं दोन तीन भोंकं पाडलीं आणि मग तें पिंप त्या पाण्यानें भरलेल्या खाड्यात ठेवलें. त्याबरोबर हळुहळू त्याभोंकांतून पाणी आत येऊन तें पिंप खाड्यांत खालीं बसलें. त्याच्या बाजूनें मग

माती भरून काढल्याबरोबर त्यांची ती विहीर तयार झाली. जूनो खूष होऊन बाईना सागण्यासाठीं धावत धावत तंबूत गेली आणि तेहि विश्रातीसाठीं तंबूत आले.

" आतां आपल्याला पुष्कळच कामं करायचीं आहेत, तर मला वाटतं आपण कामाची नीट आखणी करूया रेडी; " जेवणानतर सीग्रेव्ह म्हणाले. " कोणत्याहि कामात पद्धतीला नेहमींच महत्त्व असतं. पुढल्या आठवड्याचा कार्यक्रम करूंया आपण तयार. आज रविवार आहे, पण आपल्याला तो कांहीं अजून तसा पाळतां येत नाहीं. यापुढे आपण तो साबाथ डे म्हणून—पवित्र असा पाळू या. "

" योग्य आहे तुमचं म्हणणं. सहा दिवस काम केल्यावर रविवार हा विश्रांतीसाठीं आणि प्रार्थनेसाठीं आपण पाळलाच पाहिजे. आणि आता आपला कार्यक्रम. आधीं मॅडमपासून आरंभ करू या का ? "

" आता माझी प्रकृती चागली आहे रेडी, आणि ती अशीच सुधारत जाणार नक्की. मी जूनोला सगळ्या घर कामात मदत करीन. आता मालकीण नि बाईसाहेब नाहीं मी. स्वयपाक, धुणं पाणी, मुलाकड पहाण त्याना शिकवण, शिवणटिपण, आणि मला दुसर जें काम करता येईल तें सार करणार आहे मी. "

" ठीक आहे; एवढ पुरे आहे आम्हाला मॅडम, आता घराच्या बरोबरीचं दुसर काम म्हणजे जमीन नांगरून बटाटे वगैरे लावणं आणि एक कासवासाठीं लहानसं तळं तयार करणं. हा त्याचा अडीं घालण्याचा हंगाम आहे. तर आत्ताच त्यांना पकडून आपल्या तळयात सोडलीं पाहिजेत त्यांना. "

" कबूल, पण आधीं कोणतं काम करायचं ? " सीग्रेव्हनीं विचारलें.

" आधीं तलाव. त्याला कांही फार दिवस नाहीं लागणार. नतर मी

इथून जवळच जिथे झाड अगदीं दाट असतील तिथलीं काही तोडून मधे मोकळी जागा तयार करीन. त्या जागेत आपली कोठी बाधू आपण. अजून महिना आहे पावसाळा सुरू व्हायला. त्याच्या आत झाड पाडून त्याचे हवे तेवढे ओंडके तयार करून ते चिरून पण ठेऊ आपण. कीं मग घर बाधायला फार दिवस नाहीं लागायचे. पण आता आधीं मी बोट घेऊन तिकडे जाणार आहें."

"कशासाठीं हो रेडी?"

"तुम्हाला ती दोन चाकी गाडी आठवते का? तुम्ही हसलात मी ती नीट गुडाळून कोठींत ठेवली त्या वेळीं. तिच्या चाकाचा आणि आसाचा उपयोग करू आपण. नारळीचे ओंडके त्या गाडीवर घालून आपल्याला कुठे हवे तिथे सहज नेता येतील. ते नुसते ओढीत नेण किंवा उचलून नेण सोपं नाहीं आहे तेवढ."

"एकदम मान्य, रेडी. पुष्कळच श्रम वाचतील त्यानें."

"हो, अस वाटतं आहे. आज आपण सगळया जागा निश्चित करू या. घराची, बागेची नि दोन्ही तलावाची."

सीग्रेव्ह आणि रेडी मग किनाऱ्यावर गेले आणि जरावेळ त्यानीं इकडे तिकडे पाहिल्यावर रेडी म्हणाले; "कासवासाठीं आपल तळ फार खोल नाहीं उपयोगाच. कारण आपल्याला तीं चटकन पकडता आलीं पाहिजेत. एक फार उच नाहीं अशी दगडाची भित उभारायची, त्याना चढता येणार नाहीं एवढी. हा इथला खडक चागला पाण्याच्या वर आला आहे आणि किनारा आणि पाणी याच्या मधलं अतरपण ठीक आहे हें. आणि ही किनाऱ्याकडची बाजूपण पुरेशी उंच आहे. म्हणजे जरा दोन्ही बाजूनीं दगड नीट लावले कीं आपलं तळ झालं तयार. सुटे दगडपण आहेत पुष्कळ या बाजूला. विल्यम आणि जूनो हें काम करतील पुर."

सीग्रेव्हनीं आपली टोपी हलवून विल्यम आणि जूनो याना खूण करून बोलावल आणि रेडींनीं त्यानीं काय करायचं ते त्याना नीट समजावून सागितल्यानंतर, ते दोघे प्रौढ बटाटे लावण्याची जागा ठरविण्यासाठीं निघून गेले.

"ही पाहिलीत जागा, मला बरी दिसते आहे ही बटाटे लावण्या साठीं;" एका जागेकडे बोट दाखवीत रेडी म्हणाले. "कुपण पण फार नाहीं लागणार घालाव. आधींपण हीं सर्व झुडप उपटून काढून ही जागा साफ करून घेतली पाहिजे, म्हणजे मग ती सारखी करून खणायला बरी पडेल. उपटलेलीं झाड नेऊन टाकण्याची कामगिरी आपला टॉमी खुशीनें करील."

ते दोघेजण मग रेडीनीं पाहून ठेवलेल्या दुसऱ्या जागेकडे गेले. त्या ठिकाणी झाडं काही विलक्षणच गर्दी दाटीने वाढलीं होतीं. "याच्या मध्यभागीं आपण जागा करू साफ आणि एक चौकोनी जागा तयार करून त्यावर आपलं कोठीघर काढू बाधून. भोंवतालच्या झाडाच हे अनायासेच एक भक्कम कुंपण मिळेल आपल्याला. फक्त मधून मधून आडवी लाकड बाधलीं याना कीं झाल कुपण मजबूत."

"त्याची जरूरी पडेलशी वाटते तुम्हाला रेडी?"

"काही सागता नाहीं येत. पण तयारी असावी नेहमीं सकटाना तोंड दण्याची; नाहींका?"

ते परत तबूशीं आले तो हाशहूश करीत विल्यम नि जूनो पण परत आलीं होतीं. मिसेस सीग्रेव्हनीं स्वयपाक तयार ठेवला होता आणि सर्वांना भुका पण चागल्या खणखणीत लागल्या होत्या. जेवण आटोपल्यावर मिसेस सीग्रेव्हनीं आपल्या पतींना टॉमीला आपल्याबरोबर घेऊन जाण्यास सागितलें; कारण त्याच्यावर नजर ठेवणं त्याना अशक्यच होत.

सीग्रेव्हनीं टॉमीला आपल्या बरोबर घेतला आणि त्यानीं जमीन साफ करण्याचं काम सुरू केल्यावर तीं उपटलेलीं झुडुपं नेऊन लाब टाकण्याची कामगिरी त्यानीं टॉमीला सांगितली. काहीवेळ दोघांचं काम नीट चाललं होतं. पण जरावेळानें टॉमीने मोठा गळा काढल्यामुळे सीग्रेव्ह त्याच्या जवळ जाऊन त्याला काय झालं म्हणून विचारू लागले. पण तो काहीच सांगेना आणि त्याच रड जोरातच वाढू लागल. अखेरीस त्याला उचलून घेऊन सीग्रेव्ह तंबू जवळ आले. त्याच्या ओरड्यानें रेडीपण धावत तंबू जवळ आले होते. काय झाल याचा तपास करीत असता ते म्हणाले: " मला वाटत काही तरी फळ मूळ खाल्लीं असतील या पठ्ठयाने. टॉमी कायरे खाल्लस तू मला सांग पाहू ? "

" तीं गटोळीं गटोळीं फळ, " टॉमीनें मोठा गळा काढून सांगितले.

" हं ! मी म्हटल नाहीं; " रेडी म्हणाले आणि ते त्या साफ केलेल्या जागेवर तीं फळ कसलीं ते पहाण्यासाठीं गेले. आणि त्याचे वडील त्याला एरंडेल देऊन त्याचं पोट साफ करण्यासाठीं म्हणून आपली औषधी पेटी पहाण्यासाठीं तंबूत गेले. बाटली घेऊन ते येतात तों रेडी परत आले होते. त्याना त्यानीं तें एरंडेल दाखविलें.

" काही जरूरी नाहीं त्याची. त्यानें आधींच त्या बिया भरपूर खाल्या आहेत. हें पाहिलत हें एरंडीचं रोप आहे मला वाटत. हींच फळं खाल्लीसना रे टॉमी ? " रेडीनीं त्याला फळे दाखवून विचारलें.

टॉमीनें रडत ओरडत होकार दिला.

" वाटलच मला ते. आता त्याला कढत पाणी द्या नुसतं प्यायला मॅडम, म्हणजे जरावेळानें होईल पोट साफ. आता पुन्हा नाहीं तो कधीं अशी फळ खाणार. नाहींना रे ? "

" नाहीं रेडी, आता नाहीं कधीं खाणार—नक्की ! "

तरी सायंकाळ पर्यंत तो तसा अस्वस्थच होता पण रात्रीं मात्र त्याला चांगली झोंप लागली.

सकाळीं सारीं माणसं आपआपल्या कामाला लागलीं होतीं. आल्बर्ट खालींच आपल्या आईच्या आसपास रांगत होता आणि टॉमीची स्वारी जमीनींत काठीनें भोकं पाडून आत लहान लहान दगड टाकीत होती.

" काय करतो आहेस रे टॉमी ? " आईनें विचारलें.

" बाग करतों आहें मी, " टॉमीने उत्तर दिलें.

" बाग करतो आहेस ! मग झाडं लावलीं पाहिजेत तुला. "

" अहं; झाडाचं बी लावतों आहें मी, हे बघ; " टॉमी दगड दाखवीत म्हणाला.

" अरे हे दगड आहेत वेड्या, बी नव्हे. "

" मग मी खोटं खोटं खेळतों आहे. "

" अशींच काल तीं फळं खोटीं खोटीं खाल्ली असतीस तर ? मग पोट दुखलं असतं का तुझं ? "

" आता नाही मी कधीं खाणार तीं. "

" तीं नाहीं खाणार रे; पण तसलंच दुसरं काही दिसलं कीं खाशील कालच्यासारखा, आणि पडशील आजारी. "

" पण मग मला ते नारळ कां नाहीं देत ? मला आवडतात ते. "

" पण इतक्या उंच कुणी चढायचं रे, टॉमी ? तूं चढशील ? "

" अं हं; पण रेडी, पपा किंवा विल्यम का नाहीं चढत ? "

" जरा या कामातून झाले मोकळे कीं काढतील मग, अरे पण तो आल्बर्ट बघ गेला तिकडे बोकडाजवळ. त्याला आण, नाहींतर मारील तो त्याला टक्कर. "

टॉमीची स्वारी तिकडे गेली आणि त्यानें आल्बर्टला उचलला पण तिकडून येताना त्यानें त्या बोकडाला एक लाथ ठेऊन दिली.

" अरे, असं नको करूं टॉमी; शिंगानीं धडक देईल ना तो. "

" ऊं:, मी नाहीं भीत त्याला ! " टॉमीनें उत्तर दिलें आणि एका हातानें बेबीला धरून त्यानें त्या बोकडाला आणखी एक लाथ मारली. त्याबरोबर त्या बोकडानें खालीं मुंडी करून टॉमीला एक धडक दिली; त्याबरोबर टॉमी नि आल्बर्ट दोघेहि खालीं जमीनीवर कोसळले, आणि दोघानीहि मग मोठा सूर काढला. त्याची आई लगेच धावत येऊन त्यांनीं बेबीला आधीं उचलून घेतले, आणि घाबरगुंडी उडालेल्या टॉमीने आईचा झगा घट्ट पकडला आणि पुन्हा स्वारी करण्याच्या विचारात असलेल्या बोकडाकडे भीत भीत पाहिले.

" ऐकत का नाहीं रे तू टॉमी तुला सांगितलेलं ? तुला म्हटलं नव्हतं मी तो धडक मारील म्हणून ? " बेबीला गप करीत नि बोक-डाला हाकलीत त्याची आई म्हणाली.

" मी भितो आहे खेटर त्याला, " दूर जात असलेल्या बोकडाला पाहून टॉमीनें उत्तर दिलं.

" आता असशील तर काय शूर तू, कारण तो गेला ना दूर ! मोठा द्वाड आहेस पण तू टॉमी, ऐकत म्हणून नाहींस सांगितलेलं. "

" पण मला नाहीं धडक मारीत तो ग आई, " कॅरोलिन म्हणाली.

" कारण तू नाहीं त्याला त्रास देत. पण हा तुझा भाऊ असाच त्रास देतो त्याला आणि मग बसतो असा ओरडत. आम्ही कुणी सांगितलेलं ऐकतो आहे कुठे तो. "

" पण आज सकाळीं मी आपला धडा काढला तेव्हा नाहीं म्हणा-लीस तूं मी फार चांगला आहे म्हणून ? " टॉमीनें विचारलें.

" हो, पण असं नेहमींच चांगलं वागलं पाहिजे, टॉमी. "

" मी नाहीं होणार नेहमीं चांगला; पण मला आता भूक लागली आई. "

" हं झालीच आहे आता वेळ जेवणाची. पण सगळ्याना येऊ दे. "

" ते पहा पण रेडी आले आई आणि पिशवी दिसते आहे त्याच्या खांद्यावर बघ, " टॉमी म्हणाला.

रेडींनीं आपल्या खाद्यावरली पिशवी खालीं ठेवली. " हे कोवळे नारळ आणले आहेत पहा मी मॅडम, आणि कांहीं जून. "

" ओ हो ! नारळ–नारळ ! मला आवडतात नारळ; " टॉमी नाचत ओरडला.

" बघ तुला म्हटलं नव्हत टॉमी मी. पण तुम्ही बरेच दमलेले दिसता रेडी. "

" होय मॅडम; " आपला घाम पुशीत रेडी म्हणाले. बरच श्रमाच काम आहे ते. पण तिकडून काही आणायच आहे का आज. कारण जेवल्याबरोबर मी जाणार आहें बोट घेऊन. "

" काही तस दिसत नाहीं, रेडी. चला पण जेवाला जाऊ या आपण, ते पहा बाकीचे आलेच सगळे. "

सीग्रेव्हनीं अर्धा गोण बटाटे लावता येतील एवढी जागा साफ करून पोकळ केली होती आणि विल्यम आणि जूनोनीं कासवाच तळ पुरं करीत आणल होत. म्हणजे आता एकदोन दिवसात सगळेजण मिळून नारळी तोडून घराच्या तयारीला लागायला काहीं हरकत नव्हती; म्हणून जेवण झाल्यावर रेडी बोट घेऊन पहिल्या जागेवर गेले आणि त्यानीं तेथून ती दोन चाकी गाडी आणि इतर बरेच सामान घेऊन ते परत आले.

" चलरे विल्यम, तुला झोप नसली येत तर आपण आज कासवं पकडायला जाऊ, " सायकाळीं जेवण झाल्यावर रेडी म्हणाले. आणि सूर्यास्त झाल्यावर विल्यम आणि ते किनाऱ्यावर जाऊन एका खडका-वर बसले. थोड्याच वेळांत एक कासव रेडींच्या दृष्टीस पडले आणि त्यानीं विल्यमला आपल्या मागून यायला सांगून ते पाण्याच्या जव-

ळून चालत जाऊन त्या कांसवाचा मागें जाण्याचा मार्ग त्यानीं बंद करून टाकला. आणि मग तसेच पुढे सरकत सरकत त्यानीं तें कासव झटकन उलटें करून टाकलें.

"पाहिलंस ना रे विल्यम याला कसं उलटायचं तें? पण आपली बोटं मात्र सांभाळ हं. कारण नाहीं तर डास घेऊन पार तोडून टाकील तीं आपल्या दातानीं. अच्छा, आतां याला कांहीं हलतां नाहीं येणार. तर आपण आतां आणखी कांहीं सापडतात कीं काय तें पाहूं या."

मध्यरात्र होईपर्यंत त्या दोघानी मिळून पंधरा सोळा कासवं टाकलीं उलटीं करून. "बस; आजची कामगिरी तर चांगली झाली आहे आपली. खूप दिवस पुरतील आपल्याला हीं." रेडी म्हणाले.

"पण न्यायचीं कशी हो हीं रेडी, तळ्यापर्यंत?"

"अरे, यांच्याखालीं ताडपत्री घालून ओढीत न्यायचीं वाळूवरून. उचलण्यापेक्षा सोपं तें."

"आता थोडे मासे पकडायचे बुवा आपल्याला रेडी. गळ येतील तुम्हाला तयार करतां?"

"दोन तीन दिवसांत करूं या हं आपण गळ तयार नि आपण दोघे जाऊं मग;" रेडी म्हणाले.

दुसरे दिवशीं सगळ्यांनीं मिळून तीं कासवं तळ्यांत नेऊन टाकलीं. दुपारीं जूनो बाईना धुण्याला मदत म्हणून लागली आणि बाकीचे सगळे बटाटे लावण्यासाठीं सीग्रेव्हनीं तयार केलेल्या जमीनीकडे गेले. रेडीनीं आधीं पावड्यानें जमीन सारखी केली आणि सीग्रेव्हनीं आणि विल्यमने बटाटे कापून एकेक डोळा जमीनींत पुरला आणि ते काम संपल्यावर त्यानीं आणलेलं दुसरं बी पण त्याच जागेवर त्यानीं लाऊन टाकलं. त्याच रात्रीं मग जेवण झाल्यानतर रेडीनीं माशासाठीं दोन

गळ तयार करायला सुरवात केली. "पण या गळाला लावायचं काय रेडी?" विल्यमनें विचारलें.

"या शिंपांतले लहान मासे लाऊं आपण. तेवढे पुरेत, नाहीं तर थोडं पोर्क लावावं म्हणजे झाल. पण आतां उशीर झाला आहे मला वाटतं, तर आज आपण झोंपूं या जाऊन."

पण विल्यमचा बेत कांहीं वेगळाच होता. बाहेर चादणं चांगलं मजेच पडलेलं होत. म्हणून आणि आईला ताजे मासे खूप आवडतात म्हणून तिला चकित करण्यासाठीं आजच आपण बाहेर पडायचं असं विल्यमनें ठरवलं, आणि सर्वजण गाढ झोंपी गेल्यावर गळ घेऊन तो एकटाच बाहेर पडला. किनाऱ्यावर जाताच त्यानें दोन चार शिंपा गोळा केल्या आणि आतील कालव त्यानें गळाच्या लोखंडी हुकाला लावलीं. रात्र मोठी सुंदर पडली होती, पाणी अगदीं नितळ नि स्वच्छ दिसत होतं आणि चंद्रप्रकाश आत खालपर्यंत जाऊन पोंचत होता. त्यानें आत गळ टाकला आणि तो तळाशीं जातांच एकदा जरा वर उचलला. एकदोन सेकंदांतच त्याच्या दोरीला जोरानें हिसका बसला, आणि तो बेसावध असल्यानें त्याचा पुढें तोल गेला आणि स्वतःला सांवरता सावरता त्याच्या हातांना चांगलेंच खरचटलें. पण त्यान गळ मात्र वर ओढला आणि एक मोठा नऊ दहा रतली मासा त्यानें कोरड्या वाळूवर टाकला. या पहिल्याच भरघोस यशानें खूष होऊन त्यानें पुन्हा गळ आत टाकला. दोन चार क्षणांतच दोरीला परत जोरानें हिसका बसला. पण तो आता नीट सावध असल्यानें त्यानें गळ एकदोन वेळा इकडे तिकडे हालवून मासा वर काढला. पहिल्या पेक्षाहि हा मासा मोठा होता. या सुयशानें खूष होऊन आणि आज एवढंच पुरे असं मनाशीं ठरवून मासे घेऊन तो परत फिरला आणि आंत तबूत त्यानें ते उचावर टांगून ठेवले, आणि

तो झोंपी गेला. सकाळीं लौकर उठून त्यानें आपला पराक्रम रेडींना दाखवला. पण ते नाखूष झालेले त्याला दिसले.

"मोठी चूक केलीस तू विल्यम. भलतंच साहस केलस तूं. तूं म्हणतोस तसा तोल जाऊन पाण्यात पडला असतास तू तर काय प्रसंग आला असता, कल्पना आहे ? एखाद्या शार्कच्या भक्षस्थानी पडून आपल्या आईबापांना जन्मभर रडत ठेवलीं असतींस तू, नाहीं का ?"

"खरंच चुकलं माझं रेडी; पण माझ्या मनातून आईला चकित करायची होती."

"म्हणूनच गय करतो तुला एक वेळ;" रेडी म्हणाले. "पण पुन्हा करू नको असा वेडेपणा. ती पहा आलीच आई तुझी. गुड-मॉर्निंग मॅडम–आपल्या चिरंजीवानीं काल रात्रीं काय पराक्रम केला आहे पहा. किती सुंदर मासे आणले आहेत पहा."

"वा वा, विल्यम, छान केलस हं !" मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या आणि आज परतलेले मासे खायला मिळणार म्हणून टॉमीची स्वारी खूष होऊन नाचतच सुटली.

तो सबंध दिवस ते सगळेजण नारळी तोडून त्याचे ओंडके करण्यात गुंतले होते. सीग्रेव्ह नि रेडी झाड पाडीत होते आणि त्याचे ओंडके हातगाडीवर चढवीत होते, आणि जूनो आणि विल्यम ती गाडी ओढीत घराच्या जागेवर ते ओंडके नेऊन टाकीत होते. तो सारा दिवस तेंच काम चालल होतं त्याच; आणि ते त्याना आणखी आठ दिवस पण पुरलं. आणि मग पुरेसं लाकूड झाल्यावर त्यानीं आपल्या घर बांधणीस सुरूवात केली.

## : : ११ : :

घर बांधणीस सुरवात झाली. त्यानीं जहाजावरून आणलेल्या लांकडातून रेडीनीं दाराच्या आणि खिडकीच्या चौकटी तयार केल्या आणि मग त्यानीं सीग्रेव्हच्या मदतीनें चार खांब चार कोपऱ्यांत सरळ पुरून उभे केले. मग नारळीच्या ओंडक्याच्या दोन्ही टोकांना खोबण्या तयार करून ते चौफेर एकावर एक ते ठेवीत गेले. आणि मग दोन ओंडक्याच्या मधल्या फटी नारळीच्या पाती पीळ भरून ते पीळ त्यानीं त्या फटींत घट्ट भरलं. ही कामगिरी विल्यम नि जूनो याच्यावर सोंपवली होती. असं त्यांचं घर आस्ते आस्ते वर उंच उठू लागलं. घरात चुलाणाची सोय आत्ताच त्याना करता येत नव्हती, कारण त्यासाठीं शिंपा जाळून त्याचा चुना तयार करायला पाहिजे होता किंवा चांगल्या मातीचा चिखल तरी तयार करायला हवा होता. म्हणून त्यानीं त्याची नुसती जागाच आज सोडून ठेवली. अशा तीन आठवड्याच्या कामानंतर घर पुरेसं उंच तयार झालं. मग त्यानीं वर छप्पर उभारलं आणि तें माडाच्या झापानीं चांगलं दाट असं शाकारलं. आता पाऊस जरी सुरू झाला तरी आत घरात गळण्याची कांहीं फारशी धास्ती नव्हती. आणि आता वाऱ्याचा नूरहि जरी पालटला होता आणि वर आकाशात ढगाची गर्दी पण रोज वाढूं लागली होती, तरीहि पण त्याचं घर पुरं झालं होतं.

" आता घर पुरं झालं तरी पण त्याची आंतली बाजू सुद्धा आपल्याला लौकरच तयार केली पाहिजे. कारण पावसाचा आता कांहींच नियम सांगतां येत नाहीं. " रेडी म्हणाले.

त्यानीं मग त्यांच्या त्या घराच्या आतली जमीन सारखी करून

ठोकून ठोकून चांगली घट्ट अशी केली. मग चौफेर असा एक दोन फूट उंचीचा ओटा तयार केला आणि त्यावर मधून मधून पडदे सोडून पलंग नि खोल्या तयार केल्या. एका बाजुला खुर्च्या—टेबलांची मांडणी तयार झाली. स्वयंपाकासाठीं म्हणून एक तात्पुरतं लहान घर बाजूला उभं केलं. अशी बहुतेक तयारी पुरी झाली न झाली तोंच त्या रात्रीं पावसानें आपली धूळभेट त्यांना दिली. वारा सोसाट्याचा वाहूं लागला, नारळीची झाड एकमेकावर आपटून जणुं घट्ट आलिंगन देऊं लागलीं, विजांचा चमचमाट सुरू झाला आणि वर मेघांची गर्जना सुरू होऊन मुसळधार पावसाला एकदम सुरवात झाली.

" झाला का पावसाळा सुरू रेडी ? काळोख तरी किती पसरला आहे बाहेर नि हें असंच का राहायचं नेहमीं ? असं असलं तर काय करायचं मग ? "

" अरे, तरी मधून मधून सूर्य प्रकाश मिळेलच कीं आपल्याला. पण एखादेवेळीं मात्र पांचसहा दिवस देखील सारखा पाऊस लागेल."

" पण आपलं घर राहिलं उभं हें किती छान झालं. त्या तबूंत तर मला वाटतं बुडूनच गेलों असतों आपण ! "

" म्हणूनच मला मोठी काळजी वाटत होती. पण झाली एकदांची ही सोय. देवाचे अभारच मानले पाहिजेत आपण. "

" असं तर खरं रेडी. आज प्रार्थना वाचूं या आपण. " सीग्रेव्ह म्हणाले. प्रार्थना वाचनानंतर त्यांनीं आपल्या त्या नव्या घरांतल्या आथरूणात आंग टाकल. बाहेर पावसाचा मारा चालूच होता पण वरच्या झापांच्या दाट आच्छादनामुळें आंत मात्र त्यानां सुखानें झोंप घेतां येत होती. मेघांच्या गडगडाटानें किंवा विजा लवण्यामुळें ते जरी दचकून मधेंच जागे होत तरी त्या निर्जन बेटावर त्या घरांत आपल्याला सुरक्षित ठेवल्याबद्दल ते परमेश्वराचे पुनः पुन्हां आभार मानीत.

सकाळीं आकाश पूर्ण निवळून झगझगीत सूर्य प्रकाश चोंहीकडे पसरला. रेडी आपली दुर्बीण खाकोटीस मारून बाहेर आले. इतक्यांत जूनो पण उठून बाहेर आली. "काय जूनो, ऊन तर झक्क पडलं आहे कीं नाहीं आज?"

"हो मासा रेडी; पण चूल कशानें पेटवूं आतां?"

"हं, त्याची व्यवस्था ठेवली आहे करून मी कालच. तुझ्या चुलींतल्या निखाऱ्यांवर राखाडी पसरून त्यावर थोड्या माडाच्या पात्या घालून ठेवल्या होत्या मीं. तिथें थोडे निखारे असतील बघ. चल, मी बाहेरून येणार होतों एक चक्कर टाकून; पण आधीं चूल देतों तुला पेटवून मी."

"किती चागले आहांत तुम्ही रेडी. सारं कसं सुचतं तुम्हांला असं? नवल आहे मोठं! किती पाऊस पडला काल नाहीं; आणि आतां झाप ओले झाले असतील सगळे. हा पहा पण विस्तव आहे इथे हं रेडी. आतां पेटवीन मी चूल."

रेडीनीं मग शीळ घालून कुत्र्यांना बाहेर बोलावलें आणि ते पर्यट-नाला निघाले. आधीं त्यानीं विहीरीकडे मोर्चा फिरवला आणि ती गढूळ पाण्यानें भरून वहात असलेली पाहून ते म्हणाले. "हं; मला वाटलंच होतं. पण मुळींच पाणी नसण्यापेक्षां हें असलं देखील खूप पाणी कांहीं वाईट नाहीं. बरं पण, आतां त्या बोटीकडे जाऊं या."

पण त्याप्रमाणें तिकडे जाण्यापूर्वी त्यानीं एकदां दुर्बीणीनें लांबवर नीट निरीक्षण केलं. तसं त्याना एखादं जहाज त्या बाजूला फिरकेल असं कांहीं फारसं वाटत नव्हतं. तरी पण त्याचा काय नियम, म्हणून ते रोजच सकाळीं सीग्रेव्हनां नकळत हें काम करीत असत. कारण नाहींतर त्यामुळें निराशेचं वातावरण पुन्हां सुरू होण्याची त्यांना भीति होती. नेहमींप्रमाणें त्यानीं निरीक्षण करून आपली दुर्बीण खालीं ठेवली आणि ते पुटपुटले: "कांहीं उपयोग नाहीं याचा म्हणा."

काल रात्रीच्या वाऱ्याच्या जोरामुळें त्याची बोट पाण्यांत लांब वाह-वली होती. पण दोरीच्या टोंकाला मोठे मोठे दगड बांधलेले असल्या-मुळें तिला जवळ ओढून घेणं कठीण नव्हत. बोट जवळ ओढून तिच्यां तलं पाणी रेडीनीं बाहेर काढून टाकलं आणि ते बटाट्याच्या शेताकडे वळले. " आतां एकदा बकऱ्या मेंढयांची हालहवाल पाहिली कीं सका-ळचा माझा राउंड संपला. चला रे ए रॉम्युलस रीमस काढा पाहूं शोधून आपल्या शेळ्या. कुठे तरी दाट आडोशाला जाऊन बसल्या असतील बिचाऱ्या. " आणि त्याचं जणु मनोगत ओळखून पुढे पळत सुट-लेल्या कुत्र्यानीं त्याना लौकरच शोधून काढलें. " अरे पण काळी नॅनी कुठे आहे ?" जरा थांबून रेडी पुटपुटले. पण तेवढयात त्याच्या कानीं बें बें असा आवाज आला. "हां; मला वाटलंच होतं तसं. नॅनी, नवीन बच्चे केलेस पैदा होय. बर बर ! चलोरे बाबा लोक, तुम्हाला चांगली सावली हवी द्यायला आता. " तीं दोन्हीं करडं खाकोटीस मारून ते पुढे निघाले आणि नॅनी त्यांच्या मागून चालू झाली.

" हे पहा दोन नवीन पाहुणे आले आहेत आपल्या घरांत, " मिसेस सीग्रेव्हना रेडी म्हणाले. " यांच्यासाठीं एक घर तयार होई-पर्यंत या घरांतच हवींत त्याना ठेवायला. पण हा नुसता आरंभ आहे हां. "

कांहीं वेळानें मुलांच्या तडाक्यांतून करडांची सुटका झाल्यानंतर रेडीनीं नॅनीला आंत नेऊन बांधली. सकाळची त्यांची न्याहारी मग उरकल्यावर सीग्रेव्ह म्हणाले; " रेडी आपण आपली आतां बैठक भरवून या पावसाळ्यांत काय काय कामं करायचीं तें एकदां ठरवू या. "

" हो, काम पुष्कळच आहेत करायचीं पडलेलीं आणि आपल्या कामांना कांहीं शिस्त नि क्रम हा पाहिजेच. त्याशिवाय कामं नीट सुरळीत नि झटपट कधींच होऊं शकत नाहींत. आमच्या या दर्यावरील

आयुष्यांत कामाची शिस्त नि नियम जर बाधलेले नसते तर आमची कामं उठतींच ना कधीं."

"खरं आहे रेडी. आमचंच पहा ना; आमच्या या सुईदोऱ्या सारख्या वस्तु जर जागेवर नसतील तर त्या शोधण्यापायींच सारा वेळ जायचा निघून;" मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या.

"आणि वेळेची बचत किती होते त्यानीं. आणि ज्याला त्याला कामं वाटून दिलीं असल्यानें प्रत्येक व्यक्ति ही महत्वाची बनते. हं मग आता आधीं काय करूं या? मला वाटतं आपली बोट चांगली वर ओढून घेऊन ती माडाच्या झापानीं झाकून टाकूं या."

"कबूल; एक ठरलं. मग त्यानंतर?"

"त्यानंतर आपले तंबू पाडून त्याचं कापड नीट गुंडाळून ठेऊन घ्यावं. मग एक मोठी कोठीची जागा हवी तयार करायला. त्यांतली जमीन चागली उंच केली पाहिजे; म्हणजे पावसाचं ओल आंत येऊन आपलं सामान खराब होणार नाहीं. त्याच ठिकाणीं आपल्या बकऱ्या पण राहतील एका बाजूला. त्यानंतर मिठागरासाठीं एक जागा तयार करून ठेवली पाहिजे. मग परत एकदा बेटाच्या त्या बाजूला जाऊन आपलं तिथलं सामान कसं काय आहे तें पाहून आल पाहिजे. तशी आपल्या या बेटाची तपासणी तरी आपण अजून कुठे केली आहे? त्यावर काय काय वाढतं आणि दुसरे प्राणी काय आहेत तेंहि पाहून ठेवलं पाहिजे. आपल्या उपयोगीं अशीं पुष्कळ फळं असूं शकतील या बेटावर. मग गवताची सोय कुठे आहे कीं काय तेंहि बघायला हवं, नाहीं का?"

"तुमचं म्हणणं मान्य रेडी. पण आपली कामाची वाटणी कशी करायची?"

"त्याची आज जरूर नाहीं. आधीं बोट टाकूं नीट शाकारून.

मग वेळ मिळेल तशी घराची तयारी करायची. जूनो झाप गोळा करून सांठवील सर्पणासाठीं. आणि आपला टॉमी करील तिला मदत."

"हो, मी दाखवीन झाप कसे ओढून न्यायचे ते," एकदम उभा राहात टॉमी म्हणाला.

"अरे हो पठ्ठे; आत्तांच नाहीं कांही. चला, आज आपण बोट किनाऱ्यावर ओढून घेऊन ठेऊं या आत्तां."

घरासाठीं झाडं पुष्कळच तोडलीं असल्यामुळें झाप गोळा करणं कांहीं त्रासाचं नव्हतं. विल्यम नि सीग्रेव्हनीं ते पुरेसे गोळा केल्यानंतर त्यानीं बोटीच्या बाजूने जरा खणून बोट घट्ट बसवून टाकली, आणि मग झापांनी त्यानीं ती नीट आच्छादली आणि त्यावर वाळूपण पसरली.

"कांहो रेडी, पावसाचा काय होईल त्रास बोटीला?"

"पावसाचा कांहीं नाहीं व्हायचा; पण मधूनच पडणाऱ्या उन्हाचा मात्र त्रास होईल. कारण या दिवसात उन्हं पडलीच तर तीं फार कडक असतात आणि त्यानीं या फळ्या तापून तडकतील, कीं संपलं!"

"ही नव्हती हं मला कल्पना रेडी. आतां काय करूं या पण? वेळ आहे अजून आपल्याला;" विल्यम म्हणाला.

"तूं आणि बाबा गळ घेऊन मासे पकडाला जा. तोंपर्यंत मी कांही जळण देतों जूनोला गोळा करून. साठवून ठेवलं तें कीं मग कोरडं होईलच आपोआप. मि. सीग्रेव्ह, गळाची दोरी घट्ट नको हं धरूं पण हातांत. नाहींतर दोरीच्या हिसक्या बरोबर पाण्यात पडाल, बरं का."

त्यांचं नशीब आज जोरावर होतं. कारण दोन तासांच्या आधींच त्यांना आठ मोठे मासे सांपडले. त्यानीं ते काठीवरून लोंबकळत घरीं आणलेले पाहतांच टॉमी 'मासे मासे' करून नाचायला लागला. आणि मासे बरेच सांपडले असल्यानें आज जेवण त्यांच्यावरच करायचं त्याच्या आईनें कबूल केलें.

ते जेवायला बसले असतील नसतील तोंच वर मेघांचा कडकडाट होऊन धुमेधार पावसाला सुरवात झाली. आतां बाहेर काम करणं अशक्यच होतं म्हणून रेडीनीं बोटीचे मोठाले दोरखंड उलगडून त्यांच्या लहान दोऱ्या वळण्यास विल्यम आणि सीग्रेव्ह यांना सांगितलं आणि ते कॅनव्हासमधें भोकं तयार करू लागले म्हणजे त्यातून दोऱ्या घालून ते पडद्यांसारखे घट्ट टांगतां यावे म्हणून. मग ते पडदे त्यानीं मिसेस सीग्रेव्हच्या बिछान्याच्या सभोंवार टांगले आणि बाकीचं कॅन्व्हास सुद्धां असंच घराच्या चारी बाजूने लोंबतं सोडल. आतां त्या ओबडधोबड भिंतीसुद्धां घरातल्या भिंतींसारख्या चांगल्या दिसू लागल्या.

"रेडी, तुम्ही मला तुमचा इतिहास सांगायच कबूल केलं आहे मागें;" रात्रीं मेणबत्त्या पेटवल्यावर विल्यम म्हणाला. "मग आत्तां कराना थोडी सुरवात, म्हणजे जरा वेळ तरी जाईल."

"हो, कबूल केल आहे खरं, आणि मी आपला शब्द पाळणारच आहें. माझी हकीगत ऐकलीस कीं मी कसा वेड्यासारखा वागलों होतों अनेक वेळां, हें तुला पण समजेल. पण त्यावरून जर तूं कांहीं सावधपणा शिकलास तर या सांगण्याचा खरा उपयोग होईल. ऐक तर हं आतां."

वृद्ध रेडींचा इतिहास.

"अगदीं आरंभापासून हवी असेल नाहीं तुला माहिती. तशी कांही फार नाहीं ती. माझे वडील एका व्यापारी जहाजाचे कप्तान होते. आणि माझी आई—देव तिचं भलं करो!—एका फौजी कप्तानाची मुलगी होती. तिच्या विवाहानंतर दोनच वर्षांनीं वारले ते. त्यानीं ठेवलेल्या पैशांतून आणि पहिल्या पैशांतून माझ्या वडीलांनी आपल्या जहाजांत एक तृतीयांश मालकी खरेदी केली. उरलेले दोन तृतीयांश मास्टरमन नांवाच्या एका श्रीमंत जहाज कारखानदाराच्या मालकीचे

होते. आपला पगार आणि या पैशांवरचा फायदा, यांवर माझ्या आई-वडीलांच चांगल चालत असे. माझ्या वडीलाविषयीं मास्टरमनचं मत फारच चागलं होतं. ते त्यांच्या विवाहाला हजर होते आणि जेव्हां मी या जगात प्रवेश केला तेव्हां तेच माझे गॉड फादर झाले. यामुळें आमचा खूप फायदा होईल अशी लोकाची कल्पना होती; कारण माझा हा देवपिता अविवाहित आणि म्हाताराच होता आणि त्यांना कोणींच नातेवाईक पण नव्हते. आणि स्वभावानें जरी ते चिक्कू होते तरी मरताना कांहीं ते पैसे घेऊन जात नव्हते खास. असं सारे लोक म्हणत. पण या सर्व कल्पनांवर बोळा फिरला. कारण, माझ्या जन्मा-नंतर एकच वर्षानें माझे वडील समुद्रात जहाज बुडून मृत्यु पावले; आणि वयाच्या बावीसाव्या वर्षी गळयांत एक लहान मूल घेऊन माझी माता विधवा झाली.

" जहाजाचा विमा उतरला असल्याने माझ्या आईला पोटापुरतं मिळेल अशी सर्वांची कल्पना होती. पण फक्त दोन तृतीयांशाचाच विमा उतरला होता आणि ते दोन तृतीयांश माझ्या मालकांचे आहेत, असं मास्टरमननीं सागून सगळयाचे डोळे पांढरे केले."

" विमा उतरणं म्हणजे काय बाबा ? "

" म्हणजे असं कीं विमा कंपनीला आपण कांहीं पैसे भरायचे. कीं मग जर तें जहाज नादुरुस्त झालं किंवा बुडालं तर तें नुकसान भरून देण्याची जबाबदारी विमा कंपनी आपल्यावर घेते. हें पैसे भर-ण्याच प्रमाण ठरलेल असत. समज, विमा जर हजाराचा असला आणि तुम्हांला दहा टक्के भरावे लागणार तर जहाज जर सुरक्षित परत आलं तर तुम्ही कंपनीला शंभर रुपये द्यायचे. पण जर जहाज बुडालं तर कंपनीनें तुमचे हजार भरून द्यायचे. ह, चालू द्या पुढे रेडी; हा मधें खंड पाडला मी."

" अं:, त्यांत कांहीं नाहीं. अशी मुलांना माहिती करून द्यायची प्रत्येक संधी घेतलीच पाहिजे आपण. बरं पण. मास्टरमनचं करणं कितपत योग्य होतं तें काही मला माहीत नाहीं. पण साऱ्यानीं त्या-वेळीं त्यांची निंदा केली एवढं मात्र खरं. बायबल काय म्हणत, 'पितृ-हीनांना नि विधवाना त्याच्या अडचणींत मदत करा, आणि या जगांत निष्कलक असेच जगा.' यानें एवढच झालं कीं माझ्या आईला कांहीं काम करून आपला उदर निर्वाह चालवावा लागला. अर्थात काही स्नेह्यांनी थोडी फार मदत केली तिला. अशीं आठ नऊ वर्षं गेलीं."

"पण तुमचा तो देवपिता नाहीं का आला कांहीं मदत करायला?" सीग्रेव्हनीं विचारलें.

" नाहीं; आणि तीच तर गंमत आहे. आणि लोकानीं त्याबद्दल खूप निंदा केली त्याची. अर्थात त्याच्या कानावर ती गेलीच आणि त्यांना आईचा संशय येऊन ते अधिकच चिडले. खरं म्हणजे, त्यांचं मनच त्याना मुळीं खात असेल. आपण ज्याना दुखावलेलीं लुबाडलेलीं असतात तीं आपल्याला म्हणूनच डोळ्यासमोर नको असतात. कारण त्यामुळें आपळं मन आपल्याला टोचू लागतं."

" तुम्ही म्हणता तें पुष्कळस सत्य आहे, रेडी; तरीहि त्यानीं कांहींच केलं नाहीं, हें मात्र आश्चर्य आहे."

" अस दिसलं खरं सगळ्याना त्यावेळीं. पण हाताचे ते फारी चिकट, त्यामुळें नुसते चिडत ते सार ऐकून. पण आतां पुढे—माझी प्रकृती चागली धडधाकट होती त्यावेळीं आणि जेव्हा केव्हा मला मोकळेपणा मिळायचा तेव्हा तेव्हां मी आपला समुद्रावर पाण्यात खेळत असायचा, किंवा बंदरातल्या गलबतांवर हिंडायचा मी. उन्हाळ्यांत तर निम्मा अधिक दिवस मी पाण्यांत असायचा आणि मी पोहत असे पण उत्तम. आईला मात्र हें आवडत नसे आणि माझं मन दुसरे कुठे तरी

गुंतवायचा ती बिचारी प्रयत्नही करी. दर्यावर्दी जीवनांतले धोके आणि हालअपेष्टा यांचं ती माझ्याजवळ वारवार वर्णन करी आणि प्रत्येकवेळीं माझ्या वडीलांच्या मृत्यूच्या वर्णनानें अश्रूंच्या पूरांतच तें वर्णन मग पुरं होई.

"आपला मनुष्य स्वभाव असा कांहीं चमत्कारिक आहे कीं जें नको म्हणून सांगितलं असेल, तें आपण हटकून करायला जातों. आणि मला तरी असं वाटतं कीं, त्यावेळीं आईनें जर असं प्रत्येक वेळीं समुद्रावर जाऊं नको म्हणून म ा आवर्जून सांगितलं नसतं, तर मी हें खलाशाच जीवन स्वीकारलंहि नसतं कदाचित. मी कितीतरी आपलपोटेपणानें त्यावेळीं वागलों असं वारंवार मला आतां वाटतं. पण माझ्या तशा वागण्यामुळं आईच्या हृदयाला काय यातना होत असतील याची माझ्या बालमनाला तेव्हां कल्पना नव्हती. माझ्या काळजीनें ती कशी झुरत होती हे मला दिसत नव्हतं, कळत नव्हतं. मुलांना याची कधींच कल्पना येत नाहीं; ती जर येईल तर तीं तशीं वागणार नाहींत; कारण आप ं अंतःकरण त्यावेळीं कोंवळं, मृदु असतं; तें या वाढत्या वयांत मात्र असं कठोर बनतं."

"मला पटतं तुमचं म्हणणं रेडी," सीग्रेव्ह म्हणाले. "आपल्या वागण्यानें आपल्या आईबापांना किती यातना होतात, आपल्यांतल्या घाणेरड्या किंवा दुष्ट सवई पाहून तीं किती भयभीत होऊन जातात, हें जर मुलांना नीट समजेल तर तशीं तीं खरोखर वागणार नाहींत."

"पण दुर्दैवानें त्यावेळीं आपल्याला तें समजूं शकत नाहीं, आणि ज्यावेळीं समजतं त्यावेळीं हातांतून बाण केव्हांच सुटून गेलेला असतो, आणि केवळ पश्चात्तापच काय तो फक्त मागें शिल्लक उरलेला असतो. हं! आतां पुढें सांगायचं म्हणजे एक दिवस वारा अतीशय सुटला होता, समुद्र तुफान खवळला होता आणि धक्क्यावरला एक माणूस

उडून पाण्यांत पडला. त्याला नीटसं पोहताहि येत नव्हतं, त्यामुळें त्याच्याकडे फेंकलेली दोरीहि त्याला पकडतां येईना आणि पाणी पण विलक्षण उसळत होतं. त्याच्याकडे पुन्हा दोरी टाकायच्या वेळीं मी एकदम पुढे झालों आणि ती दोरी पकडून पाण्यांत उडी घेतली.

"वयानें लहान असलों तरी एखाद्या बदकासारखा पोहत पोहत ती दोरी मी त्या माणसाच्या हातात दिली, आणि त्याला लोकांनी धक्यावर ओढून घेतला. आणि मलाहि त्यांनीं बाहेर काढलें. आणि मग मला समजलं कीं, मी वाचविलेला माणूस म्हणजे माझे गॉड फादर, मि. मास्टरमन हे होते. जो तो माझी मुक्तकंठ स्तुती करीत होता; आणि म्हणूं नये पण, मलाहि माझ्या धाडसाचं अतिशय कौतुक वाटत होतं. मला मग लोकांनीं आरडा ओरडा करीत नि जसा काही मिरवीत आईकडे नेला. तिनें बिचारीनें मला छातीशीं घट्ट कवटाळलं आणि माझ्या शौर्याबद्दल आणि त्याबरोबर माझ्या वरल्या संकटाबद्दल ती किती वेळ तरी अश्रु गाळीत होती. तिला अभिमानहि वाटत होता नि त्याचबरोबर माझा हा स्वभाव मला गोत्यात आणील म्हणून तिला काळजीहि वाटत होती."

"पण तुम्हाला ती रागं भरली काहो त्याबद्दल ?"

"नाहीं, विल्यम् ; मी आपलं कर्तव्य केलं म्हणून तिला बरं वाटलं. किंवा कदाचित तिला असहि वाटलं असेल कीं मी अपकाराची फेड उपकारानेंच केली, म्हणून; पण ती बोलली नाहीं काहींच. दुसरे दिवशीं मास्टरमन आमच्या घरीं आले. अजूनपर्यंत माझ्याकडे दुर्लक्ष केल्यामुळें त्याना खूपच अवघड वाटत होतं. माझ्या आईनें त्यांचं चांगलं स्वागत केलं, कारण तिला बिचारीला अजूनहि आशा होती. पण मला मात्र त्यांनीं केलेल्या सान्या गोष्टीमुळें ते अतिशय अप्रिय झालेले होते. त्यांना वांचवल्याबद्दल मात्र मला आनंद वाटत होता,

हेहि खरं; पण का हें मला जरी नक्की सांगतां येत नाहीं, तरी मला सांगायला लाज वाटते कीं, मी त्यांना माझ्या उपकाराखालीं आणल्या-मुळेंच मला तसं बर वाटत होत. असा मला अभिमान उत्पन्न झाला होता. म्हणजे बघ विल्यम, मी जें काय केलं त्यावेळीं, त्याला फारशी किंमत नाहीं रहात या असल्या विचारानीं. निर्मळ उपकार, किंवा निर्मळ कर्तव्य, अस माझ्या त्या कृत्याचं शुद्ध स्वरूप नव्हतं; त्यांत अभिमानाचं हें हीणकस मिसळलेलं होत."

" मला वाटतं रेडी, मला देखील तसंच वाटलं असतं तुमच्या-सारख, त्यावेळीं;" विल्यम म्हणाला.

" आतां, ज्या उमाळ्यानें मी तें कृत्य केल तो उमाळा शुद्ध होता हे खर, पण मागाहूनच्या माझ्या मनातील त्या विचारानें त्याच महत्व कमी झालं, यात संशय नाहीं. सत्य वाटतं तेंच सांगतो आहे मी आज. माझ्या सारखा म्हातारा आपल्या गत आयुष्याकडे निर्विकल्प रीतीने पाहू शकेल, पण गतकृत्यांबद्दल पश्चात्ताप मात्र त्याला वाटेलच वाटेल. असो. माझ्या त्या देव पित्यानें त्यापुढे माझा सर्व खर्च चालवायचं कबूल केलं आणि मी मोठा झालो कीं त्याच्या बद्यांत मला घ्यायचहि त्यानीं ठरवलं आहे असं आईला त्यानीं सागितलं. कृतज्ञभावाने माझ्या आईचे डोळे भरून आले आणि ते गेल्यावर आता मी नीट मार्गाला लागणार आणि खलाशी होणार नाहीं म्हणून तिनें आपल्याला अति-शय आनंद झाल्याचं दाखवल. आतां हें कबूल केलं पाहिजे कीं मि. मास्टरमननीं आपला शब्द पाळला आणि माझ्या आईला पण बरं वाटलं. ती मला पोटाशीं घेऊन कुरवाळून म्हणायची कीं तुझ्यामुळेंच रे माझी मोठी काळजी दूर झाली, बाबा."

" तुम्हांला किती समाधान झाल असेल त्या वेळीं नाहीं, रेडी!" विल्यम म्हणाला.

"होय, समाधान झालं आणि गर्व पण झाला मला. पण गमत अशी कीं मास्टरमन बद्दलची माझी अप्रीति काहीं कमी झाली नाहीं. कारण ती अप्रीति मुळीं माझ्या मनात पुष्कळ दिवसांपासूनची मुरलेली होती. म्हणून आईला झालेला आनंद मला आवडेना आणि माझा खर्च त्यानी चालवावा हे मला कमीपणाचं वाटूं लागलं. आणि माझी आई आतां सुखी झाली तर मी दुःखी झालों. आणि शिवाय मला त्यानीं आतां चागल्या शाळेंत घातल्यानें माझं इतर पोरा-बरोबरचं समुद्रावर भटकणं बंद झाल. ते सारं माझ्या बऱ्यासाठींच होतं हें मला तेव्हां कळत नव्हतं. मी मनांत कुढू लागलो. आणि कारण काय तर, मागच्या सारखं उनाडण्याला मला सापडत नव्हतं नि अभ्यास करावा लागत होता. मास्तरनीं एकदा त्यामुळें तक्रार केली आणि मास्टरमननीं माझी खूप खरड काढली. मी अधिकच भडकलों आणि मला शिक्षा होऊ लागली. त्यामुळें चिडून जाऊन शाळा सोडून एखाद्या जहाजावर पळून जायचा मी बेत केला. पाहिलंस विल्यम, कसा गाढवपणा मी करीत होतों तो! माझ्यासारखं सगळयाच मुलाना वाटत असतं कीं, आपण शहाणे आणि आपलीं वडील माणसं सारीं वेडीं. पण आज मला समजतं आहे, मी केवढी चूक त्या वेळीं केली ती! किती तरी गोष्टींची शक्यता होती त्या वेळीं—शक्यता म्हणतो आहे मी, कारण भविष्यात काय लपलेल असतं तें कुणालाच पहातां येत नाहीं. पण शक्यता मात्र अशी होती कीं, माझं शिक्षण चागलं पुरं होऊन मी मास्टरमनच्या धद्यात त्यांचा माणूस म्हणून शिरलों असतो आणि कदाचित् त्याच्या इस्टेटीचा वारस पण मीच झालों असतों. म्हणजे श्रीमंती, शिक्षण आणि सर्व सुखोपभोग माझ्या आवतीं भोंवतीं; आणि मग चांगली बायको मिळून मुलांबाळांच्या संसारात चागली सुखानें कालक्रमणा

मी केली असती; आणि असं म्हातारपणीं, हातपाय पुरे थकल्यावर या ओसाड बेटावर पडून नसतं रहावं लागलं मला. हें मी कां सांगतो आहें विल्यम, कीं चुकीचं एकच पाऊल पडल्यामुळं माझं सारं आयुष्य कस बदलून गेल, आणि सौख्य समाधानाच्या नंदन-वनांत विहरण्या ऐवजीं या दैन्याच्या नि संकटाच्या साम्राज्यांत मी कसा रखडतो आहे हें तुला नीट कळावं, म्हणून. क्षुल्लक चुकांचे हे घोर परिणाम असे असतात; आणि आयुष्याची सारी दिशा त्यांनीं बदलून जाते."

"चागला धडा शिकण्यासारखा आहे यापासून, रेडी."

"खरं आहे मि. सीग्रेव्ह. माझ्या आजच्या या स्थितींत मला असमाधान नाहीं, तरी केलेल्या चुकीबद्दल मला वाईट हें वाटतंच आहे. तो सर्वज्ञ परमेश्वर त्याला योग्य वाटेल तशीच आपली विल्हेवाट लावीत असतो; आणि मी आजहि अंतःकरण पूर्वक असें म्हणतों कीं, 'तुझ्या इच्छेप्रमाणेंच होऊ दे परमेश्वरा, माझ्या नाहीं.' त्याच्याच हातात आता मी आपल्याला निरवलं आहे."

"पण तुमच दुर्दैव हे आमचं सुदैव ठरलं रेडी. कारण तुम्ही जर खलाशी झालां नसतां आणि तुम्ही आमच्या या जहाजावर नसतां तर, त्या साऱ्यांनीं आम्हांला सोडल्यानंतर आमचं काय झालं असतं ?" मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या.

"तुमच्या थोडं फार उपयोगी पडतां आलं माझ्यासारख्या थकल्या भागल्या म्हाताऱ्याला, याचं मलाहि समाधानच वाटतं आहे, मॅडम !"

: : १२ : :

दुसऱ्या दिवशीं त्या नव्या करडाच्या ओरडण्यानें तीं लौकर जागी झालीं. आज हवा चांगली होती आणि स्वच्छ सूर्यप्रकाश चोहींकडे पसरला होता. विल्यम आणि सीग्रेव्हनीं प्रथम तंबूचं कापड खालीं घेऊन वाळत घातलं आणि दोन दिवस कुठे दिसत नसलेलीं कोंबडीं शोधीत विल्यम दूर गेला. लौकरच त्याला तीं सांपडलीं आणि त्यांना दाणा दाखवीत त्याना घेऊन तो घरीं आला. कारण तींहि भुकेनें वखवखलेलीं होतींच; म्हणून त्याच्या मागून तीं निमूट परत आलीं.

" विल्यम आज आपण एक खुराडं करूं या तयार या कोंबड्या-साठीं. कांहीं फार नाहीं वेळ लागणार त्याला. या चार नारळीं खाली बांधू या आपण तें. त्याला एक दार पण हवं ठेवायला. आणि एकदां त्यांना संवय झाली या घरांत येण्याची कीं मग नाहीं ती कुठें भटकायचीं. "

त्यांचं तें घर बांधून होईपर्यंत आणि वाळलेल्या तबूच्या गुंडाळ्या करून त्या नीट ठेऊन देईपर्यंत सध्याकाळ होत आली. म्हणून मग ते घरीं परतून जेवण आटोपण्याच्या मार्गाला लागले; आणि जेवण आटोपल्यावर रेडींनीं आपली हकीकत पुढें चालू केली.

—"मी शाळेंतून पळून जायचं ठरवल, इथपर्यंत काल आलों मी. आतां पुढे. दिवसा शाळेंतून निसटणं कांहीं शक्य नव्हतं. शक्यता फक्त रात्रीं सर्व मुलं निजल्यावरच. आमच्या खोलीवर एक पोटमाळा होता आणि त्यावर जायला खोलींत एक शिडी पण होती. त्यावरून गेलों मीं माळ्यावर, सर्व निजानीज झाल्यानंतर. आणि तिथून मग

वरचीं कौलं काढून मी छपरावर चढलों. तिथून हळूच घसरत बाजूच्या पाण्याच्या पन्हळाला धरून त्यावरून खालीं तसाच घसरत घसरत आलों, आणि जमिनीवर पाय टेकले. त्या नळावरून मी कसा खालीं आलों तें माझं मला ठाऊक. जर हात निसटता त्यावेळीं, तर जन्माचाच जायबंदी झालो असतों."

"खरंच रेडी, कुठे तंगड मोडून नाहीं घेतलत ही मेहेरबानीच;" मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या.

"दैवाचीच खैर म्हणायची, मॅडम. मग पुढलं काम तसं सोपं होतं. दिंडी ओलांडून रस्ता गाठला मात्र आणि मग एकदम मी जी धूम ठोकली ती तडक बंदर गाठलं. भरतीचं पाणी जोरानें किनाऱ्याकडे भरत होतं, नि त्याचा फायदा घेऊन एक गलबत आपला नांगर उचलीत होतं. एक माणूस धक्यावर खांबाला बांधलला दोर सोडीत होता. मी एकदम पुढे धांव मारली आणि एक शब्दहि न बोलता त्या जहाजावर उडी ठोकली. एक कोळसावाहू गलबत होतं ते. जहाज धक्क्यापासून दूर होऊन जरा स्थिरस्थावर झाल्यावर मला कप्तानासमोर उभ केलं. अतिशय ऊग्र असा माणूस दिसला मला तो. आणि तो दिवस सपण्यापूर्वींच त्याच्या कठोरपणाचा मला पुरा अनुभव आला आणि मगच मला पश्चात्तापाचे चटके बसू लागले. अगावर ओले कपडे आणि कामाने दमून गेलेला असा मी एकटाच रात्रीं एका दोरखंडाच्या गुडाळ्यावर बसलों असतां मला आईची आठवण झाली; आणि माझ्या या पळून जाण्यानें त्या बिचारीला काय यातना होतील याचा विचार पहिल्यानेंच माझ्या मनात उभा राहिला आणि माझं हृदय भरून येऊन मी ओक्साबोक्षीं रडूं लागलों पण आतां अश्रूंचे समुद्र वाहूनहि काहीं उपयोग नव्हता. पण मला असं वाटत कित्येक वेळीं मि. सीग्रेव्ह कीं, पुढे मी जीं दुखं नि संकट अनुभवलीं

आणि हालअपेष्टा सोसल्या ती माझ्या त्या पातकाबद्दल परमेश्वरानें मला केलेली शिक्षाच होय. मी आपल्या आईजवळ कठोरपणानें वागलों होतो, आणि ती शिक्षा मला योग्य होती. तिने त्याची हाय घेतली, तिच अतःकरण विदीर्ण झालं; तिनें केलेल्या मायेची काय फेड केली मी ही ! परमेश्वर मला क्षमा करो ! ''

वृद्ध रेडी हृदय भरून येऊन काही वेळ स्तब्ध बसले आणि त्याचे ते श्रोतेहि तसेच स्तब्ध बसले होते. मग जरा वेळाने ते म्हणाले; " इथेच थाबावं मला वाटत आज; माझ्याने पुढे सांगवत नाहीं; माझा तो मूर्खपणा आणि दुष्टपणा माझ्या मनाला अतिशय यातना देताहेत, आणि त्या स्मृतीनें माझं हृदय अगदीं भरून आल आहे. "

× × × × ×

दुसरा दिवसहि मोठा सुदर उजाडला. सकाळच्या न्याहारी नि जेवणा करता एक कासव मारून आणून रेडी, सीग्रेव्ह आणि विल्यम मग नारळीची झाडें पाडण्यासाठीं गेले. कारण त्याना एक कोठी साठीं घर तयार करावयाचे होते, आणि ते पूर्ण होतांच बेटाच्या दुसऱ्या बाजूला साठवून ठेवलेल सर्व सामान त्याना त्यात आणून लावाव याचं होत.

" माझ्या मनातून हे ठिकाण एखाद्या लहान गढी सारखंच पूर्ण बंदिस्त असं करायचं आहे. तस घरापासून काही हें फार लाब नाहीं. झाडं पण अतिशय दाट असल्यामुळें वाट वेडी वाकडी वळणावळणाची तयार केली कीं हे सहज कोणाला दिसणार पण नाहीं. तोडलेल्या झाडाचे बुधे पण पार नाहींसे करून टाकले पाहिजेत. नाहींतर आपलं गुपीत नेमकं तेच फोडतील. "

" खरं आहे; कारण कधीं काय होईल याचा काही नियम नाहीं सांगतां येत, " सीग्रेव्ह म्हणाले.

" या भागांतले रानटी लोक हे आपल्या होड्यांतून या बेटावरून त्या बेटावर जात असतात. केवळ नारळ गोळा करण्यासाठीं बरंका. आपल्या जवळच्या बेटावर वस्ती आहे कीं नाहीं कांही सांगतां येत नाहीं आणि असली तर लोक कसे असतील तें सांगणं हि पण कठीण आहे. पण हें तुमच्या मिसेसना मात्र सांगायचं नाहीं हं. उगीच त्याना काळजी ! "

आपल्या राहत्या घरापासून शंभर एक कदमांवरची ती जागा त्यांनीं मग निश्चित केली आणि तोडावयाच्या झाडांवर नीट खुणा केल्या. कांही झाडं त्यांनीं बुंधापासून तोडलीं आणि त्यांच्या बाहेरचीं चार फूट उंची राखून तोडलीं. जेवणवेळपर्यंत त्यांनीं बरंच काम केलं आणि मग वखवखलेल्या पोटानें ते घरीं परत आले. सकाळच्या ताज्या कांस-वाचा गरमागरम रस्सा त्याची वाटच पहात होता.

" किती थकलेले दिसता तुम्ही सारे जण ! " मिसेस सीग्रेव्ह उद्गा-रल्या. " इतकं श्रमाबाहेर काम नका करीत जाऊ रोज. "

" झाडं तोडणं श्रमाचच आहे आई. पण त्यानें काही त्रास नाहीं व्हायचा आम्हांला. आणि विशेषतः आज हा रस्सा आमच्या स्वागताला तयार असताना तर नाहींच नाहीं. कांहो तुमचं काय बिघडलं आहे टॉमी महाराज ? "

" त्याचा नि माझा वाद चालला आहे. माझं अंगुस्तान सांडलं आहे त्यानें. तो म्हणतो, मी काही घेतलं नाहीं आहे तें; पण मी पाहीन कुठे तरी. पुन्हां पुन्हां विचारलं तरी, मी पाहीन कुठे तरी, सांपडेल हळूहळू, हें त्याचं उत्तर कायमच आहे. "

" टॉमी, तूं घेतलं आहेस अंगुस्तान ? "

" मला सापडेल तें पपा हळूहळू. "

" हें कांही उत्तर नाहीं टॉमी. तू घेतलं आहेस कां तें ? "

" मला सांपडेल म्हणतों ना मी पपा, " टॉमी कुरकुरत म्हणाला.

" बरं तर, अगुस्तान सांपडेपर्यंत तुला जेवण नाहीं आज. "

सर्वांनीं जेवणाला सुरवात केली. टॉमीनें मोठा गळा काढला पण तिकडे कोणीच लक्ष दिलें नाहीं. विल्यमनें एक बशी संपवून दुसरी घेतांच त्यांत तें अगुस्तान पटकन पडलें. आणि मग टॉमीला विचारतांच, रस्सा चाखून पहाण्यासाठीं त्यानें तें अंगुस्तान आंत घातलें होतें, पण बोट भाजताच त्यानें तें आत भांड्यात टाकून दिलें आणि मग खरं सांगितलं तर आई सारा रस्सा फेकून देईल आणि आपल्याला रस्सा मुळींच मिळणार नाहीं, म्हणून मी तें कबूल केलं नाहीं असें त्यानें रडत रडत सांगितलें. पण रेडींच्या मध्यस्तीनतर मग त्याच्या वडीलानीं त्याला एकदा ताकीद देऊन जेवायला ये म्हणून सांगितलें. त्याचं व्याख्यान संपल्याचा आनंद मानीत टॉमीनें बशी तोंडाला लावली आणि दुसरी घेतांना तो म्हणाला; " आतां टॉमी अंगुस्तान नाहीं आत टाकणार; ते टिनपॉट घालील तो आत. "

जेवणानंतर सायंकाळपर्यंत त्यांचं काम चाललं होतं. सूर्यास्ताला आकाशांत परत ढग गोळा होऊ लागले आणि रात्रीं चांगलाच पाऊस पडणार असा रंग दिसूं लागला.

" रेडी, तुम्हीं फार दमलां नसलां तर तुमची गोष्ट सांगा पुढे, " मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या.

" ठीक, सांगतों पुढे. आमचं जहाज लंडनला जायचं होतं. तसा आमचा प्रवास मोठा मजेचा झाला. आरंभीं मला सवय नसल्यानें मला मात्र बराच त्रास झाला. खाडींतून किती तरीं जहाजं जात येत होतीं आणि मला बरं वाटत होत. पण आमचा कप्तान फारच वाईट होता. पशूसारखाच तो साऱ्यांना वागवी. माझ्यासारख्या दुसऱ्या एका उमेदवाराच्या मतानें मी तिथन पळून जावं असं होतं. त्यानें

खूप त्रास सोसला होता. लाथा–बुक्यांनीं त्याला कप्तानाने अनेक वेळां माझ्या देखतच मारला होता. आणि मी सुद्धां एकदा करारावर सही केली कीं तोच खुराक मलाहि चालू होईल, असं त्याच मत होतं. मीहि मग तसच करण्याचं ठरवल. बंदरांत उतरतांच कप्तान गांवात गेल्याबरोबर, जवळच्याच एका मोठ्या जहाजावर उभ्या असलेल्या दोन मुलाना मी विचारले. त्याचा कप्तान चांगला माणूस होता अस दिसल, म्हणून मी त्याच्याबरोबर खालीं जाऊन त्याच्या कप्तानाला सारी खरी हकीगत सांगितली, आणि त्याच्या नोकरींत राहण्याची माझी इच्छा प्रदर्शित केली. झालं; आमचा करार ठरला आणि दोन दिवसातच आमच्या जहाजाने नांगर उचलून मुंबईची वाट धरली. "

" पण तुम्ही आपल्या आईला पत्र पाठवल असेल नाहीं ? " विल्यमने विचारलें.

" हो; आमच्या कप्तानानेच मला तस आधीं कर म्हणून सांगितलं होत; आणि त्यानींहि स्वतः दोन चार ओळी खालीं लिहून आपल्या मुलाची काळजी करू नका असं तिला कळवल. पण दुर्दैवानें तें पत्र तिला पोंचल नाहीं. ज्याच्याजवळ तें टाकायला दिल होतं तो टाकण्याला विसरला आणि मग जहाज सुटल्यावर त्याने तें फाडून टाकल कीं काय तें कांहीं कळायला मार्ग नाहीं. पण मागाहून मला मात्र तपास लागला कीं माझ पत्र काहीं आईला मिळालं नाहीं. "

" पण तो तुमचा गुन्हा नाहीं रेडी; " मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या.

" नाहीं, तो नाहीं माझा गुन्हा, कारण गुन्हा करून मी केव्हांच मोकळा झालों होतों. "

" तें जाऊ दे आता रेडी; होऊन गेलं तें. आता पुढ. "

" जशी तुमची इच्छा मॅडम. माझ्या वयाच्या मानानें मी अति-

शय चुणचुणीत होतों. डोलकाठीवरून किंवा दोरीच्या उंच शिडी-वरून मी माकडासारखा झपाझप चढून जात असे. आणि जहाजावर मी सर्वांचा आवडता पण होतो. विशेषतः स्त्री प्रवाशात तर माझ्या लहान वयामुळें मी फारच लोकप्रिय होतों. मुंबईपर्यंत आमचा प्रवास मोठा सुखाचा झाला. फ्रान्सबरोबर तेव्हा आपली लढाई चालू होती. पण आमच्याबरोबर लढाऊ गलबताचं संरक्षण असल्यामुळे आमच्या-वर कांहीं तोंपर्यंत हल्ला झाला नव्हता. पण पुढे सीलोनला वळसा घालून आम्ही मलायाकडे निघालों आणि मग झालेल्या वादळामुळें लढाऊ गलबतें दूर गेलीं. आणि नेमकी ती वेळ साधून एका फ्रेंच जहाजानें आमच्यावर हल्ला चढवला. आम्ही कांहीं वेळ धडपड केली, पण अखेरीस त्याच्या तोफांच्या मारगिरीपुढे आमचा इलाज न चालून आम्ही कैद झालों. वयाच्या बाराव्या वर्षींच आलेल्या या संकटामुळें आरंभीं जरी मी घाबरलो तरी लौकरच तो विचार माझ्या मनातून निघून जाऊन मी परत पहिल्याइतकाच आनंदानें वावरूं लागलों. असे आठएक दिवस गेले असतील तों आमचं एक लढाऊ गलबत आमच्यावर चालून आलं. आमच्याबरोबरच्या त्या फ्रेंच गल-बतानें पळून जाण्याचा प्रयत्न केला; पण तो अयशस्वी ठरला. आणि आमच्या त्या साहाय्यकर्‍या गलबताच्या मदतीनें आम्ही परत फिरलों. फ्रेंच तुरुंग आपल्या नशीबातून सुटल्याबद्दल आम्हाला अतिशय आनंद वाटला; पण तो आनंद व्यर्थ होता आणि फ्रेंचांच्या ऐवजीं आम्हाला डच तुरुंगाची हवा मात्र चाखावी लागली."

"ती कशी काय रेडी?"

"अरे म्हणजे असं कीं, त्यानंतर आम्ही केप ऑफ गुडहोप जवळ आलो आणि परत एका फ्रेंच जहाजानें आमच्यावर हल्ला करून आमचा पाडाव केला. केप त्या काळांत डचांच्या ताब्यात होतं आणि

तें हि आपलं शत्रु राष्ट्रच होतं म्हणून आमची डच तुरुंगांत रवानगी झाली. त्या डच तुरुंगाविषयीं कांही न बोलावं तेंच बर. पण मी वयानें लहान होतों त्यावेळीं, म्हणून कसलीच फिकीर म्हणून मला वाटत नसे— ”

आत्तां याच वेळीं बाहेर इतका प्रचंड कडकडाट झाला कीं झोंपी गेलेलीं मुलं घाबरून किंचाळतच उठलीं. “ कांहीं विलक्षण जोर दिसतो आहे पावसाचा आज, ” रेडी म्हणाले.

ते असे बोलत असताच ते दोघेहि एकदम आत कोसळले आणि वीजेचा कडकडाट असा आवाज होऊन चोंहीकडे चक्क प्रकाश पडला. सबंध घरभर गंधक जळल्यासारखा वास सुटला आणि स्वतःला साव-रून रेडी नि सीग्रेव्ह उभे राहतात तोंच घर धुरानें भरून गेलं आणि मुलं बायका मोठ्यानें किंचाळू लागल्या.

“ अरे भगवान ! दया करा महाराज !—वीज पडून घर पेटलं आहे कुठे तरी सीग्रेव्ह, असं वाटतं मला; ” रेडी म्हणाले.

“ अरे माझी पत्नी—आणि मुलं—आहेत ना सारीं ? ”

“ होय, होय ! सुरक्षित आहोंत आम्ही सारीं; पण जूनो कुठे आहे ? जूनो ! ”

कांहीच उत्तर आलें नाहीं म्हणून विल्यम धावतच तिकडे गेला. जूनो बेशुद्ध पडली होती.

“ प्राण गेला मला वाटतं तिचा; बघा, बाबा बघा. ”

“ तिला बाहेर न्यायला मला थोडा हात लावा पाहूं, सीग्रेव्ह; ” तिला उचलीत रेडी म्हणाले. “ नुसती मूर्च्छा असेल ही कदाचित. विल्यम तू आंत घर कुठे पेटलं आहे तें झटकन पहा पाहूं. आहे, श्वास चालला आहे हिचा—ठीक आहे, येईल शुद्धीवर लौकर. ”

घराच्या एका कोंपऱ्याला वीज पडून आग लागली होती पण

लगेच सुरू झालेल्या मुसळधार पावसानें ती विझलीहि होती. मुलं पण आतां शांत झालीं होतीं.

" परमेश्वराचीच खैर, रेडी; " सीग्रेव्ह म्हणाले.

" होय, त्याचीच कृपा तर काय, नाहींतर काय वेळ होता आता! "

" आपल्याजवळ तांब्याची तार आहे नाहीं, रेडी ? "

" हं, त्याचाच विचार करीत होतों मी. आतां पहिली गोष्ट तीच करायची सकाळीं. "

एक दोन तासांतच दिवस फटफटला. न्याहारीची तयारी करण्या-पूर्वीं आधीं सर्वांनीं गुडघे टेकून रात्रीच्या त्या मोठ्या संकटातून आपल्याला वाचवल्याबद्दल त्यांनीं परमेश्वराची मनोभावानें प्रार्थना केली. रेडीनीं मग तारेचा गुंडा शोधून काढला आणि तो नीट उल-गडून ठेवला आणि त्याची न्याहारी उरकल्यानतर रेडी आणि सीग्रेव्ह ती तार लावण्यासाठीं बाहेर पडले. घराजवळच असलेलीं दोन एक-मेकां जवळजवळ असलेलीं झाडं त्यांनीं पसंत केलीं. रेडीनीं आपली शिडी एका झाडाला टेकवी आणि मग वर उंच एक खिळा खोल ठोकला आणि त्यावर उभं राहून आपल्या डोक्याजवळ दुसरा एक खिळा ठोकला. असे खिळे ठोकीत ठोकीत ते माडाच्या शेंड्याजवळ गेले आणि मग परत खालीं येऊन आपली करवत आणि कुऱ्हाड वर नेऊन त्यानीं माडाचा शेंडा तोडून टाकला.

" नीट सांभाळून या हं रेडी खालीं. "

" काहीं घाबरूं नका सीग्रेव्ह; आता जरी तरणा नसलों मी तरी याहून खूप उंचावर चढण्याची संवय आहे मला. "

ते परत खालीं आले आणि लाकडाच्या एका तुकड्यावर तार उंच ठोकून तो तुकडा वर परत शेंड्यावर नेऊन त्याला घट्ट बांधला आणि ती लोंबती तार खालीं आणून जवळच्याच माडाच्या बुध्यांत त्यानीं ती पुरून टाकली.

" ठीक, आता नाहीं आपल्याला धास्ती. तुला कळलं ना रे विल्यम हें काय केल तें ?"

" हो, कळलं रेडी. धातूकडे वीज ओढली जाते. म्हणजे आता ती त्या तुकडयावर पडेल आणि त्या लोंबत्या तारेंतून सरळ खालीं जाऊन जमीनीच्या पोटात नाहींशी होईल."

" बरोबर ! आजहि परत कालचाच रंग दिसतो आहे हं. चला, आत जाऊं आता. आपल्याला बाहेर काम कांहीं करण शक्य नाहीं."

जूनो आता शुद्धीवर येऊन उठून बसली होती. तिचं फक्त आतां डोकं दुखत होतं, बाकी तिला काही होत नव्हतं. रेडींच्या कल्पने- प्रमाणें पावसाला जोरात सुरवात झाली. काम काही करायचं नव्हतं म्हणून विल्यमच्या विनंतीवरून रेडींनीं आपल्या जीवनवृत्ताताला परत सुरवात केली.

" गलबतानें बंदरात नांगर टाकल्याबरोबर आमची लगेच होडीं- तून तुरुंगाकडे रवानगी झाली. पण तुरुगात आमच्यावर तसा कडक पहारा नव्हता आणि तिथून पळून जाणं पण मोठंसं कठीण नव्हतं. तुरुंगात आम्हाला त्रासहि काहीं नव्हता पण आम्हाला लौकरच हॉल- डला पाठवणार होते; आणि आम्हाला तें कांहीं पसंत नव्हतं. माझ्या वयाचीं आणखीं पाच सहा मुलं होतीं तुरुगात, आणि आम्ही नेहमीं एकत्रच असूं त्यातले जॅक रोमर आणि विल हेस्टिंग्स हे माझे विशेष दोस्तींतले होते. एक दिवस आम्ही असे ऊन खात बसलो होतो आणि रोमर म्हणाला: ' इथून पळून जाण किती सोपं आहे, पण जायच कुठे हें आपल्याला नाहीं माहीत ना !"

" का रे; रानटी लोकांच्याच तावडींत सापडूं आपण. हॉटेंटॉट लोक आहेत इथून जवळ. तरी पण मला तरी या तुरुगात डाबून राहण्यापेक्षां रानटी लोकात मोकळं राहण पत्करेल,' मी म्हणालो. या

विषयावरचं आमच हे पहिल भाषण, पण त्यानतर आम्ही पुष्कळ वेळां त्याबद्दल बोलत होतो. आमच्यावरच्या एकदोन पहारेकऱ्याना थोडं इंग्लिश येत होतं. त्याच्याजवळ गप्पा मारता मारता आम्ही बरीच माहिती गोळा केली. आणि आमच्या त्या गोष्टीचा रोजचा खल चाले. अखेरीस पण आम्ही तिथून पळून जायच ठरवल. पण त्यावेळीं तिथेच जर राहिलो असतो तर मात्र फार बर झाल असतं, असं मागून अनुभवाने शिकलो. पण तरुण डोक्यात इतका विचार कसा यायचा! त्यानतर मग आम्ही हळूहळू रोजच्या आमच्या अन्नां-तून थोडस अन्न बाजूला काढून ठेऊ लागलो, काहीं मोठे चाकू पैदा केले आणि कपड्याची वळकटी तयार करून एका काळोख्या रात्रीं खोलींत बंद होण्याच्या वेळीं बाहेरच राहिलो. शिपायाच्या काहीं लक्षात ते आल नाहीं. मग सर्व निजानीज झाल्यानंतर एक मोटा वासा भितीला लाऊन उभा केला आणि त्याच्या मदतीने कशीबशी भित चढून परत तसेच पलीकडे उतरलों आणि तडक टेबल मौट-नचा रस्ता धरला."

"तिकडे जाण्यात काय होता तुमचा हेतू, रेडी?"

"आमची कल्पना अशी होती कीं, तुरुंगातल्या लोकानीं आमचा तपास करण्याचा सोडीपर्यंत तिथे राहायच आणि मग काहीं बदुकी पैदा करून मग तिथून निघून जायच. आमच्या गलबतावर फ्रेंचानीं हल्ला करण्यापूर्वीच कप्तानाने आपल्याजवळचे सारे पैसे आम्हां लोकाना पगार म्हणून वाटून दिले होते ते अजून आमच्याजवळच होते. प्रवास पण दाट जगलातला, दिवसा उजेडीं देखील हिंस्र पशूंची गाट पडायची, म्हणून बदुकींची अतिशय आवश्यकता आम्हालां होतीच. वेडपणाच सारा तो, पण आतां बाहेर पडलों होतों खरे! मग आम्ही झपाट्यानेच निघालो होतो. मात्र पाठलाग न व्हावा

म्हणून सरळ रस्त्यानें न जातां आमचा प्रवास आडवळणांनीं असाच चालला होता. असे चारएक तास चालल्यानंतर आम्ही दमून गेलों आणि दिशाहि फांकल्या. म्हणून लपून बसण्यासाठीं जागा शोधीत शोधीत एका गुहेचा आम्ही आश्रय केला. गुहा मोठी होती आणि आत कोरडी पण दिसत होती. आम्ही आत शिरून आपले बोजे खालीं टाकले आणि आपल्या थकल्या भागल्या पायांना विश्रांती देण्यासाठीं आडवे होणार इतक्यात ओरडण्यासारखा आणि भुंकण्या·सारखा कांहीं आवाज आमच्या कानावर आला. आमची तर घाबर-गुंडीच उडाली; तें काय आहे हें तर कांहींच कळत नव्हत, पण आवाज मात्र येतच होता. अखेरीस हेस्टिंग्सने धीर करून बाहेर पाहिलें. तों काय, एक शेंदीडशें बॅबून वानर वेड्यावांकड्या उड्या मारीत ओरडत होते नि वाकुल्या दाखवीत होते. त्याच्या त्या मर्कट लीला पाहून आम्हांला हंसू आवरेना. इतक्यांत त्यातला एक अजस्र वानर टुणकन उडी मारून आमच्या अगदीं जवळ आला. आम्ही त्याचे ते भयकर दात नि तो हिडिस चेहेरा पाहून घाबरून गुहेंत आणखीं आंत शिरलों. आमच्या सुदैवानें आत आणखी एक गुहा होती त्यांत आम्ही रागत रांगत शिरलो आणि पाच सहा बॅबून्स आमच्या पाठोपाठ गुहेच्या तोंडाजवळ येऊन पोचले. आत आल्या. बरोबर त्यांनीं रोमरचं बंडल धुंडाळून त्यातले पाव, बिस्किटं त्यांनीं साफ केलीं, आणि बाकीच्या वस्तूंचा फाडून तोडून पार नास करून टाकला. एकानें आपला भला सपाटा पंजा आम्हाला धरण्यासाठीं आंत घातला. त्याबरोबर हेस्टिंग्सनें त्यावर चाकूचा फटकारा मारला; त्यानें झपाट्यानें पंजा मागें ओढून घेतला आणि तो बाकीच्यांना दाखवीत दाखवीत, तें साडणार रक्त जीभेनें चाटूं लागला. आतां त्यांचा ओरडा खूपच वाढला. आणि दुसऱ्यानें आपला पंजा आत

घातला. त्यालाहि चाकूचा प्रसाद मिळाला. अखेरीस दोघातिघांनीं एकदम प्रयत्न केला पण आम्ही त्यांनाहि मागें पिटाळलें. असा एक तासभर आमचा झगडा चालला होता. ते मग गुहेच्या बाहेर गेले, पण तिथेंच ते तोंडाशीं पहारा करीत मात्र बसले. आम्हीं जर त्यांच्या तडाक्यात त्यावेळीं सांपडलों असतों तर त्यांनीं आमच्या फाडून चिंध्या केल्या असत्या. म्हणजे आतां ते प्राणी कंटाळून निघून जाईपर्यंत आम्ही आत अडकून पडलों. असे आम्ही दोन तास काढले, पण ते मर्कटराज हलण्याचीं काहीं चिन्हं दिसत ना. इतक्यांत एका बॅबूननें कर्कश किंचाळी फोडली, त्याबरोबर तो सगळा कळपच्या कळप किंचाळत ओरडत पार निघून गेला. ते परत येत नाहींत अशी कांही वेळ थाबून आम्ही खात्री करून घेतली आणि मग आम्ही रांगत रांगत एकेकजण त्या गुहेबाहेर आलों. दूर अंतरा वर एक हॉटेंटॉट गुरं राखीत बसला होता, पण ते बॅबून्स मात्र नाहींसे झाले होते. तें पाहून आमचा जीव आतां थोडा भांड्यात पडला. या पहिल्या संकटातून तर आम्ही बचावलों होतों. पुढें असले पुष्कळच प्रसंग आमच्यावर आले म्हणा, पण यातून तरी आतां सुटलों होतों. पण आज आतां इथेच थाबूं या आपण."

"पण मग पुढं काय झालं तें सांगाना रेडी."

"सांगेन सांगेन उद्या; पण प्रत्येक गोष्ट ही योग्य वेळींच केली पाहिजे नाहीं का ? मग आता झोंपायची झाली वेळ आपली. तरी पण तुला नसली झोंप येत तर चल, जाऊं गळ घेऊन समुद्रावर."

---

## :: १३ ::

त्यानंतर मग जवळ जवळ पंधरा दिवसपर्यंत हवा बहुतेक चांगलीच पडत होती. म्हणून ते पंधराहि दिवस कोठींचं घर पुरं करण्यांतच सारेजण गढून गेले होते. कोठीचं घर पुरं झाल्यानंतर मग त्यांनीं एक दिवस संपूर्ण विश्रांतीं घ्यायची असंच ठरवलं आणि त्याप्रमाणें आज सर्वजण मजा करण्यांत गुंतले होते.

"इथे बसू या आपण या उंचवट्यावर. फारसं काही ओलं नाहीं आहे दिसत या जागी," वाळवटावर मजेनें फिरतां फिरतां खालीं बसत मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या. "या निर्जन बेटावर सुद्धा मला एवढं सुख लागेल अशी नव्हती माझी कल्पना. आणि पुस्तकाची उणीव मला वारंवार भासेल अशीहि माझी कल्पना होती. पण आता अनुभवानें मात्र असं वाटत आहे कीं वाचायला मुळीं वेळच नसता मला मिळाला."

"असंच आहे नाहींतरी. काहीं उपयुक्त असा उद्योग आपण करीत असलं कीं त्यातूनच सुख उत्पन्न होतं. उद्योगी माणूस हा नेहमीं सुखी असतो. अतिश्रम मात्र नाहीं त्याला करायला लागतां कामा, म्हणजे झालं. उद्योगासारखं मनोवेदना विसरवणारं दुसरं औषध नाहीं."

"पण आजच्यासारखं आपल्याला नेहमींच काही नाहीं काम करावं लागायचं, आई;" विल्यम म्हणाला.

"अर्थातच नाहीं," सीग्रेव्हनीं उत्तर दिलें. "आणि मग खरा उपयोग होईल आपल्याला पुस्तकाचा. वाचनाचा आनंद मग मिळेल खराखुरा. पण आपलीं पुस्तकं शाबूत आहेत कीं नाहीं कोण जाणे!

तरी पण पावसाळा संपेपर्यंत काहीं आपल्याला तिकडे नाहीं जाता येत."

"हा प्राणी पहा बाबा, किती बारीक आहे तो; पाय तरी किती आहेत पहा याला!" विल्यम म्हणाला. "केसापेक्षा देखील बारीक आहेत ते. पण पळतो आहे पहा किती जलद त्यानीं."

"अरे, सृष्टीच्या सर्वच पसाऱ्यात असे विलक्षण चमत्कार पावलो-पावलीं भरलेले आहेत. असल्या या अतिशय बारीक सारीक प्राण्याचे हे अवयव इतक्या व्यवस्थित रीतीनें तयार करण्यात परमेश्वरानें काय चातुर्य प्रगट केलं आहे पहा. असे असंख्य जीव असतील; पण त्या साऱ्याच्या सुखसोईची तरतूद मानवी देहाइतकीच कसोशीनें केलेली आपल्याला आढळेल. हे डोळ्याना जेमतेमच दिसणारे चिमुकले पाय; पण त्यांतहि स्नायु, रक्तवाहिन्या, वरली कातडी कशी तयार केलेली आहे! आपल्या मानाने हे जीव किती चिमुकले, क्षुद्र; आणि त्या जगत् निर्मात्याच्या मानाने आपण किती क्षुद्र! असे लक्षावधी जीवजंतु त्याने उत्पन्न केले आहेत. आणि त्यांच्यात तरी किती असंख्य प्रकार निर्माण केले आहेत ते पहा. आणि ही वनस्पतींची सृष्टी—किती विविध, उपयुक्त नि विलक्षण सौंदर्यपूर्ण आहे, नाहीं का? त्यांची पानं, फुलं, फळ किती चित्रविचित्र! हे प्राणी सुद्धा वरवर पहाता आपल्याला सारखेच दिसतात. पण बारकाईनें निरीक्षण केलं तर त्यांच्यातले सूक्ष्म फरक आपल्याहि ध्यानात येतील. आपल्या दृष्टीला सगळ्याच बकऱ्या सारख्या दिसतात. पण धनगर पहा कसा त्याना नेमक्या वेगवेगळ्या करतो, तो. तसंच आहे तें."

"खरं आहे विल्यम; मीहि आपल्या आयुष्यांतल्या भटकंतींत अनेक चित्रविचित्र प्राणी पाहिले आहेत; पण त्याच्या कारागिरींतील सौंदर्य आणि परिपूर्णता पाहून मन खरोखरी चकित होऊन जातं,

आणि जॉबच्या शब्दांची मला तरी आठवण होते. ‘ मी जेव्हां विचार करतों तेव्हां मी भयचकित होतों.’ बरं पण, आपल्याला आज थोडंसं सरपण गोळा करायला हवं आहे. टॉमी नि जूनोनीं बरीच रास गोळा करून ठेवली आहेच. त्यांत आपली आज भर पडली म्हणजे मला वाटतं बरेच दिवसाची बेगमी झाली.”

तो सारा दिवस त्यानीं नारळीच्या झावळ्या, थरपिलं वगैरे गोळा करण्यात घालवला. पेंढयाच्या माचासारखा रेडीनीं त्यांचा नीट माच तयार केला, आणि त्याच्यावर परत झांप पसरून पावसाचा पक्का बंदो-बस्त करून टाकला.

“ बस, आता पुढल्या वर्षापर्यंत कांहीं घास्ती नाहीं आपल्याला. आणि आता पावसाळा पण संपत आला आहे. म्हणजे मग परत सर-पण गोळा करायला काहीं अडचण नाहीं आपल्याला. ”

रात्रीं मग सर्वांच जेवणखाण उरकल्यानंतर विल्यमच्या विनंती-वरून रेडीनीं आपला इतिहास पुढे चालू केला :

“ त्या बॅबूनसनीं आम्हांला घाबरून सोडलं, इथपर्यंत मी आलों होतों ? हं, मग आम्ही त्या गुहेबाहेर येऊन एका खडकावर बसलों, आणि पुढें काय करावं याबद्दल आमच्यात भवती न भवती सुरू झाली. रोमरचं म्हणणं आपल्याजवळ काहींच हत्यारं पात्यारं नसल्यामुळें, वन्य-पशूंच्या भक्षस्थानीं आपण चटकन पडूं किंवा त्याहून दुसरंच एखादं संकट आपल्यापुढे येईल. म्हणून आपण परत जाऊन त्याच्या स्वाधीन होऊं या. त्याचं म्हणणं बरोबर होतं. आणि आम्ही जर तसे वागलों असतों तर पुढली सारी संकट परंपरा टळली असती. पण होणारा सारखीच बुद्धी होते म्हणतात ना ! हेस्टिंग्सच्या मतें आतां परत जाणं म्हणजे सर्वांकडून नाचक्की करून घेणंच आहे. अखेरीस लोक हंसतील या कल्पनेचा वर पगडा होऊन, आम्ही परत न जायचं ठरवलं.

लक्षात ठेव तूं विल्यम हें, आणि लोक हंसतील म्हणून चुकीची गोष्ट करण्याला कधींहि प्रवृत्त होऊ नको. किंवा चूक दुरुस्त करायला पण भिऊं नको. बरं; अशा रीतीनें मग आम्ही पुढें जायचं ठरवलं. दुसरा मुद्दा हत्यारं गोळा करण्याचा; कारण याच्यावाचून तर चालणच शक्य नव्हत. आमची याबद्दल चर्चा चालू असता आमचं लक्ष त्या गुरं राखीत बसलेल्या हॉटेंटॉटकडे गेल. आपली बंदूक जवळ आडवी ठेऊन तो आता झोंपी गेला होता. त्याच्याजवळ हळूच जाऊन ती बंदुक पळवून आणण काही फारसं कठीण नव्हतं. ती कल्पना सर्वांना पटून हेस्टिंग्स हळू हळू रागत रागत त्याच्याजवळ गेला आणि त्यानें ती बंदूक उचलून लाब नेऊन ठेवली आणि मग परत मागें जाऊन त्याने दारूगोळ्याच तोस्तान पळवून आणलं आणि मग आम्ही सर्व मोठ्या सावधगिरीनें टेबल बेच्या दिशेनें चालू लागलों. वाटेंत लागलेल्या एका ओढयावर बसून आम्ही आपला फराळ पण उरकला आणि पुष्कळसं पाणी पण पिऊन घेतलं. आमच्या माहितीप्रमाणें जवळ-पास शेतकऱ्यांची वस्ती होती. म्हणून तिकडूनच कुठून तरी जर आणखी एक बदूक नि दारूगोळा पैदा करतां आला तर तो करावा असा आमचा विचार होता. इतक्यांत आमच्या कानावर कुत्र्याच भुंकणं आलं आणि आम्ही तर्क केला कीं आम्ही कोणा तरी शेत-कऱ्याच्या झोंपडीच्या आसपास येऊन पोंचलों आहों. म्हणून मग सकाळ होईपर्यंत आम्ही तिथेंच पडून राहण्याचं ठरवलं आणि एका भल्या मोठ्या दगडाच्या आसऱ्यानें आम्ही झोंपण्याचं ठरवलं. हेस्टिं ग्सला झोंप येत नसल्यानें तो पहारा करीत बसला. सकाळ उजाडतांच त्यानें आम्हाला उठवलं आणि आम्ही आपली न्याहारी उरकली. आम्ही जिथे लपून बसलों होतों त्या जागेवरून खालीं शेतात काय चाललं आहे हें आम्हांला नीट पहातां येत होतं.

" आमच्या समोर असलेल शेतकऱ्याच तें घर होत लहानच आणि दुसरीं घर पण त्यापासून बरींच दूर होतीं. आमच्या दृष्टीनें हे सोईच होतं कारण आमच्या मनातून त्या घरातल्या लोकाची दृष्टी चुकवून त्यातल्या बंदुकींची नि दारुगोळ्याची चोरी करायची होती. घरातील लोक आता कामासाठीं बाहेर पडत होते. आधीं एक दोघे हॉटेन्टॉट बाहेर येऊन त्यानीं गाडी जुंपली. बारा जोडया जुंपल्या होत्या त्यानीं त्या मोठया वॅगनला. ते केपटाऊनकडे निघून गेल्या बरोबर त्याच्यामागून दुसरा एक हॉटेन्टॉट पचवीस तीस गाई घेऊन त्यांना चारण्यासाठीं पर्वतदरीकडे घेऊन गेला. मागाहून एक डच शेतकरी नि त्याची पत्नी बाहेर आलीं. त्याचे नित्याचे व्यवहार सुरू होऊन दोन एक तास झाल्यावर तो शेतकरी घोडयावरून कुठे तरी निघून गेला. आणि त्याच्या मागोमाग एक हॉटेनटॉट स्त्री डोक्यावर कसली तरी पाटी घेऊन निघून गेली. हेस्टिंग्सच्या मताने आता संधी चागली होती. कारण आमच्या कल्पनेप्रमाणे घरात फक्त शेतकरीण बाईच शिल्लक उरल्या होत्या. आणि काहीं गडबड जरी तिने केली असती तरी तिला गप करणं काहीं तस कठीण दिमत नव्हतं. म्हणून आम्ही मोठया सावधगिरीने डोंगरावरून खालीं उतरलों आणि कोणाच्या दृष्टीस न पडता आम्ही मोठया हुशारीनें तें घर तर गाठलं. कुंपणाच्या आसऱ्याने आम्ही आत जाण्याची अनुकूल संधी पहात होतों. इतक्यात ती डच स्त्री आपल्या दोन मुलाचा हात धरून घराबाहेर आली आणि तिथून साधारण जवळच दिसणाऱ्या दुसऱ्या घराच्या दिशेनें ती चालू लागली. शंभर एक कदम ती गेली असेल तोंच आम्ही लपलेल्या जागेवरून उठून घराजवळ गेलों. प्रथम हेस्टिंग्स अतिशय सावधपणें पुढें होऊन घरांत शिरून परत बाहेर आला आणि आम्ही पण मग आत शिरलों. हेस्टिंग्सनें दोन बंदुका

आणि दारू गोळ्याची तोस्तानें शोधून काढून आमच्या हवाली केली. मग मला दाराजवळ कोणी येत आहे की काय हे पहाण्यासाठीं उभा करून ते दोघे कांहीं खाण्याचे पदार्थ गोळा करू लागले. तीन चार भले मोठे ब्रेडस आणि एक मोठा मासाचा तुकडा त्यानीं पैदा केला आणि घराबाहेर पडून परत मोठ्या सावधगिरीनें आम्ही आपल्या पहिल्या आश्रयस्थानाकडे गेलों आणि दिवसभर तिथे विश्राति घेऊन सूर्यास्तानतर आपल्या प्रवासाला परत सुरवात करायची असे आम्ही ठरवल.

"आता आमच्या तिघांच्याजवळही बंदुका झाल्या होत्या नि एक दोन दिवस पुरेस अन्नहि आमच्याजवळ होत. सूर्यास्ताबरोबर आम्ही बाहेर पडून आमच्या प्रवासास सुरवात केली. पाठलाग चुकवण्यासाठीं म्हणून आम्हाला एकाच दिशने जाण आरभीं तरी इष्ट नव्हत. म्हणून आम्ही कधीं पूर्व तर कधीं उत्तर अशा दिशाच्या अनुरोधाने आपला प्रवास चालू केला. असे मध्यरात्र होईपर्यंत आम्ही सारखे चालत होतों. मग जरा विश्रातीसाठीं एका ओढ्याच्या काठी आम्ही टेंकलो. आता चांदण चागल स्वच्छ पडल होत. पण आता वन्य पशूंच्या आरोळ्या आमच्या कानावर वारंवार येऊ लागल्या. पण आमच्या सुदैवाने प्रत्यक्ष दर्शन कांहीं आम्हाला त्या रात्रीं कुणाचं झाल नाहीं. तरीहि आम्हा प्रत्येकाला असच वाटत होत कीं आपण कुठे तरी चार भिंतींच्या आंत सुरक्षित असतों, तर फार बरं झाल असत. पण थोड्या वेळाच्या विश्रांतीनतर आमचा प्रवास परत सुरू झाला. त्या रात्रीचा उरलेला वेळ नि उजाडलेला सबंध दिवस आम्ही मधून मधून थोडी विश्राती घेत वाट चालतच होतो. आमचा मार्ग आता एका डोंगरावरून चालला होता. त्यामुळें मोठ्या सावधगिरीनें चालण आम्हाला भाग होतं आणि मग रात्रीं प्रवास

पण शक्य नव्हता. म्हणून सूर्यास्ताबरोबर एका निवाऱ्याच्या जागेवर आम्ही मुक्काम केला. संरक्षणासाठीं म्हणून वाळलेल्या फांद्या गोळा करून त्याची एक शेकोटी तयार केली. कारण आम्ही ऐकल होतं कीं रानटी प्राणी शेकोटीपासून दूर पळतात म्हणून. आम्ही आपल्या बंदुका पण भरून सज्ज ठेवल्या होत्या आणि आळीपाळीनें एकानें जागत रहायच पण आम्ही ठरवल होतं. पहिला पहारा रोमरचा होता. पण त्याला झोंपेनं केव्हा तरी घेरलं आणि त्यामुळें आमची शेकोटीहि विझून गेली.

"मग असा मध्यरात्रींच्या सुमारास माझ्या तोंडावर कोणाचा तरी श्वास लागून मी जागा झालों. मी डोळे उघडले. कोणा तरी प्राण्याचे तीक्ष्ण दात माझा पट्टा पकडून मला उचलीत होते. त्याचे दात माझ्या कमरेंत रुतू लागले होते. मी झटकन बंदुक घेण्याचा प्रयत्न केला. पण भलताच हात पुढें येऊन हाताला बदुक लागण्या-ऐवजीं एक जळकं लांकूडच त्याला लागलं. पण मोठं प्रसगावधान राखून मी तेंच उचलून त्या प्राण्याच्या तोंडात खुपसलं. त्या बरोबर त्यानें आपली पकड सोडून एकदम पोबारा केला."

"मोठं दैवच म्हणायचं तुमचं रेडी!" मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या.

"होय, मॅडम. एक तरस होता तो. हा प्राणी जरा भित्रा असतो. तरी सुद्धा मीं त्याला तसा भाजला नसता तर त्यानें मला नक्की पळवून नेलं असतं. आता माझे दोस्तहि जागे झाले आणि काय झालं होतं तें समजताच रोमर तर पुराच हादरून गेला. त्यानंतर मग आम्ही दोन शेकोट्या पेटवून त्याच्यामधें झोपायचं असं ठरवून टाकलं. असा आमचा प्रवास आठ दिवस चालला होता. आमच्या-जवळचे खाद्यपदार्थ संपले होते आणि एक दिवस आम्हाला पूर्ण उपास

पडला. पण मग त्यानंतर आम्ही एक भेकर मारलं आणि त्याच्या मांसावर तीन चार दिवस आम्हाला सहज काढतां आले. हो, एक विसरलों ! एक दिवस विश्रांतीसाठीं असे एका झाडाच्या सांवलींत आम्ही पसरलों होतों. आम्ही अगदीं थकून गेलों होतों. त्यामुळें खालीं पाठ लागायचीच खोटी होती, कीं झोंप काय हा हां म्हणतां लागली असती. मी व रोमर कुशीवर आडवे झालों. पण आमच्या सुदैवानें हेस्टिंग्स पाठीवर निजला, आणि वर पहातो तों एका चित्त्याची स्वारी वरच्याच एका फांदीवरून आमचं निशाण धरीत होती. त्यानें झट-कन बंदुक उचलली आणि नेमहि न धरता त्यानें ती त्या चित्त्यावर झाडली. कारण नेम धरायला वेळ कुठे होता ? पण सुदैवानें गोळी त्याच्या पोटात शिरून त्याचा कणाच बहुतेक मोडला. एक भली मोठी आरोळी ठोकून चित्ता आमच्याजवळच खालीं कोसळला आणि त्यानें रोमरवर उडी घेतली. पण पाठीचा कणाच मोडल्यामुळें त्याला उडी मारतां येईना. तो परत खालीं कोसळला आणि मोठ्यामोठ्यानें गुर-गुरत आणि करकरा दात खात तो आमच्याकडे पहात होता. इतका संताप मी अजून कधीं पाहिला नव्हता. हतबुद्ध होऊन तीन चार सेकंद आम्ही त्याच्याकडे नुसते पहात होतों. छाती विलक्षण वेगानें धडधडत होती; पण मग त्याची काहींच अधिक हालचाल होत नाहींसें पाहून हेस्टिंग्सनें त्याला दुसरी गोळी घालून ठार केलें.

"पोटासाठीं आता आम्हाला शिकारीचाच आश्रय करावा लागला; आणि त्यामुळें आमचं धाडस पण हळूहळू वाढूं लागलं. आमच्या आंगावरील कपड्याच्या चिंध्या बनल्या होत्या. पण आमच्या जवळ दारूगोळा अजून भरपूर होता. आणि त्या भागात हरीणांच्या अनेक जातींचा तर इतका सुकाळ होता कीं दोनदोनशें हरीणांचा कळप एके-कावेळीं बघायला सांपडत असे. पण याचबरोबर आमचं संकट पण

वाढत चालल होत. कारण आता या प्रांतातच सिंहाच्या गर्जना आमच्या कानावर वाढत्या प्रमाणात पडूं लागल्या. त्यांना आमच्या पासून दूर ठेवण्यासाठीं आम्ही मग माठमोठ्या शेकोट्या पेटवूं लागलों. पण तरीहि त्यांचा वाढता संचार आमचा वारवार थरकाप मात्र करून सोडी."

"तुम्हाला दिवसा कधीं भेटले होते का होते?" विल्यमने विचारलें.

"हो, दिवसा पुष्कळ वेळा भेटत, पण त्यांनीं आमच्यावर हल्ला मात्र नाहीं केला कधीं. आणि आमची पण त्याच्यावर गोळी झाडण्याची छाती नव्हती. एकदा मात्र त्याची आमची अगदीं समोरासमोर गाठ पडली. एक हरीण मारल्यावर ते उचलण्यासाठीं बंदुका खांद्यावर टाकून आम्ही चाललों होतों. त्या पडलेल्या हरीणापासून आम्ही दहा हातावर येतो, इतक्यात एक गर्जना आमच्या कानावर एकदम आली. नीट पहातों तों एक भले माठे वनराज आम्ही मारलेल्या त्या हरीणाचा स्वच्छंद स्वाद चाखीत होते. त्याचे डोळे जणु अंगार वर्षत होते आणि त्यांनीं उडी मारण्यासाठीं अवसान धरलं होतं. आम्ही एकदम तोंडे वळवून इतक्या झपाट्यानें पळायला सुरवात केली, कीं सांगता सोय नाहीं! एकदाहि मागें वळून न पहाता आम्ही सारखे पळत सुटलों होतों. पण तेवढ्यावरच समाधान मानून त्या सिंह महाराजांनीं आपले भोजन पुढें चालू केलं म्हणून ठीक, नाहींतर मोठा कठीणच प्रसंग होता. असे आम्ही कुठे चाललो होतों परमेश्वर जाणें. उत्तर दिशेनें चाललो होतो एवढं मात्र खरं. अशा तीन आठवड्याच्या चालीनें आम्ही पार गळून गेलों आणि आम्हांला आपल्या मूर्खपणाचा भरपूर पश्चात्ताप होऊं लागला. माझी तर अशी अवस्था झाली होती कीं पडल्या जागेवरच मृत्यु येईल तर बरा, असं मला वाटत होतं नि सिंहांची भीति देखील माझ्या मनांतून दूर पळाली

होती, अखेरीस पण एक दिवस एका कारू लोकाच्या टोळीशीं आमची गाठ पडली. ते आपल्या स्वतःकडे बोट दाखवून, 'कारू' असं म्हणत होते, आणि आमच्याकडे बोट करून, 'डच' असं म्हणत. त्याच्या सगतींत आम्ही पाचसहा दिवस होतो. हरीणाची शिकार करून आम्ही त्याना देत असल्याने तें आमच्यावर खूप होते. खुणाच्या साहा-य्यानें जवळपास कोठे डचाची वस्ती असल्यास तिथे आम्हाला घेऊन जाण्याविषयीं आम्ही त्याना विनती केली आणि बक्षीसाची लालूच पण दाखवली. म्हणून त्यानीं दोन जवान आमच्याबरोबर देऊन ते दक्षिण दिशेला निघून गेले. दुसऱ्या दिवशीं आम्ही पण ग्राफ रेनेट नावाच्या एका चारपाच घराच्या डच वसाहतीला येऊन पोंचलों. पण आज आता थांबू या आपण इथेच."

---

: : १४ : :

त्यानंतर मग दोन तीन दिवस माशाचं तळं तयार करण्यांत सारे-जण गुंतले होते. तळं बहुतेक पुरं झालं आणि आत मासे पण भरपूर झाले होते. त्याच दिवशीं रात्रीं रेडी आपला इतिहास पुढे चालू करणार होते. पण विल्यमला थंडी वाजून आली आणि त्याचं डोकं विलक्षण दुखू लागल. तो म्हणे डोक्यात सारख्या कळा येताहेत. त्याला रेडींनीं आथरूणात नेऊन निजवला आणि त्याला चांगला सणसणीत तापहि भरला. दुसरे दिवशी पण तापाचा जोर मुळींच कमी झाला नाहीं आणि सर्वांच्या तोंडच पाणी पळाल. रेडी नि सीग्रेव्ह सारखे आळीपाळीनें त्याच्या आथरुणाजवळ बसून होते आणि रात्रंदिवस तीं सारीं माणसं परमेश्वराची आळवणी करीत होतीं. रेडींचा तर विल्यमवर फारच लोभ होता, आणि ते काम करीत असले तरी लक्ष मात्र सारं विल्यमकडे लागलेलं आणि डोळ्यातून गालावर नीरव अश्रु ओघळत असलेले. अनेक वेळा त्यानीं परमेश्वराची प्रार्थना केली आणि अखेरीस विल्यमला उतार पडूं लागला आणि पंधरा दिवसात तो आपल्यापुरता तरी सारी हालचाल करूं लागला. मग दोन चार दिवसातच तो हिंडू फिरू लागल्यावर रेडीं-बरोबर समुद्रकिनाऱ्यावर त्यानें फेरी टाकली. त्या दरम्यानच्या काळांत पुऱ्या झालेल्या कामानें त्यालाहि आनंद वाटत होता आणि तो म्हणाला; " रेडी आता तुम्ही हें काम तर पार झपाटून टाकलंत. तर मला वाटतं आपण आता या आपल्या बेटाचं संशोधन पुरं करूं या. "

" कांहीं हरकत नाहीं, विल्यम, पण अजूनहि तुला विश्रांतीची

जरूर आहे. म्हणून आणखी थोडे दिवस थांबू या आपण. परमेश्वरानें तुला आपला आशीर्वाद दिला आहे आता."

"पण रेडी तुमची गोष्ट आतां पुढे चालू करूं या कीं आपण. पुष्कळ दिवसांचा खंड पडला आहे त्यात माझ्या आजारामुळें आणि गोष्ट ऐकताना काहीं नाहीं मला थकवा येणार, बरं का. ग्राफ रेनेटला तुम्ही जाऊन पोंचला, इथपर्यंत झालं होतं."

"हां; ठीक. आम्हांला येताना पाहून तो डच शेतकरी पुढे आला आणि त्यानें आमची चौकशी केली. आम्ही इंग्लिश बंदी आहों आणि आम्ही आपल्याला ताब्यात देण्यासाठीं इथे आलों आहोंत, असं आम्ही त्याला सांगितलं. त्याने प्रथम आमचीं हत्यारं काढून घेऊन आम्हांला सांगितलं कीं तोच तिथला मुख्य आहे आणि आता हत्यारं नसल्यामुळे तुम्ही पळून जाणं काहीं शक्य नाहीं. केपला तुम्हाला एवढ्यात काही मला पाठविता येणार नाहीं, तर नीट रीतीनें राहून जर काम केलंत तर खायला प्यायला भरपूर मिळेल. आम्ही त्याला मोठ्या आनदानं समती दिली. पण आम्हाला लौकरच अनुभवानें समजलं कीं तो अत्यंत क्रूर असा माणूस होता आणि आम्हाला पोटभर काम जरी तो नेहमीं देई तरी पोटभर अन्न मात्र त्याने आम्हाला कधींच दिलं नाहीं. अन्नाचा तुटवडा भासूं लागला कीं रानटी गाढव मारून तो आणी आणि त्याचं मांस आम्हाला खायला घाली. हॉटेनटॉट लोक फक्त हे मांस खात असत, आणि आम्हाला ते कधींच आवडलं नाहीं. त्याच्या घरातलीं सारीं माणसं हरीणाच्या मांसावर ताव मारीत असत, पण आमच्या नशीबीं मात्र तेंच रान गाढवाचं मांस येई. म्हणून आम्हाला एक बंदुक द्या म्हणजे आम्ही हरीण मारून आणतों असं रोमर एक दिवस बोलला तर त्यानें त्याच्या पोटात अशी काहीं लाथ लगावली कीं त्यानंतर दोन तीन दिवस तो नीट हालचालही करू शकला

नाहीं. या असल्या वागणुकीनें आम्ही आपल्या जीवालाहि कंटाळलों. त्याचा क्रूरपणा दिवसेंदिवस जास्तच वाढूं लागला आणि आम्हाला तें असहनीय होऊन आम्ही एक दिवस त्याला तसें स्पष्ट सांगितलें. पण तो जो विलक्षण भडकला आणि त्यानें दोघा हॉटनटॉटनां- सागून हेस्टिंग्सला एका वॅगनच्या चाकाला घट्ट बाधून टाकले आणि चाबकानें त्याची पाठ फोडून टाकण्यासाठीं आपल्या गेंड्याच्या कातड्याचा चाबूक आणण्यासाठीं तो आत गेला. ती संधी साधून हेस्टिंग्स म्हणाला: 'त्यानें मला जर आज मारलं तर मग सारं संपलं असंच समजा. तर आता वेळ घालवू नका. घराच्या मागील दारीं पळा आणि तो चाबूक घेऊन बाहेर आला कीं तुम्ही आत शिरून त्या भरलेल्या बंदुकी घेऊन बाहेर या आणि त्याच्यावर बंदुक रोखून मला मोकळा करा कीं मग आपण येथून कायमचेच निघून जाऊं. जर तुमच्या हातून हे झालं नाहीं तर मरेमरेपर्यंत तो मला फोडून काढील, आणि तुरुंगातून पळून आलेले कैदी म्हणून आपल्याला गोळ्या घालून ठार करील. तर आता नीट सावधगिरीनें चपळाई करा.' आम्हाला तें पटून आम्ही त्याप्रमाणें केलं. घराच्या मागें जाऊन तो डचमन बाहेर जाताच आम्ही आत शिरलों आणि त्या भरलेल्या बंदुकी आणि एक सुरा घेऊन ताबडतोब बाहेर आलों. डचमननें चाबकाचा पहिला फटकारा हेस्टिंग्सच्या पाठीवर उडवला होता, आणि बिचारा हेस्टिंग्स त्यानें अगदीं कळवळला. आम्ही पुढें झालों, आणि आमची चाहूल लागून तो डचमन मागें वळला. आम्ही दोघानीहि आपल्या बंदुका त्याच्यावर रोखल्या आणि तो एकदम थाबला. 'दुसरा फटका तर उडव कीं ही गोळी सुटलीच म्हणून समज;' रोमर ओरडून म्हणाला. 'होय, साभाळ,' मी म्हणालों. 'आम्ही लहान पोरं आहों यावर नको जाऊ. इंग्लिश बच्चे

आहोत आम्ही, हें ध्यानात ठेव.' आम्ही आपल्या बंदुका तशाच त्याच्यावर रोखून पुढे झालों आणि रोमरला बंदूक तसाच रोखलेला ठेऊन मी हातातील सुऱ्याने दोऱ्या तोडून हेस्टिंग्सला मोकळा केला. तो डचमन घाबरून पादरा फटक पडला होता आणि त्याचे ते नोकर दूर पळून गेले होते. मोकळा झाल्याबरोबर हेस्टिंग्सने जवळची एक मोटी लाकडी हातोडी उचलून त्यानें ती त्या डच मनच्या डोक्यात घातली. 'एका इंग्लिशमनला चाबूक मारल्या-बद्दल हे बक्षीस ह तुला, बदमाष !' तो ओरडला.

" खाली कोसळलेल्या त्या डचमनला आम्ही मग त्याच काढ-ण्यानी वॅगनच्या चाकाना बाधून टाकला आणि परत घरात जाऊन दारूगोळा नि तशाच एक दोन उपयुक्त जिनसा गोळा करून आम्ही मागें तबेल्यात गेलो आणि तीन उत्तम घोडे आणि त्याच्या तोबऱ्या-साठीं थोडं धान्य घऊन आम्ही त्याच्यावर स्वार झालों आणि त्याना टाच मारून केपच्या दिशेने दौडत निघालो. आणि मग पाठलाग होऊ नये म्हणून जगलात येऊन घोड्याच्या टापाच्या खुणा दिसणार नाही असं आम्हाला वाटल्यानंतर आम्ही आपली दिशा बदलली आणि पूर्वेकड दुशमन लोकाच्या प्राताकडे वळलों. ती सारी रात्र आमचा प्रवास चालला होता. सिंहाच्या गर्जना आमच्या कानावर तर सारख्या येत होत्या. पण सुदैवानें आमच्यावर कसलंच संकट मात्र कोसळल नाहीं. सकाळीं सूर्योदय होताच आम्ही आपल्या घोड्याना विश्राति दिली आणि त्याना दाणा दिला आणि पळवून आणलेल्या ब्रेड मासावर आम्हीही आपली न्याहारी उरकली."

" ग्रॅफ रेनेटवर किती दिवस होता तुम्ही ?"

" जवळजवळ आठ महिने होतो बाबा तिथे; आणि त्या अवधींत आम्ही डच भाषा तर चागली बोलायला शिकलोंच पण त्याच बरोबर

दुसऱ्या एकदोन रानटी भाषाचं मोडकं तोडकं ज्ञानपण पैदा केलं. आमची न्याहारी चालू असतांच आमचे पुढं काय करायचं त्याचे विचार पण चालले होते. आता डचमनांच्या तडाक्यांत सापडलो तर आम्हाला ते ठार मारल्याशिवाय राहणार नाहींत हे निश्चित होतं. आणि तो शेतकरी जर मेला असला तर केपला जाताच आमची फाशी ठरलेली होती. म्हणून आम्हीं दुशमनाच्या देशातून पलीकडे जायचं ठरवलं. आणि तिथून केपच्या उत्तर बाजूचा समुद्र-काठ गाठण्याचा आमचा विचार होता. सापडले जाण्याच्या भीतीनें आम्ही पुढचा प्रवास रात्रींच करायचा असं ठरवून विश्रांतीसाठीं जमीनीवर आडवे झालों. सध्याकाळ झाल्यावर गोड पाणी शोधून काढून आणि तें घोड्याना पाजून आम्ही आपला प्रवास परत सुरू केला. असे आमच्या घोड्याच्या श्रमाची फिकीर न करता जवळजवळ पधरा दिवस आम्ही सारखे जात होतों. पण मग घोडे अगदींच थकून गेल्यामुळे गोरागुआ नावाच्या रानटी लोकाच्या मुलुखात आम्ही विश्रांतीसाठीं म्हणून थाबलो. सुदैवाने हे लोक स्वभावानें गरीब होते. त्यानीं आमची नीट विचार पूस केली आणि उत्तम दुधाचा तर आमच्यावर जसा वर्षावच केला. तिथे असताना देखील मधून मधून काहीं संकटाना आम्हाला तोंड द्याव लागलच होतं. एक दिवस असे थोडयाशा झाडींतून आम्ही चाललों होतों तों एका गेंडयानें माझ्या घोडयावर हल्ला चढवला. माझा घोडा मोठया चपळाईनें बाजूला निसटला म्हणून ठीक, नाहींतर त्याच्या पोटाचा कोथळाच फुटून बाहेर आला असता; आणि ते गेंडेबुवाहि आम्हाला अधिक त्रास न देतां मग सरळ पुढे निघून गेले. पोटासाठी आम्हाला रोज कसली तरी शिकार ही करावीच लागे. पण एकंदरींत तेथल्या मुक्कामाचे ते तीन आठवडे साधारणपणे बरे गेले.

"या विश्रांतीनंतर आमचीं वाहनेहि चांगली ताजीतवानीं झाली होतीं म्हणून मग आम्हीं गावकऱ्यांचा निरोप घेऊन दक्षिण दिशेनें समुद्राकडे निघालों. कारण उत्तरेला काफीराची अतिशय क्रूर जात राहाते अशी माहिती या गारागुआ लोकांनीं आम्हाला दिली होती. पण खरी वस्तुस्थिती अशी होती कीं काय करावं हें आमचं आम्हालाच कळत नव्हतं. कुठे जायचं हें निश्चित न ठरवतांच आम्ही मूर्खासारखं केप सोडलं होतं. आणि आमच्या अडचणी तर रोज वाढतच चालल्या होत्या, अखेरीस आम्ही एकमतानें ठरविलं कीं केपला परत जाऊन अधिकाऱ्यांच्या आपण स्वाधीन व्हायचं कारण प्रवासाचे श्रम आणि संकटाची नि मृत्यूच्या धोक्याची सदाची टांगती तलवार यानीं आम्ही मेटाकुटीला आलों होतों. येऊन जाऊन आम्हाला त्या आम्ही ठार मारलेल्या डचमनचीच भीति होती, म्हणून परत एकदां घोड्याचीं तोंडें वळवून आम्ही केपची वाट चालू लागलों.

" आता आमच्या प्रवासांतली अत्यंत करुण अशी गोष्ट सांगायची आहे. गारागुआना सोडल्यानंतर चारच दिवसानीं एका उंच गवताळ प्रदेशातून आम्ही जात असताना मध्येच आपल्या सावजावर ताव मारीत असलेल्या एका सिंहाजवळ आम्ही अवचित येऊन अडखळलों. आणि सर्वांच्यापुढे असलेल्या रोमरने आपला संकेत विसरून जाऊन घाबरलेल्या मनःस्थितींत आपली बंदुक झाडली. सिंहासारख्या अत्यंत बलाढ्य अशा प्राण्यावर बंदुक झाडणं आमच्या दृष्टीनें अत्यंत धोक्याचं असल्यानें तसला वेडेपणा कधीं करायचा नाहीं, असं आमचं ठरलं होतं. पण आता काय, गोळी झाडली गेली होती. सिंहमहाराजाना ती निसटती लागून त्यानीं मैलभर लांब ऐकूं जाईल अशी एक प्रचंड गर्जना केली आणि रोमरवर झडप घालून त्याला पंजाचा एकच फटकारा लगावला आणि रोमर

घोड्यावरून खालीं गवतात आदळला. आमचे घोडे बुजून एकदम मागे वळून पळत सुटले. वनराज आमच्यावरहि हल्ला करण्याच्या तयारींतच होते आणि त्यानीं आमच्या दिशेने एक झेप घेतली. सुमारें अर्धा मैल गेल्यावर कुठे आम्ही आपले घोडे जरा आवरूं शकलों. आम्ही मागें वळून पाहिले. त्या सिंहानें रोमरच्या घोड्याला फाडून काढून त्याचं प्रेत घेऊन तो दौडत निघाला होता. तें एवढं मोठं ओझं घेऊन दौडताना त्याला कसलेच श्रम होत असल्याचं दिसत नव्हत. तो दूर गेल्यावर आम्ही रोमर पडलेल्या जागेवर गेलों. आम्हाला तो मेलेलाच सापडला; सिंहाच्या पंजाच्या त्या एका फटकाऱ्यानेच बिचाऱ्याच्या मस्तकाच्या चिंधड्या उडाल्या होत्या.

“ गारागुआ लोकांच्या सांगण्याप्रमाणें आमचा प्रवास दिवसाचा चालू होता. आणि ही एक भयंकर आपत्ती सोडली तर त्याचा सल्ला शहाणपणाचा होता असंच आम्हाला अनुभवानें दिसून आलं. कारण मागे पुष्कळ वेळा रात्रीच्या प्रवासात सिंहानीं आमचा लांबवर पाठलाग केला होता. पण दिवसा ती धास्ती कमी असे. तरी सुद्धा त्या जंगलातल्या प्रवासातून परमेश्वरी कृपेशिवाय आमची सुखरूप मुक्तता होणं सर्वथैव अशक्य होतं. त्यानेच आम्हाला अनेक संकटांतून सही-सलामत पार केलं होतं. बिचाऱ्या रोमरच्या मृत्युनंतर तीन दिवसानीं आम्हांला महासागराचं एकदाच दर्शन झालं. पण समुद्र किनाऱ्याने प्रवास करणं जरी बिनधोक्याचं असलं तरी शिकारीच्या दृष्टीनें निरुपयोगी आणि आमचं पोट तर रोजचंच शिकारीवर अवलंबून. म्हणून तो बिनधोक मार्ग सोडून आम्हाला परत जंगलाचा मार्गच स्वीकारावा लागला. पण आता आम्हाला दोनतीन दिवस काहीच न मिळता उपासच काढावे लागले. पण एक दिवस दैवयोगानें एक शहामृग आम्ही पाहिलं. हेस्टिंग्सनें त्याचा पाठलाग सुरू केला.

पण त्याचा वेग घोड्यापेक्षा कितीतरी जास्त होता. मी मागेंच थांबलो होतों आणि मी सभोंवार पहात असता मला त्या शहामृगाचें घरटं सांपडलं. तेरा अंडी होतीं त्यात; तीं पाहून मी तर अतिशय खुष झालों. इतक्यात हेस्टिंग्ज पण हात हलवीत परत आला. त्याचा घोडा तर विलक्षणच थकलेला दिसत होता. आम्ही आधीं विस्तव पेटवून दोन अंडीं भाजून आपली पोटपूजा उरकली आणि आणखीं चार अंडीं घेऊन आम्ही आपला प्रवास परत सुरू केला. अखेरीस एक दिवस असा तिसरे प्रहरीं टेबल मौंटन आमच्या दृष्टीस पडला आणि इंग्लंडचा किनाराच नजरेस पडल्या इतका निर्भर आनंद आम्हांला झाला. आतां रात्रीं आपण तुरुंगाच्या भिंतींच्या आत सुखरूप जाऊन पडणार म्हणून आम्ही आपला वेग वाढवला. आम्ही जसजसे किनाऱ्याच्या जवळ येऊं लागलों तसतसे बंदरातील जहाजावर इंग्लिश निशाणं फडकताना पाहून आम्ही बुचकळ्यात पडलों. सहा महिन्यापूर्वीच तें बंदर इंग्लिशांच्या हातात पडल्याचं मग एका सैनिकानें आम्हाला सांगताच आमच्या आनंदाला तर पारावारच राहिला नाहीं. आम्ही तडक गव्हर्नरपर्यंत आपली वर्दी पोंचवली. त्यांनीं आमची सर्व हकीगत ऐकून आम्हाला मायदेशीं परत जाण्यासाठीं म्हणून एका ॲडमिरलच्या स्वाधीन आम्हाला केलं आणि त्यानें आम्हाला आपल्या लढाऊ गलबतावर नेलं. आमच्या जल प्रवासाला परत प्रारंभ झाला. रोमरच्या मृत्यूचंच दुःख काय तें आम्हाला आता मधून मधून व्यथित करीत होतं. पण बाकी सर्व सुरळीतपणें चालू झालं होतं."

:: १५ ::

दुसरे दिवशीं काही विशेष काम नसल्यामुळें रेडी आणि सीग्रेव्ह गळ घेऊन मासे पकडण्यासाठीं बदरावर गेले. विल्यम पण मोकळया हवेवर म्हणून त्याच्या बरोबर गेला होता. त्याचं मासे पकडणं चालू होतं. विल्यम विचारीत होता : " या आसपासचे बेटांवर कसले लोक रहात असतील हो रेडी. "

" पुष्कळ प्रकार आहेत त्याच्यात. न्यू झीलंडमधले लोक कांहीं फारसे सुधारलेले नाहींत. ऑस्ट्रेलियाच्या काहीं भागात तर अजून असे लोक आहेत कीं त्याना पशून समजाव लागेल. त्याच्याजवळचीं हत्यारं पण तशींच ओबडधोबड असतात. काहींची प्रगती मात्र धनुष्यबाण वापरण्याइतकी झालेली आहे. या आपल्या समोंवारच्या बेटावर कसले लोक असतील काहीं नक्की नाहीं सांगता येणार. पण मास्टर विल्यम तूं आतां या उन्हांत इथ राहणं काहीं बरं नाहीं. तूं आता घरीं जा. आम्हीहि तुझ्या मागोमाग येतोंच आणि मग मी आपली गोष्ट पण पुढें चालू करीन. "

त्यानीं आज खूप मासे पकडले होते म्हणून त्यांच्या जेवणांत जूनो नि मिसेस सीग्रेव्हनीं माशाचे विविध प्रकार जेवणासाठीं तयार केले. त्यामुळें सारेजण आज खूष होते. जेवण आटोपतांच रेडीनीं सुरवात केली.

" त्या जहाजावर मी आणि हेस्टिंग्स चार वर्षे होतों जवळ जवळ. आमचं जहाज लढाऊ होत. त्यातून आम्ही अनेक बंदरं हिंडलों. जहाजावरच्या निरनिराळ्या कामावर माझी नेमणूक होत होती. त्यामुळें माझं ज्ञान सारख वाढत होतं आणि पाठीशीं काहीं काळजीकथा

नसल्यामुळें माझी तब्बेत पण सुंदरच झाली होती. आमचे कप्तान-साहेब चांगले होते, अन्नहि चांगलं, कामहि त्रासदायक नि अतिरिक्त नाहीं, त्यामुळें आयुष्य मजेत चाललं होतं. पण इंग्लंडला परत जायला मिळत नसल्यामुळें मला आईची भेट होत नाहीं म्हणून मधून मधून फार वाईट वाटे. मी दोनतीन पत्रं पाठवलीं पण त्यांचं उत्तर न आल्यामुळे मी अतिशय अधीर झालों आणि जहाजावरून पळून जाण्याचे विचार माझ्या मनात घोळू लागले. त्यावेळीं आम्ही वेस्ट इंडीज बेटात होतों. मी हेस्टिंग्सबरोबर पण विचारविनिमय केला आणि त्यालाहि माझा विचार पटून अनुकूल संधीची आम्ही वाट पहात बसलों. म्हणून आमचं जहाज पोर्ट रॉयल जमेकाला असता आमच्या सभोंवार साखरवाहू अनेक गलबतं नांगरलेलीं आम्ही पाहिलीं आणि आमचा विचार बळावला. या जहाजावर माणसाचा नेहमींच तुटवडा असे. त्यामुळें त्या जहाजावर पळून गेल्यास नोकरीची सोय होणं शक्य होतं. पाण्यात हळूच उतरून पोहत जाऊन जवळचं गलबत गाठणं कांहीं मोठंसं कठीण नव्हतं. येऊन जाऊन एकच भीति आमच्या पोटांत उभी राही; ती म्हणजे शार्क माशाची. तरीसुद्धा त्या रात्रीं प्रयत्न करण्याचा आम्ही निश्चय केला. इतके आम्ही आता घरीं जायला उत्सुक झालों होतों. एक जायचं, बस्स! दुसरा कोणताच विचार आमच्या डोक्यात उत्पन्न होत नव्हता; आणि झालाच तरी आम्ही तो दडपून टाकीत होतों. अशी मध्यरात्रीची वेळ होती मला वाटतं. आम्ही दोघेहि हळुच उठलों नि डेकवर गेलों आणि दोऱ्याच्या साहाय्याने अतिशय सावधगिरीनें खालीं पाण्यात उतरलों. आणि एकदा पाण्यात उतरताच जवळच्या जहाजाच्या दिशेनें आम्ही झपाट्यानें पाणी कापण्यास सुरवात केली. आमच्या हालचाली-मुळें वरच्या पाहारेकऱ्यानें आरोळी दिली, पण कांहींच उत्तर न देतां

आम्ही जोरात पाणी कापीतच होतों. आमच्या मागोमाग पाण्यात होडी लोटतील अशी आमचीहि कल्पना होती. पुढच्या गलबताच्या नागराचा दोर माझ्या हाताला लागला आणि मी सरासर वर चढण्याला सुरवात केली. माझ्यामागे आठ दहा फुटावरच हेस्टिंग्स होता. मी वर चढण्याला प्रारंभ केला त्याच वेळीं त्याची किंकाळी माझ्या कानावर आली.गर्भगळीत होऊन मी एकदम मागे पाहिलें एक भला मोठा शार्क हेस्टिंग्सला जबड्यात पकडून खालीं निघाला होता. एक दोन क्षणच माझे हात पाय जड झाले; पण थोड्याच वेळात परत सावध होऊन मी वेगानें वर चढूं लागलों. माझं नशीब बलवत्तर होतं कारण दुसरा एक शार्क माझ्या अगदीं पाठीवरच होता आणि दोरीजवळ येताच मी जरी पाण्यापासून तीन चार फूट वर होतो तरी त्यानें जबडा वासून वर उडी मारली. माझा बूट त्याच्या तोंडात सापडला आणि त्यानें खालीं बुडी मारली. भीतीनें माझ्या देहात आता सामर्थ्य उत्पन्न झालं होतं आणि मी आपली पराकाष्ठा करून जेमतेम जहाजाचा कठडा एकदाचा गाठला. वरच्या लोकांनीं हेस्टिंग्सचा मृत्यु पाहिला होता. त्यांनीं मला हात देऊन वर ओढून घेतला आणि त्यांनीं घाई-घाईनें मला खालीं नेलें. माझ्या मागोमाग आमच्या जहाजावरची होडी आली पण आम्हा दोघांना शार्कनीं खाल्लं असंच त्यांना वाटण्यात आलं आणि त्यांनीं पण हेस्टिंग्सची आर्त किंकाळी ऐकली असल्यामुळे त्यांना तें खरं वाटून आमचे लोक परत गेले. कांहीं वेळानें आमच्या मृत्यूची दखल घेणारा ड्रमचा आवाज माझ्या कानावर आला आणि मी निर्धास्त झालो. असा परमेश्वराच्या कृपेनें मी परत एकदां मृत्युमुखातून निसटलों होतों."

"मोठी आश्चर्यजनक घटना आहे ही रेडी," सीग्रेव्ह म्हणाले.

"खरं आहे तुमचं म्हणणं मि. सीग्रेव्ह. त्यानंतर काही तास

माझी मनःस्थिती काय होती याचं मी नीटसं वर्णन करू शकत नाहीं. मी झोप घेण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ. दुर्दैवी हेस्टिंग्सची करुण किंकाळी माझ्या कानात सारखी घुमत होती, भीतीनें माझा सारखा थरकाप उडत होता आणि जरा डोळा लागतांच मी किंचाळून जागा होत होतों. अखेरीस कप्तानाने दारूचा एक मोठा डोस मला पाजला आणि मला गुंगी आली. मी जागा होऊन पाहिलें तेव्हा बंदर सोडून आम्ही पुष्कळच दूर आलों होतों. जहाजाचीं सर्व शीडें वारा भरून वाकली होतीं. आमच्या भोवती शभर पाऊणशे गलबताचा ताफा निघाला होता, आणि आमच्या संरक्षणार्थ आमच्या बरोबर येत असलेल्या लढाऊ जहाजावरून तोफांचा धडधडाट ऐकू येत होता. मोठ सुंदर दृश्य होत ते. मी परत मायदेशीं निघालों होतों. मला अत्यंत आनंद झाला होता, मी आपल्या माय देशाच्या किनाऱ्यावर लौकरच पाय टेवणार होतों आणि न्यू कॅसलला जाऊन मी आपल्या प्रिय मातेची भेट घेणार होतो. हा आनंद लुटण्यासाठीं मी गेल्या रात्रीच साहस करण्यासाठीं परत देखील केव्हाच तयार झालों असतो!"

"म्हणजे तुमच्या त्या अद्भुत सुटकेमुळें तुमच्यावर झालेला परिणाम काहीं फार वेळ नाहीं टिकला."

"असं नव्हे मॅडम. ती एवढीं जहाजं नजरेला पडतांच त्यावेळीं मनांत आलेला तो विचार होता, इतकच तशी माझ्या मनाची ठेवण गंभीरच आहे. आणि त्याच रात्रीं आथरुणावर पडताच मी परमेश्वराची अनन्यभावानें प्रार्थना केली. आमच्या या नव्या गलबतावर एक स्कॉचमन होता. त्याने मला असा वाचवण्यात परमेश्वराचा कांहीं हेतू असावा असं बजावून सांगितल. मलाहि तें पटत होत. आणि खरच मॅडम, त्याच भल्या माणसानें मला बायबलची खरी गोडी लावली. रोज रात्रीं तो माझ्या जवळून बायबल वाचून घेई, त्याचा

अर्थ सांगे आणि त्याचं महत्व मला पटवून देई. जहाजावरहि मी काम करीत होतोंच. माझ्या कामानें कप्तानहि माझ्यावर खूष होता आणि आम्ही ग्लासगोला पोंचतांच त्यानें मला पंधरा गिनी दिल्या आणि मी मोठ्या आनंदाने न्यू कॅसलला निघालों. मेल कोचवर मी बाहेरच्या बाजूला बसलों होतों. आणि माझ्या शेजारीं बसलेल्या गृहस्थाजवळ मी बोलण्याला सुरवात केली. ते न्यू कॅसलचेच होते. त्यांच्याकडून मला समजलं कीं माझा देव पिता, मि. मास्टरमन, हे तीन चार महिन्या-पूर्वींच मरून गेले होते. 'मग त्यांनीं आपला पैसा कुणाला ठेवला?' मी त्यांना विचारलं. 'कारण ते अतिशय श्रीमंत होते आणि त्यांना कोणी नात्याचं पण नव्हतं.' 'होय, त्याना नात्याचं कुणी नव्हतं, आणि त्यानीं आपला पैसा धर्मार्थ म्हणून देऊन टाकला. पण माझ्या माहितीप्रमाणें, त्यांच्या मनातून एका छोकऱ्याला आपली सर्व इस्टेट द्यायची होती. रेडीं असं होतं मला वाटतं त्याचं नांव. पण तो पठ्ठ्या कुठे म्हणे समुद्रावर गेला पळून आणि त्याचा कांहींच पत्ता लागत नव्हता. कुठे तरी बिचारा कैदी तरी झाला किंवा मरून गेला; काही नक्की काहीच माहिती मिळूं शकली नाहीं मास्टरमनना. मूर्ख बेटा! नशीबात नव्हती एवढी संपत्ती त्याच्या, दुसरं काय म्हणायचं!'

"'खरंच मूर्ख यांत काहीं शंका नाहीं;' मी म्हणालों.

"'होय, पण इतकंच नाहीं; त्यानें आणखी एक मोठं नुकसान करून घेतलं स्वतःचं. त्याची दुर्दैवी आई—काय प्रेम होतं तिचं त्याच्यावर!—त्याचा पत्ता लागत नाहीं असं ऐकून झुरत चालली, हायच घेतली म्हणे तिनें, आणि—'

"'म्हणजे, वारली कीं काय ती?' त्यांचा हात पकडून मी एकदम विचारलें.

"'होय,' चकित होऊन आणि माझ्याकडे चमत्कारीकपणें पहात

ते म्हणाले. ‘ गरीब बिचारी गेल्या वर्षी मरून पण गेली—हृदय फुटून मरून गेली. ’

“ मी एकदम मागच्या गाठोडयांवर कोसळलों आणि त्या गृह-स्थांनीं माझा हात पकडला नसता तर मी खालीं रस्त्यांतच पडलों असतों. त्यानीं कोचमनला हांक मारून गाडी थांबवली, आणि मला गाडीच्या आंत बसवून गाडी पुढे चालू झाली. आंत मी मुक्त कंठानें सारखा रडतच होतों. ”

रेडींचं हृदय इतकं भरून आलेलं दिसलं कीं गोष्ट आज इथेच थांबवावी अशी सीग्रेव्हनीं त्यानां सूचना केली.

“ तसंच करूंया मि. सीग्रेव्ह. आज आत्तां सुद्धां माझे डोळे अश्रूंनीं भरून आले आहेत. आपल्या स्वतःच्या मूर्खपणामुळें आपण एका वत्सल हृदयाचा अकाल मृत्यू घडवून आणला, हा विचार या वयांत सुद्धां मला जसा भाजून काढतो आहे, पण तसं झालं खरं; आणि विल्यम तूं कांही यावरून बोध घ्यावास म्हणूनच हें सत्य तुला मी सांगतों आहें. ”

---

## : : १६ : :

त्यानंतर तीन चार दिवसांनीं जूनो अगदीं उजाडत आपल्या झग्याच्या पदरात पांच सहा ताजीं अंडीं घेऊन तबूत आली. कोंब ड्यांच्या खुराडयांत तिला आज तीं सापडलीं होतीं.

"हीं पहा मिसी सीग्रेव्ह–कोंबडीचीं अंडीं–आता खूप मिळतील–मास्टर विल्यमला खूप मिळतील–चागली शक्ती येईल त्याला—आणि पिल्लं पण होतील खूप."

"सगळींच नाहींना आणलींस पण जूनो?"

"अंहं; कोंबडीला बघायला एकेक ठेवलं आहे"

"बर तर, विल्यमसाठीं ठेवूं हीं आपण, म्हणजे तू म्हणतेस तसा लौकर बळकट होईल तो."

"पण मी आत्तांच झालों आहे कीं बळकट आई," विल्यम म्हणाला; "आणि मला वाटतं कीं कोंबडयाना उबवायला ठेवलीं हीं अंडीं तर बरीं."

"अंहं, विल्यम; पिल्लं लौकर मिळण्यापेक्षां तुझी तब्बियत जास्त महत्व चीं आहे आम्हाला."

"बर बुवा, आपली उलट चगळच झाली."

दोन तीन दिवंस मग रेडी नि सीग्रव्ह त्याच्या शेतातलं गवत उप टून साफ करण्यात गुंतले हाते. त्यानीं लावल्या बटाट्याचे रोप आतां चागलं तरारले होते. या दिवसात जूनो पण बहुतेक विल्यमसाठीं रोज चार दोन अंडीं घेऊन यतच असे आणि त्याची पण तब्बियत त्यामुळें झपाट्यानं सुधारत होती. पहिले दोन तीन दिवस जूनो नियमितपणे तीन चार अंडीं रोज घेऊन यायची. पण चौथ्या दिवशीं तिला एकहि

अंडें मिळालें नाहीं. पांचव्या दिवशीं पण काही मिळालं नाहीं. याचं साऱ्यानाच आश्चर्य वाटलं. कारण कोंबडया अंडीं घालायला लागल्या कीं त्या बहुतेक रोज अंडी घालतातच. सहाव्या दिवशीं सकाळीं न्याहा-रीच्या वेळीं, टॉमीची स्वारी कुठेच दिसेना म्हणून त्याच्या आईनें त्याची चौकशी केली.

"मला वाटतं मॅडम," रेडी हंसत म्हणाले, "कीं टॉमी न्याहारी-लाच नव्हे पण दुपारीं जेवायला सुद्धा येणार नाहीं बहुतेक."

"म्हणजे काय रेडी?" मिसेस सीग्रेव्हनी विचारलें.

"थांबा, सांगतों हं सारी गंमत. आज दोन दिवस अंडीं मुळींच कशी नाहींत याचं आश्चर्य वाटून कोंबडयानीं अंडीं कुठे दुसऱ्या जागीं घातलीं नाहींना, अशा विचारानें मी जरा आसपास हिंडलों. पण मला अंडीं घातलेलीं जरी काही कुठे दिसलीं नाहींत तरी पण त्यांचीं टरफलं मात्र मला सापडलीं. म्हणून मी काय तर्क केला कीं या बेटावरच्या कोणातरी अज्ञात प्राण्यानें तीं पळवलीं असावींत, आणि त्यानीं टरफलं लपवून ठेवण्याची कांही तेवढीशी काळजी घेतली नाहीं. म्हणून आज सकाळीं मी केल काय तर खुराडयाच मोठं दार टाकलं लाऊन आणि कोंबडयाचं आत जायच यायचं छोट दार ठेवलं उघडं. आणि मग तुम्ही सारीं उठल्यानंतर बसलों पहारा करीत नि काय. आणि मग काय झाली गंमत, आपल्या टॉमीची स्वारी तिथे उपस्थित झाली आणि तें मोठं दार उघडत नाहींस पाहून त्या छोट्या दारानें रांगत रांगत आत खुराडयांत प्रविष्ट झाली. तो आंत गेल्यावर मी पटकन पाय न वाजवता पुढे झालों आणि त्या दाराची खिटी लाऊन टाकली. म्हणजे आपले टॉमी बुवा असे त्या पिंजऱ्यांत आता अडकून बसले आहेत."

" आता तिथेच राहूदे सबंध दिवस त्या खादाडबुधल्याला ! " सीग्रेव्ह म्हणाले.

" हो, त्या शिवाय धडा नाहीं मिळणार त्याला, " मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या.

न्याहारी उरकल्यावर मग जो तो आपल्या कामाला निघून गेला. टॉमी एक तासभर स्वस्थ बसला होता. पण मग त्यानें भोकाड पसरलं. पण त्याच्याकडे कोणीच लक्ष दिलं नाहीं. दुपारीं जेवणाच्या वेळीं पण त्यानें आरडा ओरडा करून पाहिला, पण सकाळ प्रमाणेंच आत्ताहि त्याच्याकडे कुणींच लक्ष दिलं नाहीं. पण मग संध्याकाळीं मात्र त्याला रेडीनीं बाहेर आणलं. तो अतीशय खजील झाला होता आणि कांहीं न बोलतां एका कोपऱ्यांत तो गुपचूप बसून राहिला.

" हं, काय टॉमी, आज किती अंडीं खलास केलींस ? " रेडीनीं त्याला विचारलें.

" आता नाहीं टॉमी खाणार अंडीं, खरंच नाहीं खाणार टॉमी," टॉमी म्हणाला.

" बरं बरं, तेंच चागलं. नाहीं तर आजच्या सारखं जेवायला नाहीं मिळणार त्याला, बरं का; " सीग्रेव्ह म्हणाले.

मग पानावर वाढीपर्यंत टॉमीची स्वारी अगदीं गुपचूप बसली होती; पण वाढून झाल्यावर मात्र त्यानें साऱ्या दिवसाचा वचपा काढण्याच्या इराद्यानें ताटावर हल्ला चढवला. जेवण झाल्यावर मग रेडीनीं आपलं कथानक पुढें चालू केलं.

" मी मेलों या कल्पनेनें हाय खाऊन माझी प्रेमळ आई झिजून मेली असं मला त्या गृहस्थांनी सांगितलं, इथपर्यंत आलों होतों मी; नाहीं का ? मग न्यू कॅसलला येईपर्यंत माझं मन सारखं तळमळत होतं. आईच्या मृत्यूबद्दलची सारी हकीगत कळून घ्यायला मी अगदीं

अधीर झालों होतों. आमची टपाल गाडी उभी राहतांच ते गृहस्थ खालीं उतरून माझ्याजवळ आले आणि म्हणाले: 'मी जर चुकत नसेन, तर तूंच मास्टरमन रेडी आहेस असं वाटतं मला; होय ना?' मी जड अंतःकरणानें होकारार्थी मान हलवली, 'कांहीं हरकत नाहीं बच्चा, असा धीर सोडूं नको.' ते गृहस्थ म्हणाले. 'लहान होतास त्यावेळीं तूं, म्हणून असा अविचार झाला तुझ्या हातून; आणि आपल्या आईला इतकं दुःख होईल याची तुला त्यावेळीं कल्पना पण आली नसेल. आणि तूं पळून गेलास म्हणून नाहीं, पण तुझ्या मृत्यूच्या वार्तेमुळेंच तिनें एवढा हाय घेतली. पण हा कांहीं तुझा दोष नाहीं, बरं. आता माझ्याबरोबर चल तूं, मलाहि तुला कांहीं सांगायचं आहे; चल.'

"'मी उद्या येईन आपल्याकडे,' मी म्हणालों, 'कारण आधीं माझ्या आईच्या थडग्याचं दर्शन घेतल्याशिवाय नि आमच्या शेजाऱ्यांजवळ थोडी फार चौकशी केल्याशिवाय नाहीं मला बरं वाटणार. तुम्ही म्हणालां तसा माझा कांहीं तिला दुखवायचा मुळींच हेतु नव्हतां आणि माझ्या मृत्यु वार्तेबद्दलचाहि दोष माझेकडे नाहीं. तरीसुद्धां एक गोष्ट खरी कीं, मी जर मूर्खासारखा त्यावेळीं वागलों नसतों तर माझी आई आज जीवत असती आणि आतां सुखी पण झाली असती. म्हणून माफ करा मला आज' त्या गृहस्थानी आपला पत्ता मला दिला आणि मी माझी आई रहात असलेल्या घरीं गेलों. ती आंत नाहीं हें मला माहीत होतं तरीहि आतून येणारा हासण्याचा आवाज ऐकून मला फार वाईट वाटले आणि रागहि आला. दार उघडंच असल्यानें मी आत डोकावलं. दोन तीन बाया माझी आई बसण्याच्या जागेवरच बसून कांहीं काम करीत होत्या. त्यानीं माझ्याकडे पाहिलं. 'काय पाहिजे रे पोरा?' त्यानीं

विचारलें आणि त्या मोठयानें हासल्या. तिरस्कारानें मी मागे वळलों आणि शेजारच्या घरीं डोकावलों. आतल्या बाईनीं मला ओळखलं नाहीं. मी आपलं नाव त्याना सांगितलं. माझ्या आईच्या अखेरच्या आजारात तिच्या मरण घडीपर्यंत त्या बाई तिच्याजवळ होत्या. त्यानीं सर्व हकीगत मला सांगितली. तिला कॅन्सर झाला असल्यानें ती जगणं शक्यच नव्हत; पण माझा ध्यास मात्र तिने सारखा घेतला होता आणि मरताना सुद्धा तिच्या ओठानीं माझच नाव उच्चारल होत. त्यानीं असहि सांगितलं कीं मि. मास्टरमननीं अखेरच्या घटकेपर्यंत तिची नीट काळजी घेतली आणि कसलीहि उणीव तिला भासू दिली नाहीं. त्याच्याबरोबर मी मग माझ्या आईच्या अखेरच्या विश्रांतिस्थानाकडे गेलो आणि मग माझ्या सागण्यावरून मला तिथे एकटा सोडून त्या निघून गेल्या. मग किती वेळ तरी माझ्या आईचा देह आपल्या पोटात घेतलेल्या त्या थडग्यावर मी अश्रुसिंचन करीत होतों आणि मला क्षमा करण्याबद्दल तिला पुन्हा पुन्हा विनती करीत होतों.

"मी तिथून उठून त्या बाईच्या घरीं परत गेलों त्यावेळीं रात्र पडली होती. तिथे मी त्या बाईजवळ आणि त्याच्या यजमानाजवळ खूप वेळ बोलत होतो आणि रात्रीं त्याच्याकडेच मुक्काम केला. सकाळीं उजाडत उठून मेलगार्डीतील माझ्या त्या सोबत्याच्या घरीं मी कबूल केल्याप्रमाणें गेलो. दारावरील पाटीवरून मला समजलं कीं ते एक वकील होते. मी येताच त्यानीं दार बंद केलं आणि मग आतल्या खोलींत बसून त्यानीं मला असंख्य प्रश्न विचारले. त्यांचा उद्देश मी खराच मास्टरमन रेडी आहें कीं काय हें पाहण्याचा होता. कारण मास्टरमनच्या मृत्युपत्रान्वये त्याच्या सर्व इस्टेटीची व्यवस्था पाहण्याचं काम त्यांच्याकडे आलं होत. त्याच्या म्हणण्यांत अस आलं कीं त्यांना सापडलेल्या एका कागदावरून मास्टरमननीं माझ्या वडीलांच्या गलब-

ताच्या विम्याच्या बाबतींत माझ्या आईला फसवलं होतं. कारण जहाजाचा उतरलेला विमा एकट्या मास्टरमनच्या नांवानें नसून त्यांत माझ्या वडीलाच पण नाव होत. अर्थातच आतां त्या पैशाचा मीच कायदेशीर वारस होतों माझा पत्ता आता लागला असल्यानें विम्याच्या रकमेपैकीं एक हजार पौंड गेल्या इतक्या वर्षाच्या व्याजासुद्धां आतां मला मिळायला हवे, अस त्यानीं मला सांगितलं. म्हणजे आता हे असे दोन हजार पौंड अचानक रीतीनें मला मिळून माझ्या पुढे एक नवा मोह उत्पन्न झाला."

"मोह कसा काय हो रेडी ? उलट तुमच नशीब चागल म्हणा," विल्यम म्हणाला.

"होय, चागलं नशीब अस लोक दृष्टीने खरं; आणि माझं सगळ्यानीं अभिनदन हि केल. माझेहि डोळे फिरल आणि यापुढें नीट रीतीनें आयुष्य घालविण्याचा मी केलेला निश्चय पार ढासळून गेला. आणि आयुष्य नीट घालविण्याचा हा निश्चय आईच्या थडग्याजवळ बसून मी केला होता, बरंका ! आता समजेल तुला विल्यम, मी त्या पैशाला मोह का म्हटलं तें; होय कीं नाहीं ?"

"वैभव आणि संपत्ती हीं दोन्ही या जगातली अतिशय मोठीं मोहस्थान आहेत, विल्यम, यात काहीं शका नाहीं. विपत्तीच्या फट काऱ्यानींच आपले डोळे उघडून आपण शुद्धीवर येतों आणि आपण मग परमेश्वराच्या अधिक जवळ जातों. आपदाशिवाय परमेश्वराचं स्मरण माणसाला कधीं होत नाहीं. त्याचा स्वभावच आहे तो."

"माझ्या हातात तो पैसा पडला मात्र," रेडी पुढे म्हणाले, "मी तो लगेच अनेक मार्गांनीं उधळण्याला प्रारंभ केला. पण परत एकदा माझ्या सुदैवानें माझा तो स्कॉच खलाशी मित्र मला भेटला. माझा तारक देवदूतच तो. माझ्या हातात पैसा आला आहे हें त्याला मी

सांगितल्यावर त्यानें अनेक तऱ्हेनें माझी समजूत घालून तो पैसा एखाद्या जहाजाच्या मालकींत गुंतवावा असा सल्ला त्यानें मला दिला. मलाहि ती गोष्ट पटली; आणि आपण केवढा वेडेपणा करीत होतों याची मला पुरी जाणीव झाली. माझं वय त्या वेळीं फक्त वीस वर्षांचं होतं. माझ्या पुढे फक्त एकच अडचण होती. जहाज घेतल्यावर एकट्याच्या जबाबदारीवर मी कांही तें चालवूं शकलों नसतों. पण या ठिकाणीं सँडर्सने—त्या स्कॉच मित्राने—पहिला अमलदार म्हणून काम करण्याचं कबूल केल्यामुळें आम्ही दोघानी मग सर्व तयारी केली.

" सुदैवानें अजूनपर्यंत मी फक्त शंभर एक पौंडच खर्च केले होते. म्हणून सँडर्सला घेऊन मी ग्लासगोला गेलों आणि त्याच्या संमतीनें आणि पसंतीनें आम्ही एका जहाजावर आपला दोन हजार पौंडाचा हिस्सा गुंतवला. सँडर्सच्या चागल्या ओळखी असल्यामुळें हें सर्व करतांना मला फारसा त्रास कांही पडला नाहीं. सर्व तयारी करून आणि जहाजाचा मी कप्तान होऊन—आणि दोस्त सँडर्स पहिला अंमलदार—आम्ही आपलं जहाज वेस्ट इंडीज बेटाच्या दिशेनें हांकारलं. माझ्या आयुष्यांतला हा अतिशय वैभवाचा असा काळ. पण माझ्या वांट्याला तो फार दिवस काहीं आला नाहीं.

" सँडर्स हा अतिशय कुशल दर्यावर्दी होता; आणि म्हणून बारबॅडॉसला जाऊन पोंचेपर्यंत त्यानें मला पुष्कळच शिकवून तयार केलें. सँडर्स मला ताळ्यावर ठेवण्यासाठीं वारंवार वारवार उपदेश करी. पण पैशाचा मद व अधिकाराचा मद हा काही न्याराच असतो. त्यामुळें मला सँडर्सचा राग येई. आणि ही सफर झाल्यानंतर तर आपण सर्वेश झालों असंच मला वाटूं लागलं होतं, आणि त्याच्यावाचून आपलं चालेल या कल्पनेनें कप्तान म्हणून मी मग त्याला जरा दूरच

ठेवायला लागलों. हा कृतघ्नपणाच होता, पण हा जगात नेहमींच बघायला सांपडतो. मग मी तरी त्याला अपवाद कसा ठरणार ! सँडर्सला यामुळें फार वाईट वाटलं आणि बारबॅडॉसला आल्यावर त्यानें आपला नोकरी सोडण्याचा विचार मला कळविला. मी उद्धटपणानें त्याच्याशीं वागलों कारण मलाहि त्याच्या जाण्याची घाईच झाली होती. त्याच्या उपकारांची जाणीव मला डाचत होती. हं ! अशा रीतीनें सँडर्स मला सोडून गेला, आणि मला बरं वाटल. मी मग लौकरच जहाजावर साखर चढवली आणि परतीच्या प्रवासाची तयारी जारीनें सुरू केली. तशी कांही आवश्यकता नसतांना मी जहाजावर चार तोफाहि चढवल्या आणि भरपूर दारूगोळा पण भरून घेतला. माझं जहाज पण चांगलं जलद चालणारं असंच होतं आणि वेगाच्या बाबतींत तें लढाऊ जहाजांना कित्येकदां मागें टाकी. तुम्हांला माहीतच आहे कीं त्या काळांत व्यापारी जहाजांच्या काफिल्याबरोबर त्याच्या संरक्षणासाठीं म्हणून चार दोन लढाऊ जहाजं पण असत. तीं येण्याची वाट पहात आमचीं जहाजं बंदरात नांगरून पडलेली होतीं. पण एक दिवस झालेल्या आकस्मिक वादळानें बंदराजवळ आलेलीं तीं लढाऊ गलबतं खूप दूरवर पांगलीं गेलीं. तीं केव्हा परत येतील तें कोणींच सांगूं शकत नव्हता. त्यामुळे त्यांची वाट पहाण्याचा मला कंटाळा आला. तशात मी नवीनच आपल्या जहाजावर तोफा चढवलेल्या आणि माझं जहाज पण चालीला वेगवान. म्हणून त्यांची वाट न पाहतां मी एक दिवस जहाज बंदराबाहेर काढलं आणि इंग्लंडची वाट पकडली. या गडबडींत मी एक गोष्ट विसरून गेलों. जहाजाच्या विम्यांत लढाऊ जहाजाच्या संरक्षणाखालींच प्रवास करण्याची अट होती. ती पुरी न केल्यास झालेल्या नुकसानीला विमा कंपनी मुळींच जबाबदार नव्हती. पण मी नांगर उचलून बाहेर तर पडलोंच होतों.

तीन एक आठवडे सर्व काही सुरळीत चाललं होतं. आमचा प्रवास जवळजवळ संपत आला होता म्हणून मी मोठ्या खुशींत होतों. तों एक दिवस एका फ्रेंच जहाजानें आमचा पाठलाग करून मोठा बिकट प्रसंग आणला. तशांत वारा जोराचा वाहूं लागून आमची मुख्य डोलकाठी मोडून जहाज कमजोर झालं. आमचा वेग मंदावला आणि मला त्याच रात्रीं फ्रेंच तुरुंगाची हवा चाखावी लागली आणि मी दरिद्री बनलों. आलेल्या या प्रसंगाला माझा मीच जबाबदार होतों. माझ्या त्या मूर्खपणाबद्दल परमेश्वरानें मला सहा वर्षांचा तुरुंगवास घडवला होता. त्या प्रसंगातून मी दोन तीन सहकाऱ्यांच्या मदतीनें आपली सुटका करून घेतली, आणि आंगावर धड कपडेहि नाहींत अशा स्थितींत अतीशय हाल अपेष्टा सोशीत मी इंग्लंडच्या किनाऱ्यावर पाय ठेवला. मी अक्षरशः कफल्लक बनलों होतों म्हणून पोटासाठीं नोकरी करणें मला भाग होतं. सहा वर्षांच्या तुरुंगवासाने माझे अतीशय हाल झाले होते आणि माझी नवली पार पालटली होती. अशा स्थितींत एका गलबतावर मी गेलों आणि नोकरीची याचना केली. कप्तानासमोर मला उभं करण्यांत आलं. आणि तो कप्तान कोण होता ? माझा जुना दोस्त सॅंडर्स ! होय सॅंडर्स— ज्याच्या उपकाराची फेड मी कृतघ्नपणे केली होती तोच माझा गुरू सॅंडर्स ! माझ्या त्या अवतारात मला तो ओळखणार नाहीं, अशी माझी कल्पना होती. पण त्यानें मला ताबडतोब ओळखून आपला हात पुढे केला. त्यावेळीं वाटली इतकी लाज मला साऱ्या जन्मात कधींच वाटली नव्हती. त्या उदार वागणुकीनें मी पार खजील गेलों. त्यानें मला खालीं आपल्या केबिनमध्यें नेलं आणि मी आपली सर्व हकीगत त्याच्या कानावर घातली. माझी मागील वर्तणूक विसरून जाऊन सॅंडर्सनें मला आपल्या नोकरींत ठेवलें, आणि कपड्यालत्त्यांची सोय लावण्यासाठीं म्हणून काहीं रक्कम पण माझ्या हातावर ठेवली. पण त्यानें

जरी मागलं स्मरण मला दिल नाहीं तरी मी आपला पश्चात्ताप मात्र त्याच्याजवळ मोकळ्या मनानें व्यक्त केला आणि त्याची माफी मागितली. तो उमदा माणूस हयात असेपर्यंत त्याने माझ्यावर मायेचीच पाखर घातली. आम्ही परत पहिल्यासारखे एकमेकांजवळ आलों आणि मी त्याच्या हाताखालीं दुसरा अमलदार म्हणून काम करू लागलों. माझ्यावर आलेल्या आपत्तींनीं मी आता नरमलो होतों, माझ्यातला अहंकार पार नाहींसा झाला होता आणि परत एकदां त्याच्या साक्षीनें मी बायबलच्या वाचनास प्रारंभ केला. त्याच्या मृत्यूपर्यंत मी त्या जहाजावर होतो आणि त्यानंतर मग एक सामान्य खलाशी म्हणूनच आजपर्यंत मी अनेक जहाजावर नोकरी करीत आलों. पण मला सगळीकडेच चागली वागणूक मिळत गेली आणि तसा मी सुखातच होतो. आणि संपत्तीच्या जोडीनें मी जास्त चुकाच करीत राहिलों असतों असं मला वाटत. पण आता तो मोह उरला नसल्यानें मी खरोखरी सुखांत होतो. आपलं हें जीवन हें पुढील जीवनाच्या पूर्व तयारीसाठींच आहे, हे लक्षात ठेवल्यास समाधान कोणालाहि लाभेल असा मला भरंवसा आहे. बर, विल्यम माझी जीवनकथा ही या प्रकारची आहे, आणि मला वाटत तुला काहीं तरी बोध त्यावरून घेता येईल. बरं चला ! उद्या आपल्याला लौकर उठायचं आहे नाहीं का, तर मला वाटत आता आपण आथरुणावर पडावं तें बर. ”

## :: १७ ::

दुसरे दिवशीं सकाळीं लौकर उठून सर्वांनीं आपली न्याहारी उर-कली आणि मग रेडी नि विल्यम यानीं आपल्या पिशव्या तयार केल्या आणि दोन बंदुकी भरून त्यानीं सर्वांचा निरोप घेतला आणि दोन्ही धनगरी कुत्रे आपल्याबरोबर घेऊन ते घराबाहेर पडले. वर नीलाकाशांत स्वच्छ सूर्यबिंब तळपत होतं आणि इत्राहि मोठी उबदार पडली होती. समोर पसरलेला पॅसिफिक महासागर सूर्य प्रकाशांत प्रशांत-पणें हेलावत होता आणि सुखकर प्रभातवायूच्या मंदलहरींना नारळींची झाडी आपले माथे झुकवून आव्हान करीत होती. रेडी नि विल्यम मोठया उल्हासानें आपलं पाऊल उचलून आतां कोठीची इमारत मागें टाकून टेकडीच्या माथ्यावर चढले होते. हातातील कुऱ्हाडीनीं झाडांवर खुणा करीत ते चालले होते. झाडी अतीशय गर्द असल्यामुळें त्यांचें पाऊल स्वाभाविकपणेंच सावकाश पडत होतें. बेटाचा मध्यभाग ओलां-डल्यावर झाडी कमी होईल आणि मग समुद्रकिनाऱ्यापर्यंत बराच जागा आपल्याला मोकळी मिळेल अशी रेडीची कल्पना होती.

" झाडी पलीकडे काय सांपडेल अशी अपेक्षा आहे तुमची रेडी ? " विल्यमनें विचारलें.

" उत्तर देण सोपं नाहीं विल्यम. तरी पण मला कसली आशा वाटते तें मी सांगतों हं. आपल्या मेंढ्या बकऱ्यांना चरण्यासाठीं बरी-चशी मोकळी जागा मिळेल ही माझी पहिली कल्पना आहे. आणि मग नारळीं व्यतिरिक्त दुसरीं कांही तरी फळझाडं आपल्याला आढळ-तील असंहि मला वाटत आहे. टॉमीने खाल्लेलीं एरडीची झाडं आपण पाहिलींच. तशीं दुसरीं कांही झाडं असणं शक्य आहे. पाख-

रांच्या मलोत्सर्जनाच्या योगाने कसल्या कसल्या बिया इथे पडल्या असतील तें कांहीं सागतां नाहीं यायचं. असं येऊन पडलेलं बी पुष्कळच दिवस पडून राहतं; आणि अनुकूल वातावरण मिळालं कीं तें रुजतं."

मग कांहीं न बोलतां अर्धा पाऊण तास ते चालतच होते. इतक्यांत विल्यमला वर स्वच्छ आकाश दिसूं लागून तो म्हणालाः "तें पहा रेडी वर आकाश दिसूं लागलं, आता आपण लौकरच पडणार बाहेर. माझे हात पण खुणा करून दमले आहेत."

"शक्य आहे तें; मी सुद्धा तसाच दमलों आहे बघ विल्यम. तरी सुद्धां या खुणा करीत राहिलंच पाहिजे आपल्याला. नाहीं तर परत वाट कशी सापडायची रे आपल्याला?"

दहा मिनिटांतच मग ते त्या झाडीबाहेर पडले आणि विल्यम हाशहुश करीत खालीं बसला.

"मला वाटतं रेडी, आता आधीं तोंडांत टाकूं या कांहीं तरी आपण; म्हणजे जरा जोर येईल आपल्याला."

"कांही हरकत नाहीं विल्यम; मी पण आज थोडा थकलों आहे. आपलं सामान ठेऊं आपण इथेच. कारण आज रात्रींचा मुक्काम इथेंच व्हायचा आहे आपला. मी सांगून आलों आहे तसं तुझ्या आईला. फक्त बंदुकी घेऊन जाऊं आपण भ्रमंतीला."

त्यांचा फराळ आटोपल्यावर त्यानीं आसपास आपल्या संशोधनाला सुरवात केली. त्या उंच नि दाट गवतांतून दहा पंधरा मिनिटं चालल्यानंतर ते मग मोकळ्या जागीं येऊन पोंचले. त्यांच्या समोर सुमारें तीन चार फर्लांगावर महासागराचा नील विस्तार पसरलेला त्यांना दिसत होता; आणि मधला तो मोकळा भूभाग मऊ गवतानें आच्छादलेला दिसत होता.

" हं आपल्या शेळ्या मेंढयाना चरायला छान जागा आहे ही मोठी. मोठे आभारच आहेत परमेश्वराचे हे. हो, नाहीं तर खायला काय घालणार होतों आपण त्याना ! पण इथे मात्र त्यांची जरी पांच सहा पट वाढ झाली, तरी त्यांना पुरेसें गवत आहे याठिकाणीं. पण, तें पलीकडे तिकडे हिरवं गर्द काय बरं दिसत आहे ? तीं लांब लांब पानं तर ओळखीचीं वाटताहेत मला. ओः अरे हीं तर केळीची झाडं दिसताहेत रे विल्यम. आतां याचे रोप जोरानें फुटून वर आले आहेत. चागलीं वाढलीं कीं सहा एक फूट होतात हीं उंच बरं का. फळ मोठं सुरेख असतं याचं खायला, आणि हीं पान शेळ्या आवडीनें खातात. "

" हे पहा काय आहे तें रेडी; मी काही कधीं पाहिलेलं दिसत नाहीं हे रोपट. "

" अरे मिरीं आहेत हीं. हे दाणे आत्ता होताहेत तयार यांचे. स्वयंपाकांत उपयोग होतो याचा आपल्या जवळचीं पण सपतच आलीं आहत पाहिलंस विल्यम, पाखराच्या विष्टमधून हें असलं बी केव्हां तरी पडलं असेल येऊन इथे. आणि आता कायमचीच उत्पत्ती झाली यांची या बेटावर या केळ्याच तर पहा केवढं मोठं बनच होईल तयार थोडयाच दिवसात. "

" आणि हें लाल बोडाच काटेरी झुडूप हो कसल रेडी ? "

" पाहू या बरं काय आहे ते अरे या झुडपाच कुपण होतं म्हणे चांगलं तयार. आणि हे लाल फळ पण खायला बर लागत म्हणतात. पण याचे हे काटे मात्र नीट काढून टाकायला लागतात बर का आणि हें खोकल्यावर चागलं औषध आहे असहि ऐकलं आहे मी. बर, पण, आता त्या टोंकाला जाऊ या आपण. तिकडेसुद्धा काही उपयोगी झाडं असतील एखादवेळीं. आणि माझ्या जी परिचयाची नाहीत ती आपण

घरीं नेऊं. कारण तुझ्या वडिलांनीं अभ्यास केला आहे वनस्पति शास्त्राचा. ते सांगतील यांची नांवं ”

जरा वेळाने ते चालत चालत त्या बाजूकडे आले आणि त्यांच्या कानांवर कसला तरी कलकलाट आला. तीं माकडं असतील असा विल्यमचा तर्क होता. पण ते त्या झुडपाच्या जवळ येतांच एक दोन-तीनशें पोपटांचा थवाच्या थवा किलबिलाट करीत वर उंच उडाला. त्यांचे ते हिरवेगार पंख आणि ताबड्यालाल चोंची सूर्यप्रकाशात किती मजेदारपणें चमकल्या. “ ओहो, विल्यम ! अरे इकडे ये हीं तर पेरूचीं झाड दिसताहेत बघ इथ; ” रेडी उद्गारले. “ गंमत झाली हं मोठी. पेरू, केळीं हीं दोन तर मोठीं सुंदर फळ सांपडलीं आपल्याला, बरं का. आणि ही जागा पण तशी पाणथळ दिसते आहे. म्हणजे इथे लहान लहान खड्डे खणून आपल्या शेळयामेंढयाना पाणी पिण्याची पण सोय येईल करता. आणि हा पहा आणखीं एक कंद. यॅम म्हणतात याला. बटाट्यासारखा भाजून किंवा उकडून चांगला लागतो हा. म्हणजे आतां बटाट्याचा तोटा नाहीं येणार, याची जोड मिळाली म्हणजे, नाहीं र ! ”

याच वेळेला त्याचे दोघेहि कुत्रे त्या दाट हिरव्या पानाच्या गर्दीत मोठ्या वेगाने भुंकत घुसले. कुणाच्या तरी मंद गुरगुरण्याचा आवाज झाला.

“ काय आहे हो हें रेडी ! ” यॅमचं झाड निरखून पहात असलेला विल्यम त्या आवाजानें दचकून म्हणाला.

रेडी मोटमोठ्यानें हंसत सुटले. “ तुला पुन्हा एकदा घाबरवून सोडल बरं का या बेट्यांनीं. ”

“ म्हणजे, आपली डुकर कीं काय हीं ! ”

" अरे, हां. या यामवर तडाका द्यायला आलीं असतील तीं इथे; हो, तींच नक्की. "

रेडीनीं मग मोठ्यानें आरोळी दिली. केळींच्या त्या वनांत एक मोठा खसखसाट झाला आणि पचवीस तीस लहान मोठीं डुकरं ओरडत ओरडत सैरावैरा बाहेर आलीं आणि त्यानीं तडक नारळींची झाडी गांठली.

" पाहिलस, किती रानटी झालीं आहेत तीं आतां. आणि आपल्याला जर हे याम खायला हवे असले तर यांच्याभोवतीं एक भक्कम काटेरी कुंपण घातलं पाहिजे आपण. "

" पण कुंपण वाढण्याच्या आंतच ती मोडून टाकतील कीं तीं. "

" त्यासाठीं आधीं माडांचे तुकडे पुरून एक कटडा करूं तयार आपण, आणि मग त्याच्या मधून आणि बाहेरून तें काटेरी कुंपण करूं तयार म्हणजे झालं. चला पण आता पुढे किनाऱ्याजवळ जाऊं या आपण. "

अर्धा पाऊण तास मग ते समुद्र किनाऱ्यावर हिंडत होते. एके ठिकाणीं खडकाच्या आसऱ्याला त्याना समुद्रपक्षाची खूपशीं अंडीं दिसलीं. त्यातलीं त्यानीं कांहीं अंडीं उचलून आपल्याबरोबर घेतलीं. त्याच्या त्या भटकतींत विल्यमनें कालवाच्या दोन तीन नवीन जाती पाहिल्या आणि एक नवीन जातीचा लॉबस्टर पण त्यानां तिथे सांपडला. एकदरीत त्याच्या आजच्या संशोधनात त्यांना पेरू, केळीं आणि याम या खाद्याचा शोध लागला होता आणि नवीन पक्षांचीं अंडीं पण त्यानीं पैदा केलीं होतीं. या नवीन अन्नाच्या जोरावर त्यानां पुष्कळ दिवसाची बेगमी करतां येण्यासारखी होती म्हणून त्याना खूप आनंद वाटत होता. पण दिवस आतां मावळतीला कलून दोन एक तास झाले असल्यानें ते मागें वळून आपल्या पिशव्या ठेवलेल्या

जागेवर आले आणि त्या खांद्यावर टाकून त्यांनी घराचा रस्ता पकडला. येताना त्यांनीं केलेल्या झाडाच्या खुणावरून त्यांचा परत प्रवास चांगलाच वेगानें झाला आणि सूर्यास्तापूर्वींच ते घरीं येऊन पोंचले. मारीजण त्यांची वाट पहातच होतीं. विल्यमनें आपल्याबरोबर आणलेले तें रोपटें आपल्या वडीलांना दाखवून त्यांना त्याचें नाव विचारलें.

" अरे, हें होय, हें तर चांगलं परिचित रोपट आहे या भागातलं. रेडींना कसं नाहीं ओळखलं तें. ताग म्हणतात याला; याच्यापासून चांगले बळकट दोरखंड येतात तयार करताना."

" मी रोप नव्हते पाहिले याचे अजूनपर्यंत, सीग्रेव्ह."

" आणि हा माडा कसला आहे पपा ?"

" अरे हें वांग. फळं खातात याचीं, इकडले उष्ण कटिबंधांतले लोक. अशीं लाबट, वाटोळी, काळीं जांभळट फळ येतात याला."

त्यानंतर लगेच दुसरे दिवशीं त्यांनीं आपली होडी पाण्यात ढक-लली आणि आदले दिवशीं पाहिलेल्या जागीं जाऊन त्यांनीं एक तंबू त्या ठिकाणीं उभा केला आणि जवळच एका काठीवर त्यांनीं एक निशाण वर चढवलं. नंतर मग दोनतीन दिवस सारखं काम करून त्यांनीं त्या केळींच्या आणि यामच्याभोंवती एक भक्कम असं काटेरी कुंपण उभारलं आणि आपल्या शेळया मेंढया पण पाय वाटनें हाक-लीत नेऊन त्याना त्या गवताळ कुरणात नेऊन सोडलं. आणि मग आशा निराशेच्या एका विलक्षण द्वद्वात एक दोन दिवस त्या कुटुं-बाला काढावे लागले

त्याचं असं झालं. त्या दिवशीं पण रेडी नेहमींप्रमाणें सकाळीं लौकर उठून आणि आपली दुर्बीण घेऊन समुद्रावर गेले होते. क्षितिज रेषेपर्यंत सागराचं निरीक्षण चालू झालं आणि आज त्याना एक जहाज त्यांच्या दिशेनें येत असल्याच दिसल. त्याच्या मनात आशा निरा-

शेचं द्वंद्व सुरू झालं. सुदैवाने तें जहाज जर जवळ आलं तर सुटकेची हमखास आशा त्यांना वाटत होती, पण जर का ते जवळ आलं नाहीं तर ती दारुण निराशा असहनीय होईल असं त्याना प्रामाणिकपणें वाटत होतं. म्हणून ही बातमी इतराना द्यावी न द्यावी याचा विचार ते करीत असताच विल्यम समुद्रावर आला.

"विल्यम सांगायचं नाहीं हं कुणाजवळ. तें एक जहाज दिसतं आहे या बेटाकडे येताना. पण जर नाहीं आलं तर मग मात्र मोठं कठीण काम आहे. पण आपल्याला चार दोन तासातच काय तें नक्की समजेल. तर आता आपण आपलं हें निशाण असं इकडे मोकळ्या जागेवर उभं करूं या. म्हणजे त्याच्या नजरेस ते पडणं जास्त सोपं होईल, नाहीं का. नंतर मग तुझ्या वडीलाना आपण आज आंतलं काहीं तरी काम सांगून तिकडेच गुंतवून ठेऊ आणि आपण मात्र दोघ ही बोट दुरुस्त करण्याच्या मिषानें न्याहारी आटोपली कीं समुद्रावर इकडेच येऊ या. समजलं ना नीट."

विल्यमनं रेडींच्या हातून दुर्बीण घेऊन त्यानीं दाखविलेल्या दिशेनें क्षितिजाकडे दृष्टि टाकली आणि ते जहाज दृष्टीस पडताच त्याचं ऊर भरून आलं पण त्यानें मोठ्या प्रयत्नाने आपलं मन आवरून रेडींच्या सांगण्याप्रमाणें वागण्याचं ठरवलं

रेडींची युक्ती साध्य झाली आणि ते नि विल्यम न्याहारी आटोपतांच समुद्रावर आले. त्यानीं आधी खड्डा खणून आपल्या जवळचं 'पॅसिफिक'चं मोठं निशाण खांबावर चढवलं. आणि मग पुष्कळसे झाप वगैरे गोळा करुन त्याची एक मोठी रास तयार करून ती पेटवली, आणि ती होळी नीट पेटताच त्यावर पाणी शिंपून जाळ विझवला आणि धुराचे नुसते लोट भसभसा वर उमळू लागले "हं आतां बेटीवरच्या लोकांचं लक्ष हमखास आपल्याकडे जाईल," त्या

म्हातारं पाहन रेडी म्हणाले

ते दूर दिसणारं जहाजहि आतां झपाट्यानें जवळ येत होतं आणि ते दोघे अतिशय उत्कंठेनें तिकडे पहात उभे होते. इतक्यांत घरांतून सर्वच मंडळी तिकडे किनाऱ्यावर आली. त्याच असं झालं होत कीं टॉमीला घरात खेळण्याचा कंटाळा आल्यानें तो गुपचूप समुद्रावर आला होता आणि त्यानेंहि किनाऱ्याकडे येत असलेल जहाज पाहिलं होत आणि तो ओरडतच मागें घरीं परत जाऊन त्यानें सर्व मंडळी किनाऱ्यावर आणली होती.

"ओहो रेडी, आम्हांला का नाहीं हो बोललांत अगोदर?" सीग्रेव्ह म्हणाले.

"तुम्हाला कळवूं नये अशीच माझी इच्छा होती. पण आता ना इलाज आहे. पण जे केलं तें सद्हेतूनेंच मी केलं होतं सीग्रेव्ह."

"खर आहे रेडींचं म्हणणं बाबा," विल्यम म्हणाला.

मिसेस सीग्रेव्ह तर हृदय भरून येऊन आनंदाश्रु गाळीत होत्या आणि त्यांच्या यजमानाची पण तशीच अवस्था झाली होती.

"पण काय हो रेडी, दिशा पालटतं आहे मला वाटत तें गलबत," घाबरून सीग्रेव्ह म्हणाले.

"असं दिसतं खरं. खडकांच्या जवळ यायला भीत असावेत ते;" रेडी म्हणाले.

"म्हणजे आपल्याला सोडून तर नाहीं ना जात ते!" मिसेस सीग्रेव्हनीं विचारलें.

"नाहीं नाहीं, मॅडम. त्यानीं पाहिल नाहीं आपल्याला नीट अजून."

"अहो, नाहीं; पाहिल, पाहिल त्यानीं आपल्याला. तें पहा निशाण चढवलं त्यानीं आपलं वर," आपली टोपी वर उंच उडवून नाचत नाचत विल्यम म्हणाला.

"होय, होय, बरोबर आहे तुझं म्हणणं; त्यानीं पाहिलं आहे आपल्याला. परमेश्वराचीच कृपा!" रेडी उद्गारले.

सर्वांच्या आनंदाचा भर जरा कमी झाल्यावर रेडी म्हणाले: "मि. सीग्रेव्ह, त्यानीं आपल्याला पाहिलं आहे हें आता नक्की. पण त्यांना आत येण्याचा मार्ग काही माहीत नाहीं. तर आपण होडी घेऊन जरा पुढे जाऊ या. तरी सुद्धा हा वारा जर असाच वहात राहिला तर मग मात्र होडी कोणालाच पाण्यात घालणं शक्य होणार नाहीं; त्यांना काय किंवा आपल्याला काय. हा पाहिलात तो आताच कसा सपाट्यानें वाहतो आहे तो."

"पण याहून त्याचा जोर वाढेल स वाटत तुम्हाला रेडी?"

"असं तर खरं. कारण हा दक्षिण वारा फारच विलक्षण तुफानी असतो. आणि आपल्या सभोवार विलक्षण खडकाळ किनारा असल्यानें जहाज जवळ आणणं अत्यंत धोक्याचं आहे. पण कळेलच आता चार दोन तासात."

पण आपल्याला तसेच सोडुन तर नाहीं ना ते जाणार? हें तुफान ओसरल्यावर तर परत येतील ना?" मिसेस सीग्रेव्हनीं विचारलें.

"शक्य असलं तर जरूर परत येतील मॅडम. पण त्याचाहि काहीं नियम नाहीं. काही माणसं असतात पाषाणहृदयी आणि दुसऱ्यांच्या यातनाचं त्याना काहीच वाटत नाहीं."

हा वेळ पर्यंत जहाज त्याच्याचकडे येत होत पण आता त्यानें उत्तरेकडे नाळ धरली आणि ते दूर जाऊं लागलं.

"काय कठोर लोक आहेत!" सीग्रेव्ह म्हणाले.

"असंच केवळ नाहीं म्हणता येणार सीग्रेव्ह;" रेडी म्हणाले. "माफ करा मला, पण त्यांच्या जागीं जर मी असतों तर मीहि हेंच केलं असतं. वाऱ्याचा जोर वाढतो आहे, अशा स्थितींत या असल्या

अत्यंत खडकाळ किनाऱ्याच्या आसपास राहणं फारच धोक्याचं आहे. आणि याचा अर्थ त्यांनीं आपल्याकडे पाठच फिरवली, असा नाहीं करता येणार. त्याचा पहिला विचार त्याच्या स्वतःच्या सुरक्षिततेचा आहे. पण अगदीं स्वाभाविकच नाहीं का तें ! आणि मला वाटत कीं तुफान कमी झाल्यावर ते इकडे परत वळतील. ”

त्याच्या या बोलण्यावर कोणींच बोललं नाहीं, सर्वांचींच हृदयं निराशेनें जड झालीं होतीं आणि तीं एकामागून एक घरीं परत फिरलीं. सर्वांच्या मागून रेडी पण काठीवरून निशाण खालीं उतरून घरीं परत फिरले. पण बोलण्याच्या मनःस्थितींत कोणीच नव्हतं. रात्रींहि जेवणं झाल्यानंतर त्यांच्या नेहमीं सारख्या गप्पा गोष्टी झाल्या नाहींत, जो तो आपल्याच विचारात खिन्नपणें गुग होता. झोपण्याची वेळ होतांच मिसेस सीग्रेव्ह उठून पडद्याच्या मागें गेल्या. सीग्रेव्ह पण उठून त्यांच्या मागून निघाले पण रेडींनीं बायबल उघडून त्यांच्यापुढें धरलं. पण त्याचं तिकडे लक्ष नव्हतं. विल्यमनें आपल्या वडीलांच्या खांद्याला हळूच स्पर्श करून बायबलकडे बोट दाखवलं आणि मग पडद्याच्या आत जाऊन आपल्या आईचा हात धरून तिला त्यानें बाहेर आणलें.

“ क्षमा करा दयघना ! ” सीग्रेव्ह उद्‌गारले. “ माझ्या स्वार्थी दुःखात तुला विसरत होतों मी— ”

“ होय सीग्रेव्ह, बायबलातले शब्द विसरत होतां तुम्ही. ‘ अहो तुम्ही दुःखी कष्टी जीवहो, तुम्ही माझ्याकडे या; तुमचं विश्रांतिस्थान मीच आहें. ’ ”

“ मला सुद्धा माझी लाज वाटत आहे आता, ” डोळ्यातून अश्रु गाळीत त्यांची पत्नी म्हणाली.

मिस्टर सीग्रेव्हनीं बायबल उघडून मग नेहमींप्रमाणें प्रार्थनागीत वाचलें आणि सर्वजण नुसतं ‘गुडनाईट’ म्हणून आपआपल्या बिछा-

रात्रभर वारा अतिशय सोसाट्याचा वहात होता आणि जो तो आपल्या विचारात गुंग असल्यामुळें त्याना झोंपहि येत नव्हती. सकाळ झाली तरीहि तुफानाचा जोर तिळमात्रहि कमी झाला नव्हता आणि कपडे करून रेडी समुद्रावर येऊन त्यानीं दुर्बीण घेऊन क्षितिजरेषा धुंडाळली. कालच्या गलबताचा मागमूस आता दिसत नव्हता. न्याहा-रीची वेळ होईपर्यंत ते तसेच समुद्रावर बसले होते अखेरीस विल्यम त्यांना बोलावण्यासाठीं आल्यामुळें ते घराकडे गेले.

"काय रेडी, काहीं आशादायक दिसत नाहीं बातमी?"

"नाहीं खरी, आणि हें तुफान संपूर्णपणे नाहींसं होईपर्यंत कांहीं शक्यता पण नाहीं कसली. या तुफानाचे काय परिणाम त्याना भोगावे लागले असतील तें काहीं सांगता येत नाहीं. या वाऱ्यापुढे काहीं इलाज न चालून तें आपल्यापासून शेंकडों मैल दूर वाहूनसुद्धा गेलं असेल. शक्य झालं तर तें परत येईलहि. पण नक्की काहींच सांगतां येणार नाहीं. कप्तानावरसुद्धा पुष्कळसं अवलंबून आहे या बाबतींत. कारण आतां परत फिरणं त्याना अतिशय गैर सोईचं आहे यांत शंकाच नाहीं. पण फाजील आशा धरण्यात पण अर्थ नाहीं. तरीसुद्धां आप-ल्याला आशा आहे."

"ती कशी काय, रेडी?"

"म्हणजे असं. अजूनपर्यंत आपण जीवंत आहों कीं नाहीं या-बद्दल शंका होती. पण आतां आपण जीवंत आहोंत असं लोकांना कळणार. निशाणावरील आपल्या जहाजाच्या नांवावरून ते ही माहिती तुमच्या स्नेह्याना पण देतील. म्हणजे हें जहाज जर सुरक्षित पोंचलं तर आपल्या सुटकेची आशा आहे. हें जहाज परत नाहीं येऊं शकलं तरी ते दुसरं जहाज पाठविण्याची आतां शक्यता आहे, हें काय थोडं आहे!"

" सत्य आहे रेडी; हा विचार मला सुचायला हवा होता खरं म्हटलं तर, पण कालच्या त्या निराशेच्या लोंढयांत माझी विचार शक्ती मुळीं पार वाहूनच गेली. "

" रेडी, रेडी, तें पहा तिकडे किनाऱ्यावर; एक होडी दिसते आहे बघा; " धावत आंत येत विल्यम म्हणाला.

" अरे रानटी लोकाची कॅनू–होडी दिसते आहे ती विल्यम, आणि त्यात लोक पण आहेत; " रेडी दुर्बीण रोखून म्हणाले. " कालच्या वादळांत वाहून आली असली पाहिजे ही जवळ पासच्या एखाद्या बेटांतून. "

ते धावत पुढें गेले. हा वेळ पर्यंत त्या नवीन आलेल्या होडींतल्या लोकानीं होडी ओढून किनाऱ्यावर घेतली होती आणि ते दोघेहि अगदीं गळून जाऊन आतच आडवे झाले होते. रेडी आणि विल्यम जवळ जाऊन पाहतात तों त्या दोन्ही आकृती स्त्रियाच्या आहेत असं त्याना आढळून आलं. त्याच्या सबंध चेहेऱ्यावर गोंदलेलं दिसत होतं तरी हि त्या दोघी हि तरुण स्त्रिया तशा दिसायला सुरेख दिसत होत्या.

" मी धांवत जाऊन काही खायला घेऊन येऊका त्यांना ! "

" हूं हूं, जा विल्यम, आणि जूनोला सांग काही तरी द्यायला. "

पांच सहा मिनिटांतच विल्यम परत आला आणि त्याच्या बरोबर बाकीची माणस पण समुद्रावर आलीं. त्यानीं होडींत डोकाऊन पाहिलें. आंत दोन वल्ह्याशिवाय दुसरं कांहींच सामान दिसत नव्हतं.

" हें पाहिलंत मि. सीग्रेव्ह, " रेडी म्हणाले. " या दोन्ही बायाच फक्त होडींत होत्या आणि त्या वादळाच्या तडाक्यांत बिचाऱ्या सांपडल्या आणि या दोन दिवसात त्यांना अन्नपाण्यावाचूनच रहाव लागलं असलं पाहिजे. आणि म्हणूनच या अशा मेल्या सारख्या पडल्या आहेत बघा. त्याचं नशीब म्हणून त्या या बेटाला येऊन लागल्या. "

" असं तर खरं, " सीग्रेव्ह म्हणाले; " पण खरं सांगायचं म्हणजे मला काही बरं वाटत नाहीं आहे हें लक्षण. मला असं वाटतं यावरून कीं आपल्याजवळ रानटी लोकाची वस्ती आहे आणि ते आज ना उद्यां आपल्याला भेट द्यायला येतीलच. "

" खर आहे तें; तरी सुद्धा या दोन बायाच्या येण्यानें आपलं संकट काही वाढत नाही. कदाचित फायदा हि होईल यांच्या येण्यामुळें. म्हणजे या जर इंग्लिश शिकल्या तर त्या आपल्या बद्दल त्यांच्या लोकां-जवळ रदबदली सुद्धां कदाचित करतील. "

" म्हणजे इतके का हे लोक भयंकर असतात रेडी ? "

" होय विल्यम. त्याचा काहि नियम नाहीं. कारण बोलून चालून ते रानटी लोक आहेत. त्याची अवस्था लहान मुलासारखी असते. ते पाहतील तें हवं असतं त्याना. सगळ्याची ते मोडतोड करतील आणि क्रूरपणा देखील दाखवतीलच ते. पण आपल्याजवळच्या काही वस्तू जर आपण लपवून ठेवून बाकीच्या त्याच्या हवाली केल्या तर आपली सुटका होणं संभवनीय आहे. तरी हि त्यावर विश्वासून मात्र नाहीं चालायचं. माझ्यामताने तर त्याच्यावर विश्वास टाकण्यापेक्षा आपल्या बचावाची तयारी करायला आपण आत्तां पासून लागावं हें बरं. "

" पण त्या असंख्य लोकाबरोबर आपण कसे लढणार ? "

" वाटत एवढ कठीण नाहीं आहे तें सीग्रेव्ह. आपण आपल्या घरा भोंवती माडाच्या उच उच खोडाची दुहेरी दाट भिंत उभारूं शकतों. आणि त्याच्या आंत राहून आपल्या बंदुकीच्या जोरावर आपण त्यांना पिटाळून लावूं शकतों. कारण त्यांची हत्यारं आपल्या सारखीं पल्लेदार नाहीत. "

" दोनच दिवसापूर्वी आपण आपल्या जाण्याचा विचार करीत होतों. तर आज या नवीन सकटाला तोंड देण्याची तयारी करण्यासाठीं

आपल्याला विचार करावा लागतो आहे. ठीक आहे. आलेल्या प्रसंगाला तोंड हें दिलच पाहिजे!"

"पण मी अजून आशा नाहीं सोडली त्या जहाजाची," रेडी म्हणाले. "पण चला, आधीं या दोन बायांना आपण आपल्या घरीं घेऊन जाऊं या."

जूनोच्या मदतीनें मग त्या तिघानीं त्या दोन बायाना सांवरून घरात नेलं आणि त्याना काहीं खायला दिलें. तें त्यानीं आधाशासारखं पार खाऊन टाकलं आणि त्या दोन्ही बाया परत खालीं आडव्या होऊन घोरूहि लागल्या.

"बघा किती विलक्षण दमल्या आहेत त्या. आणि एका अर्थी या बाया आहेत हें आपलं नशीबच म्हणायचं. पुरुष असते तर काम बिकट झालं असतं. तरीहि याच्यावर विश्वास ठेऊन मात्र नाहीं चालायचं."

त्यानतरचे पंधरा दिवस मग तसेच काहीं विशेष काम न होतां तसेच गेले. कारण त्या जहाजाचा विचार त्याच्या डोक्यातून पार गेला नव्हता. तें परत येईल अशी त्याना आशा वाटत होती. त्यामुळें त्याच लक्ष कामाकडे नीटसं लागत नव्हतं. पण दिवस जसजसे जास्त लोटू लागले तसतशी त्याची आशा मावळूं लागली आणि त्यातच मग एक दिवस त्या दोन रानटी बाया आपली होडी घेऊन पळून गेल्या. त्याबरोबर मात्र त्या सर्वांच्या आगावर आलेला सुंदपणा पार नाहींसा झाला आणि त्याना आगामी सकटाची स्पष्ट कल्पना येऊन त्यानीं एक बैठक भरवली. आणि आता मुळींच वेळ न गमावतां आपला मुक्काम कोठीच्या घरात न्यायचं आणि त्याच्याभोवतीं भक्कम लाकडी कोट उभारण्याच त्यानीं ठरवलं."

"मला का ते काहीं नाहीं सागतां येणार, पण आता या संक-

टाचीं कल्पना जशी आली ना, तसा आतां मला सुद्धां जोर आला आहे बघा रेडी. माझीसुद्धा भीति पार नाहींशीं झाली आहे, " मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या.

" उद्याच्या पोटात काय दडलेलं आहे, हें कोण सांगू शकणार !" सीग्रेव्ह म्हणाले. " आपलच पहाना, तें जहाज आपण पाहिल्याबरो-बर काय काय उड्या मारल्या आपण, नि काय काय बेत केले ! आपली सुटका झालीच असंच आपण गृहीत धरून चाललों होतों, नाहीं का ? पण ज्या तुफानी वाऱ्यानें तें जहाज आपल्यापासून दूर नेल त्यानेंच या दोन बाया आपल्याजवळ आणून सोडल्या, आणि तो निवळलेला वारा तें जहाज परत आणील असं जो आपण म्हणतों तोंच त्या वाऱ्यानें या बायांना पळून जाण्याची संधी दिली आणि मदत आणून सोडण्याच्या ऐवजीं संकटाची तयारी मात्र याच वाऱ्या-मुळें आज होत चालली आहे. असं आहे म्हणजे. आपण खूप धड-पड केली, तरी अखेरीस काय व्हायचं तें त्या भगवंताच्याच मर्जीवर अवलंबून राहाणार ! "

:: १८ ::

त्यांच्या कामाला आतां सपाट्यानें सुरवात झाली होती. तें जहाज परत येऊन त्याची सुटका करील ही आशा नाहींशी झाली होती; आणि केवळ परमेश्वरावर भरंवसा ठेऊन स्वस्थ बसल्यानें परमेश्वर काही चमत्कार घडवून त्याचं साहाय्य करील, असंहि त्याना वाटत नव्हतं. यत्नेन देवाः, ही गोष्ट त्यानीं जाणली होती आणि म्हणूनच ते झपाट्याने कामाला लागले होते. त्यानीं प्रथम आपला मुक्काम हलवून कोठीच्या घरात नेण्याचा विचार केला आणि तें घर बरचस अडचणीच्या जागेत बांधल असल्यामुळे त्याच्याभोवतीं माडाच्या फळ्याच्या नि ओंडक्याच्या मदतानें भक्कम भक्कम दुहरी तिहेरी कुंपण उभारणं अगदीं शक्य होतं. म्हणून त्याच उद्योगाला प्रथम ते लागले. पण त्यासाठीं आधीं बरींचशीं झाड तोडण आवश्यक होतं आणि तें काही लौकर संपण्यातल पण नव्हतं म्हणून हा बंदोबस्त पुरा होईपर्यंत बेटाच्या त्या दक्षिणेकडील बाजूला, ज्या ठिकाणीं त्याना केळीची आणि पेरू नि यामची लागवड सापडली होती त्या ठिकाणीं तात्पुरते तंबू उभारून तिथें काही दिवस त्यानीं राहण्याच ठरवलं. कारण एक तर ती बाजू त्या पळून गेलेल्या रानटी बायाना अज्ञात अशी होती; त्यामुळ जर त्याचा हल्ला लौकर झाला तर त्याना तें ठिकाण सापडल नसतं. शिवाय त्या ठिकाणीं या खाद्य पदार्थांची पण मुबलक सोय असल्यानें ती हि अडचण त्यांना भासली नसती. म्हणून तात्पुरतें सामान हलविण्याच्या तयारीला ते लागले होते, आणि दोनचार दिवसांतच त्यानीं आवश्यक तें सामान तिकडे नेऊन आपले तंबूहि उभारले. मिसस साग्रेव्ह तर त्या जागेवर निहायत खूष झाल्या.

" काय सुंदर आहे ठिकाण नाहीं हें रेडी ! आपण आपला उन्हाळयांतला मुक्काम इथेच करीत जाऊं. आणि पावसाळयांत जाऊन राहूं त्या बांधलेल्या घरांत. "

" काही हरकत नाहीं मॅडम. उन्हाळयांत चांगलंच थंड वाटेल इथे हें कांही खोटं नाहीं. पण आपलं तें घर जास्त सुरक्षित मात्र आहे, हें नाहीं पण विसरून चालणार बरं का. "

" ते खरं आहे हो. पण आता इथे कसं छानदार गार असं वाटत आहे. आणि तिथे काय उकाडा होतो, आणि हा एवढाच जरा बदल इथल्या आयुष्यक्रमात, नाहीं का ! "

" आणि इथे शिकार करायला पण मिळेल कीं मला रेडी. आपल्याच पाळीव डुकराची शिकार हवी आहे आतां आपल्याला करायला, आणि या कबूतराची पण. डुकराची शिकार मी करायला लागलों कीं या यामच्या माड्याना पण त्यांचा त्रास तेवढा कमी होईल; " विल्यम म्हणाला.

" तरी हि आपल्याला या जागेला कुंपण पण घातलच पाहिजे. आणि आपल्या कुत्र्याना इथेच दिली जागा करून निवाऱ्याची कीं ते पण उत्तम राखण करतील या मळयाची. पण शिकार करताना आधीं म्हाताऱ्या डुकराची शिकार कर, बरं का विल्यम."

त्यानतरचे मग त्याचे पाच सहा दिवस त्या बोटावर ते पहिल्यानें ज्या ठिकाणीं उतरले होते त्या ठिकाणीं त्यानीं साठवून ठेवलेलं सर्व सामान घेऊन येण्यात खर्च झाले. या कामांत जूनोचा पण फार उपयोग झाला. बोटीवर वल्हीं मारण्याला ती पण आतां शिकली होती. त्यामुळें विल्यम आणि ती अशीं आळीपाळीनें रेडी किंवा सीग्रेव्ह यांच्याबरोबर जात असत. त्या दिवशीं विल्यमनें आपला कुत्रा रीमस आपल्याबरोबर घेतला होता. त्याच्या मनातून त्याच्या गळयात

जर चिठी बाधली तर तो मागे परत जाऊन निरोप पोंचवील कीं नाहीं, हें पहायचं होतं. म्हणून त्याने बरोबर आणलेल्या एका कागदा-वर पेनसिलीनें आपल्या आईला एक चिठी लिहिली. आणि तिची नीट घडी करून ती दोरीने रीमसच्या गळयात बाधली आणि त्यानें कुत्र्याला घराकडे बोट दाखवून 'जा, घरीं जा रीमस,' असें सागि-तलें. रीमसनें एक दोन क्षण बावरल्यासारखें विल्यमकडे पाहिलें. त्यानें परत एकदा घराकडे दगड फेकून 'जा, घरीं जा, रीमस;' असें त्याला ओरडून सागितलें. असें दोन तीन वेळा केल्यावर रीम-सच्या डोक्यात प्रकाश पडला आणि तो घराकडे तोंड करून धूम पळत सुटला.

"मला वाटतं त्याला समजलं आहे आतां; बहुत करून तो आतां सरळ घरीं जाईल;" विल्यम म्हणाला.

"पाहूं या काय करतो तें. चला आपण आता तें उरलेलं सामान नेऊं या कोठीच्या घरात."

सर्व सामान नेऊन झाल्यावर बोट घट्ट नांगराला बाधून ते आपलं जेवण उरकून झोंपायला गेले. ते घरात शिरतात तोंच रीमस त्याच्या-कडे उडया मारीतच परत आला. त्याच्या गळयाभोंवतीं एक पत्र बाध-लेलं दिसत होतं.

"हे आले रे विल्यम तुझे रीमस बुवा. तो गेला नाहीं घरीं."

"काय बदमाष आहे! मला वाटलं होतं कीं हा नक्की जाणार म्हणून. गाढवाला आज खायला नाहीं घालतांकामा, म्हणजे जाईल घराकडे परत. काय हो पण रेडी! मी त्याच्या गळयात बाधलेली चिठी ही नव्हे. पाहू मला." विल्यमनें तें पत्र सोडून उलगडले आणि वाचलें:

"प्रिय विल्यम—तुझी चिठी सुरक्षित पोंचली, आणि तुमची खुशाली वाचून आनंद झाला. असच रोज पत्र पाठवीत जा. बाकी

या युक्तीबद्दल तुझी नि रीमसची पाठच थोपटली पाहिजे हं! तुझी प्रेमळ आई—सेलीना सीग्रव्ह."

"शाबास रीमस, शाबास! माझी खरंच नव्हती हं कल्पना कीं हा घरीं जाईल आणि तिकडून पण परत उत्तर घेऊन येईल म्हणून. जीते रहो रीमस! आज तुला मास जादा देणार हं मी."

"शाबास रीमस, अब्रू राखलीस ह माझी आज. आता तुला झकाससं जेवण दिलंच पाहिजे रेडींना. न देऊन काय करतात, नाहीं कां रे?" विल्यम रीमसला थोपटीत म्हणाला.

"हो रे बाबा, दिलंच पाहिजे झकास जेवण. ठीक, आता आपण हें पोस्ट ऑफिसच उघडलं म्हणायचं या बेटावर. खरंच विल्यम, खूप उपयोग होईल आपल्याला नक्की याचा;" रेडी म्हणाले.

दुसरे दिवशीं पण त्यानीं तशीच परत चिठी पाठवली. आतां या खेपेला रीमसला सागायला काहींच त्रास पडला नाहीं. विल्यमनें चिठी नुसती त्याच्या गळ्यात बाधली आणि त्याला थोपटून "रीमस, जा घरीं बाबा कालच्यासारखा आणि उत्तर घेऊन ये बर का संध्याकाळीं." रीमसने जणुं काहीं त्याला समजलं अशा आविर्भावानें आपली शेपटी हलवली आणि तो पळत निघून गेला, आणि सायकाळीं रेडी नि विल्यम झोपायला जाण्यापूर्वी तो उत्तर घेऊन परतहि फिरला.

"किती झपाट्यानें पळत आला हो हा, रेडी! दोन तास कांही नसतील झाले त्याला इथून गेल्याला."

"हं, नसतीलच झाल विल्यम रीमस, आज पण तुला खूप मांस दिलं पाहिजे मला आता आता झालास हं तूं तयार या कामात पूर्ण-पणें;" रेडी त्याला थोपटीत म्हणाल.

दुसऱ्या दिवशीं ते परत गले त्यावेळीं बदरावरच सारीं जण आलीं होतीं. येताना आजच्या जेवणासाठीं म्हणून एक मोठं कासव पण मारून त्यानीं आणल होतं.

"शाबास विल्यम, तू आपला शब्द पुरा केलास हं," त्याची आई म्हणाली. "आता या व्यवस्थेनें तुम्ही जरी तीन चार दिवस तिकडे कामाला गेलात तरी मला तुमची काळजी नाहीं वाटणार."

"रॉम्युलस नि व्हिक्सनला पण आता अशींच तयार करीन मी आई."

"आणि मी त्या पिल्लांना शिकवीन हं," टॉमी म्हणाला.

"खरंच रे टॉमी; तू पत्र लिहायला शिकेपर्यंत हीं पिलं पण तेवढी मोठीं होतील;" रेडी म्हणाले.

त्या दिवशीं जेवताना पण रीमसच्या शहाणपणाच्या गोष्टी चालल्या होत्या. मिस्टर सीग्रेव्हनीं मुक्या प्राण्याच्या शहाणपणाच्या पुष्कळच गोष्टी सांगितल्या. ते म्हणाले : "आपण माणसं ज्या गोष्टी विचारानें करतों त्या गोष्टी हे प्राणी उपजत बुद्धीनें करतात बघा. मनुष्यालाहि उपजत बुद्धी असतेच. त्याच प्रमाणें या मुक्याप्राण्याना सुद्धा थोडी-फार विचारशक्ती असते, बर का विल्यम. आपलीं मुलं पहा, अगदीं लहान पणीं तीं सगळं काही उपजत बुद्धीनेंच करीत असतात. त्याची विचारशक्ती त्या वेळीं तयार झालेली नसते. पण जसजस वय वाढत जात तसतशी त्याची विचार शक्ती वाढत जाते. आणि मग होत काय कीं उपजत बुद्धी ही कम ताकद होत जाते. म्हणजे पार नाहींशी मात्र नाहीं होत हं! तशी ती मरेपर्यंत नाहीं आपल्याला सोडून जात. आणि ही उपजत बुद्धी म्हणजे तरी कायरे? विचार केल्याशिवाय एखादी गोष्ट बिनचूक करणं, म्हणजेच उपजत बुद्धी. हीं पाखरं आपलीं घरटीं बांधतात, कोळी जाळं विणतो, मधमाशी आपलं मधाचं पोळं करते तयार, तें सारं या बुद्धीच्याच जोरावर. त्यांना कुणीच शिकवलं नाहीं आणि आज सृष्टीच्या आरंभापासून त्याचं हें काम आहे तसंच चालत आलं आहे."

"हें केवळ उपजत बुद्धीचं काम झालं. पण तुम्हीं मघाशीं म्हणाला होतात तसं विचारशक्तीचं एखादं उदाहरण सांगा बाबा."

"सांगतो ह. आधीं असं पहा या सर्व प्राण्यांना स्मरणशक्ती असते चांगली. स्थळ किंवा व्यक्ती त्यांच्या नीट ध्यानात राहतात. हे कुत्रेच आपला मालक अनेक वर्षांनंतर ओळखूं शकतात. वीस वीस वर्षांनंतर हत्तींनीं आपला माहूत ओळखल्याचीं उदाहरणं आहेत. शंभर मैलावरून सुद्धा कुत्रा नेमका आपल्या घरीं परत येतो. त्यांना स्वप्न सुद्धा पडतात आपल्या सारखीं. आपलेच हे रॉम्युलस रीमस झोंपेत भुंकताना, कुरकुरताना तूं सुद्धा ऐकले असशील कितीतरी वेळा."

"होय बाबा, हें मात्र पाहिलं आहे हं मी."

"तसंच ते एखाद्या गोष्टीकडे एकाग्रपणें कसे पहात बसतात तें पण पाहिलं असशील तूं. मांजर कसं असतं बसलेलं टक लाऊन उंदराच्या बिळाशीं, नाहींका? शिकार करतांना प्रत्येक प्राण्यात हा अवधान देण्याचा गूण दिसतोच. तसंच काही गोष्टींवरून त्यांना अंदाज किंवा अनुमान बांधता येतं. कुत्रेच पहा, भिकाऱ्याच्या आंगावर धावतील; साध्या माणसाच्या आंगावर नाहीं धावणार तसे. राखण करताना सुद्धां पहा, वाटेनें जाणारावर ते नाहीं भुंकणार; पण जर तुम्ही तिथे थांब-लात कीं लगेच भुंकाला लागतील ते. अशा कामात हत्ती फार हुशार असतो. त्याचं निरीक्षण सूक्ष्म असतं आणि कोणत्या हि गोष्टीचा तो अंदाज फार लौकर बांधतो. त्याला बक्षीस देऊं करा म्हणजे काय प्रचंड काम तो करतो ते पहा. एखाद्या गोष्टीची त्याला लाज पण लौकर वाटते. आता त्याची हुशारी पहा ह. एका हत्तीपुढे एक नाणं टाकलं होत. पण टाकताना ते जवळ टांगलेल्या एका पडद्यावर पडलं आणि त्याची सोंड काही तिथपर्यंत पोंचेना. म्हणून त्यानें केलं काय

तर सोडेत खूप हॅवा भरून घेतली आणि ती त्या पडद्यावर जोरानें सोडली. त्याबरोबर तो पडदा मागे ढकलला जाऊन त्याने परत जी उशी घेतली त्यामुळे तें नाणं उडून हत्तीच्या जवळ येऊन पडलें. म्हणजे पहा, काय केलं तर काय होईल याचा नीट विचार करून त्यानें तो वारा पडद्यावर सोडला."

"होय बाबा, हे तर कबूलच केल पाहिजे."

"तसाच घोडा हा एक मोठा उमदा प्राणी आहे. एकदां काय झालं, एका घोड्यावरून त्याचा मालक काही वर्तमान पत्राचे अंक घेऊन चालला होता. प्रत्येक घराजवळ थांबून तो अंक टाकून पुढें जाई. झालं. असं काहीं वेळां झाल्यानंतर त्या घोड्याला ती सवय झाली. त्यांत विशेष गंमत अशी होती कीं दोन स्नेही आळीपाळीनें एकच अंक वाचीत असत. म्हणजे एका आठवड्यात एकानें अंक आधीं घ्यायचा तर दुसऱ्या आठवड्यात दुसऱ्या मित्रानें आधीं घ्यायचा. त्या घोडयानें हे पण नीट लक्षात ठेवलं आणि तो नेमका न चुकतां प्रत्येक आठवड्याला योग्य ठिकाणींच उभा राही. कधीं चूक केली नाहीं यांत त्यानें."

"हें मात्र नवल आहे हं मोठं. हुशार प्राणी असला पाहिजे तो बाबा, नाहीं का?"

"असं तर खरं. आणि हे सर्व प्राणी पुष्कळ गोष्टी त्यानां त्या शिकवल्या असता शिकतात, हा देखील त्याना विचारशक्ती असल्याचा पुरावा आहे. हत्ती, घोडा, कुत्रा आणि हे पक्षी सुद्धां पुष्कळ गोष्टी शिकतात शिकवल्या तर."

"पण बाबा मग विचारशक्ती आणि उपजत बुद्धी त्यांत फरक कुठे समजायचा?"

"तेंच सागणार होतों मी आत्तां. आपल्या पिलांची काळजी,

अन्न मिळवण, संकटाच्या वेळीं जीवाला जपणं, यासारख्या गोष्टी सर्वच प्राणी न चुकतां करतात, त्यात कधींच फरक म्हणून पडत नाहीं. हें सर्व उपजत बुद्धीनेच होत असतं. पण जिथे ही बुद्धी काही मदत करीत नाहीं, असे काही प्रसंग उद्भवतातच कधीं कधीं. एक उदाहरण सांगतो हं. एक मोठा थोरला पतंगाच्या जातीचा प्राणी आहे. डेथस्-हेड मॉथ असं म्हणतात त्याला. मध फार आवडतो त्याला. म्हणून एखादेवेळीं तो एखाद्या मधाच्या पोळ्यात हळूच प्रवेश करतो. पण आतल्या माशा त्यावर लगेच हल्ला चढवून त्याला दंश करून ठार मारतात. पण त्याचं शरीर काही त्याना बाहेर नेता येत नाहीं आणि तें कुजून त्याला घाण येऊ लागते. म्हणून त्या माशा करतात काय, तर तें सारं शरीर त्या आपल्या मेणानें वेष्टून टाकून त्याची घाण बंद करतात. आहे की नाहीं युक्ति!"

"पण पपा, यात त्याच्या उपजत बुद्धीचहि त्याना साहाय्य असेल."

"शंका बरोबर आहे. पण त्या माशा आपल्या स्वाभाविक अवस्थेत जेव्हा राहतात तेव्हा या पोळ्याला आत एकच माशी जाईल एवढी वाट त्या ठेवतात. त्यामुळें आत कोणी जाऊच शकत नाहीं. पण आपलीं पोळीं कृत्रिम असल्यानें त्याची भोकं मोठीं असतात. म्हणून त्यामुळें उत्पन्न झालेल्या या नव्या परिस्थितीला त्यानीं आपलं चिमुकलं डोकं चालवूनच तोंड दिलं, नाहीं का."

"असं तर खरं; हा आहे फरक."

"आता एक मात्र गंमत परमेश्वरानें केली आहे हं. ही विचारशक्ती प्रामुख्याने त्यानें अशाच प्राण्याना दिली आहे, कीं ज्याचा उपयोग त्याच्या लाडक्या लेकाला—म्हणजे मनुष्याला स्वतःसाठीं करतां यावा. कुत्रा, घोडा आणि हत्ती हीं याचीं प्रमुख अशीं उदाहरणं म्हणून समजायला कांही हरकत नाहीं."

त्या दिवशीं रात्रीं जेवण झाल्यावरहि विल्यमला त्या गोष्टींत आनंद वाटत असल्याने त्यानें परत त्या प्राण्याच्या गोष्टी काढल्याच. आणि त्यांचं संभाषण सुरू होऊन चारपाच मिनिटं होताच त्यानें विचारलें: "काय हो बाबा, गाढवासारखा निर्बुद्ध आहेस, असं म्हणतों आपण एखाद्याला; नाहीं का ? म्हणजे इतका का निर्बुद्ध असतो गाढव ?"

"नाहीं विल्यम, त्याला हि अक्कल आहे दिलेली थोडी फार. पण तो अतिशय हेकट असतो ना म्हणून त्याला दिली आहे ती पदवी. आणखी काय गंमत असते यात कीं, आपण हे प्राणी जे पाहतों आपल्याकडे ते कसे खुजे असतात, त्याची नीट काळजी पण आपण मुळींच घेत नाहीं. पण काहीं प्रातात त्याची नीट काळजी घेतात लोक. विशेषतः खरं गाढव हें गिनीमधेंच बघायला सापडतं. तिथे तें चागलं उच निंच आणि चांगलं चपळ असं असत. आणि तसंच त्याचं वर्णन आहे केलेलं बायबलमधे. पॅलेस्टाईन, सीरिया या देशांत तर त्याला घोडयापेक्षा देखील जास्त मान आहे. म्हणजे कोणताहि प्राणी जर आपल्याला चागला बघायचा असला, तर तो त्याच्या स्वाभाविक परिसरात, त्याच्या जन्मभूमींतच बघितला पाहिजे. आपण या गाढवाना कितीं वाईट तऱ्हेनें वापरतो—क्रूरपणेंच वागवतों म्हणा."

"म्हणजे हवामानाचा एवढा परिणाम होतो ?"

"अलबत; आणि तो सर्वांवरच, झाडा पानांवर, प्राण्यांवर आपल्या माणसावरसुद्धा होतो तो. काही प्राण्यांना हवेचा फरक किंवा अन्नाचा फरक चालतो. आपला घोडा हा मूळचा अरबस्तानचा पण तो थंड प्रदेशात सुद्धा चागल्या तऱ्हेनें वाढू शकतो. तीच अवस्था गाई, मेंढी, डुक्कर वगैरेंची असते. आणि तुला ऐकून आश्चर्यच वाटेल, कॅनडात थंडीच्या दिवसात गाईना मासे देखील खायला घालतात."

"मासे, काय म्हणता काय बाबा! गाय खाते मासे?"

"होय बरं विल्यम; अशी वस्तुस्थिती तरी आहे. म्हणजे थोडा काळ का होईना हा शाकाहारी प्राणी मांसाहारी बनू शकतो. दुसरे कांही प्राणी, लांडगा, कोल्हा, ससा असले प्राणी हे कोठल्याहि कटिबंधांत जगू शकतात. शेळया मेंढयाची लोकर ही ऊष्ण प्रदेशांत नाहींशी होते आणि त्याची जागा केस घेतात. पण तींच त्यांना थंड प्रदेशात न्या कीं त्याची मऊ जाड अशी लोकर तयार होते."

"पण शेळीला कुठे लोकर असते?"

"मग या काश्मीरी शाली कसल्या करतात विल्यम?"

"अरे हो, विसरलोंच होतों मी."

"म्हणजे असं कीं, पुष्कळशा प्राण्यांच्या आंगावरचं आच्छादन हें थंड प्रदेशात अधिक जाड नि उबदार असं बनतं. ससे, कोल्हे हे जसजसे उत्तरकडे जातात तसतसे ते अधिक पांढरे शुभ्र होत जातात. आपल्याकडच्या स्टोटची बारीक फर रशियात अत्यंत सुंदर अशा पांढऱ्या रंगात नि मऊमऊ स्वरूपात पहायला सांपडते."

"मला वाटत बाबा, आपल्याला ज्या ज्या प्राण्याची गरज लागते ते प्राणी कोणत्याहि हवेंत जगावे, ही परमेश्वरी योजना मोठी कौशल्याची आणि दया पूर्णच आहे, नाहीं. पण सिंह वाघासारखा लांडगा पण कां नाहीं एकाच देशात डाबून ठेवला हो त्यानें?"

"तुझा प्रश्न फार महत्वाचा आहे विल्यम; आणि तूं तो विचारलास हें पण बरं केलंस. मेंढ्या पाळणाऱ्या धनगराचं मत पण तुझ्याच बाजूला पडेल या लांडग्याच्या बाबतींत. त्याचप्रमाणें शेतकरी म्हणेल या काट्याकुट्याची नि हरळी सारख्या गवताची काय जरूरी आहे? पण त्यांचाही जमीन रक्षणासाठीं थोडा फार उपयोग आहेच. आणि अशा थोडया फार अडचणी जर नसतील आपल्या मार्गात तर आपण

तरी कष्टाळू नि जागरूक कशानें बनलो असतों? कष्टाशिवाय जसं फळ नाहीं, तशी अडचणीं शिवाय आयुष्याला चव नाहीं. कष्ट नि अडचणी म्हणजेच जागरूकता आणि आरोग्य; आणि आरोग्य आहे म्हणूनच आयुष्यात मौज."

"समजलं तुमचं म्हणणं बाबा. आता आणखी काही वैशिष्ट्य असल तर सांगा या प्राण्याचं."

"आता फार काही नाहीं सांगत विल्यम; पण एक ध्यानात ठेव, कीं जे प्राणी प्रामुख्यानें एखाद्या विशिष्ट ठिकाणीं सापडतात, त्यांच्या शरीर रचनेंत पण काहीं वैशिष्ट्य असतं. त्याना लागणारं अन्नहि त्याच ठिकाणीं सापडतं. उदाहरणार्थ उंट. हा प्राणी उष्ण वाळवंटी देशातच सापडतो त्याच्या शिवाय त्या ओसाड वाळवंटातून प्रवास अशक्य होऊन बसला असता. त्याचे पाय कसे पसरट असतात तळाला. त्या-मुळेंच ते त्या मऊ वाळूत पाय खालीं रुतल्याखेरीज जलद चालू शक-तात. त्या रुक्ष देशात वाढणाऱ्या काटेरी झुडुपावरच त्याचा उदर निर्वाह चालतो. पाण्याच्या पुष्कळसा साठा त्याच्या पोटात राहू शकतो म्हणूनच तो त्या निर्जल प्रदेशात राहू शकतो. आता असल्या प्राण्याचा आपल्याकडे काहीं उपयोग आहे का? काहींच नाहीं पण चला आतां; बराच उशीर झाला आहे आपल्याला आज झोंपायला."

---

:: १९ ::

कोठीच्या घराभोंवतीं त्यानीं उभारलेलं चौदा फुट उंचीचं कुंपण आतां बहुतेक पुरं झालं होतं. त्यानीं आपल्याकडून शक्य तितकी काळजी घेऊन तें कुंपण चांगलं भक्कम असंच तयार केलं होतं. त्या कुपणाच्या आश्रयाखालीं आणि आपल्या बदुकींच्या मदतीनें ते रानटी लोकाच्या हल्लयाला यशस्वी रीतीनें आता केव्हांही तोंड देण्याच्या परिस्थितींत होते. रेडींच्या सागण्यावरून त्यानीं मग रात्रीं पहारा करायला पण सुरवात केली. कारण न जाणों त्या रानटी लोकाचा हल्ला एखादेवेळीं रात्रीच्याच वेळीं व्हायचा. कारण त्यावेळींच त्याना हे पांढरे लोक बेसावध सापडण्याचा संभव त्याच्याहि दृष्टीनें जास्त होता.

जवळजवळ पधरा दिवस ते असे सतत काम करीत होते तेव्हां कुठे ते कुपण त्याना आपल्या मनासारखं तयार करतां आलं होतं. त्याचं काम संपलं त्या दिवशींच ते जेवणासाठीं म्हणून जेव्हां घरीं परत आले त्यावेळीं टॉमी कुठे दिसला नाहीं म्हणून त्याच्या आईनें विचारलें: " हें काय रेडी, टॉमी कसा नाहीं दिसत तुमच्याबरोबर ? "

" म्हणजे, आमच्याजवळ नव्हता तो आज दिवसभर, " सीग्रेव्ह म्हणाले. " न्याहारीनतर पधरावीस मिनिट होता तो आमच्याजवळ; पण मग कुठे गेला कुणास ठाऊक. "

" माझ्याजवळ माडांच्या झावळ्या आणून देत होता तो काही वेळ, मिसी. पण तिथूनहि पळाला लौकर. '' जूनो म्हणाली.

" म्हणजे, गेला तरी कुठे असा तो ! " मिसेस सीग्रेव्ह घाबरून जाऊन म्हणाल्या.

" अहो तो पहा—अरे देवारे !—तो पहा तिकडे, " समुद्राकडे बोट

दाखवीत जूनो म्हणाली. "तो पहा त्या होडींत आहे, आणि ती होडी गेली आहे वहावत दूर—आता!"

खरंच तसं होतं. टॉमीची स्वारी होडीत बसली होती आणि ती होडी किनाऱ्यापासून दोरीभर लाब वाहवली होती. ते पाहून विल्यम वाऱ्यासारखा तिकडे पळत निघाला आणि त्याच्या पाठोपाठ सीग्रेव्ह आणि रेडी पळत होते आणि मागें कांही अंतरावर जूनो आणि मिसेस सीग्रेव्ह धावत निघाल्या होत्या. आता मुळींच वेळ गमावण्याची वेळ नव्हती. कारण आता वारा किनाऱ्यापासून वहात होता आणि थोडयाच वेळात होडी त्याच्या पार आटोक्याबाहेर गेली असती.

विल्यमने किनाऱ्यावर येनाच आपली कोट टोपी फेकून दिली आणि तो आत पाण्यात घुसला. आपल्या कमरे इतक्या पाण्यात तो येतो तोंच त्याच्या मागोमाग आत पाण्यात शिरलेल्या रेडींनीं त्याचा हात पकडला आणि ते म्हणाले:

"विल्यम मागे फीर ताबडतोब. मी सागतों म्हणून आधीं मागें फीर. तुझ्या जाण्याचा काही नाहीं उपयोग व्हायचा. कारण माझ्याइतकी काही तुला होडीची माहिती नाहीं. आणि काही झालं तरी मी हा जाणारच. मग निष्कारण हा दुहेरी धोका काय म्हणून स्वीकारायचा! मि. सीग्रेव्ह, याला मागे हाक मारा. मी सांगतो आहे म्हणून मारा हाक त्याला. हे झालंच पाहिजे मी म्हणतो तस."

"विल्यम, मागें फीर, मी सागतों म्हणून मागे फीर; समजल."

विल्यम मागे फिरला आणि रेडीनी हा वेळपर्यंत पहिला खडक गांठला होता आणि ते पुढच्या पाण्यातून पोहत होडीकडे झपाटयानें निघाले हाते.

"बाबा, बाबा, रेडींच्या जीवाला जर काही अपाय झाला तर माझ्या मनाला कधींच स्वस्थता नाहीं मिळणार मग. मी आपल्याला

कधींच क्षमा नाहीं करणार त्याबद्दल ! ते पहा–ते पहा बाबा–बापरे–एक–दोन–तीन शार्कस् दिसताहेत त्याच्या पाठीवर निघालेले ! सपलं बहुतेक आतां. ते पहा रेडी परत खोल पाण्यात घुसले—परमेश्वरच त्याचा आता पाठीराखा !"

पण परमेश्वर कृपेनें रेडी आतां होडी जवळ जाऊन पोंचले होते आणि एकदोन सेकंदातच त्यानीं होडीचा काठ पकडला.

"शाबास—टाकल त्यानीं बोटीत पाऊल," विल्यम ओरडला. "ते पहा शार्क कसे होडीभोंवती रिंगा घालताहेत ते. पण आतां घ्या म्हणावं, त्यानीं दिल्या तुमच्या हातावर तुरी !"

पण तरीहि शार्कस् अजून त्याच्या भोंवतीं घिरट्या घालीतच होते आणि किनाऱ्याजवळ यायचं म्हणजे रेडींना खडकाजवळ पाण्यात उतरून होडी ओढून घ्यायला हवी होती, म्हणून त्यानीं सीग्रेव्ह नि विल्यमला त्या शार्कस्कडे दगड मारायला सांगितलें. आणि त्याचा मात्र इष्ट परिणाम झाला. कारण दगडाचा मारा सुरू होतांच शार्कस्नीं पळ काढला आणि रेडी झटकन पाण्यांत उतरून खडकावर आले. आणि त्यानीं मग खडकाच्या बाजूबाजूने होडी ओढून उथळ पाण्यांत आणली नि खालीं उतरून त्यानीं घाबरून अर्धमेला झालेल्या टॉमीला त्याच्या आईच्या हवालीं केला. विल्यमने तर म्हाताऱ्या रेडींना अत्यानंदानें घट्ट मिठीच मारली.

"मोठाच बिकट प्रसंग आला होता आज. या वेड्यापोराच्या मूर्खपणामुळें कशी जीवावर बेतण्याचीच वेळ आली होती. पण लहान वयांत एवढी अक्कल तरी कशी यायची म्हणा त्यांना ! आणि त्याला शिक्षा पण नको आतां करू;" रेडी म्हणाले.

"भीतीनें त्याची घाबरगुंडी उडाली आहे, एवढी शिक्षाच पुरी

आहे त्याला. पुन्हा तो एकटा बोटींत पाऊल टाकीलसं काही मला वाटत नाहीं बाबा." विल्यम पण म्हणाला.

"आणि आतां सांग विल्यम, तुला आणता आली असती का होडी किनाऱ्यावर? तू पाहिलंसच तिच्या त्या भोंकांतून पाणी कसं आंत येत होतं तें. एक चार दोन क्षण जर विलंब लागला असता मला तर होडीनें नक्की तळ पाहिला असता पाण्याचा. मग तुला परत बोलवाला सांगितलं तें बरोबर कीं चूक?"

"अगदीं बरोबर रेडी. पण टॉमी माझा भाऊ असल्यानें मला असं वाटलं कीं तुमच्यापेक्षा माझा जीव धोक्यात घालणं हेंच माझं कर्तव्य होतं."

"तुझं म्हणणं बरोबर आहे विल्यम. पण तुला याच्या बरोबर आपल्या आईवडिलांचं समाधान करण्याचं पण कर्तव्य करायचं होतं. आणि माझ्यापेक्षा तुझ्या जीवाचं मोल जास्त आहे. एक पाय थड-ग्यात गेलेला असा म्हातारा मी. मला एखाद वर्ष आयुष्य कमी काय नि जास्त काय, सारखंच. पण तुझं सारं आयुष्य अजून पुढेंच जायचं आहे. म्हणून त्याला महत्व जास्त आहे. आणि असल्या आणी-बाणीच्या वेळेलाच हा विचार करणं आवश्यक असतं."

त्या दिवशींची त्याची प्रार्थना अत्यंत गंभीरपणें आणि भरल्या हृदयानें केली गेली. साऱ्यानीच परमेश्वराचे मनापासून आभार मानले आणि त्या दिवशींच्या त्या विलक्षण घटनेनें अगदीं श्रांत होऊन ते लौकरच झोंपीहि गेले.

× × × × ×

दुसरे दिवशीं सकाळीं सूर्योदयापूर्वींच उठून रेडी आणि विल्यम कुंपणाचं दार उघडून बाहेर आले आणि समुद्रावर नेहमींसारखे दुर्बीण घेऊन समुद्राकडे दूरवर पहात बसले. वारा पूर्वेकडे वहात होता आणि

आकाश किंचित अभ्राच्छादित दिसत होतं. रेडींनीं सूर्य वर येत असतां त्या दिशेला पाहिलं आणि काही न बोलता ते तसेच स्वस्थपणें कांही वेळ तिकडे पहात राहिले.

“ काही दिसतं आहे तुम्हांला रेडी ? ” विल्यमनें विचारलें; “ कारण बराच वेळ तिकडे एकेच ठिकाणीं पहाताहात तुम्ही. ”

“ माझे हे म्हातारे डोळे मला फसवीत तरी आहेत किंवा मला काहीतरी दिसत तरी आहे, ” रेडीनीं उत्तर दिलें, “ पण आतां थोड्या वेळात कळेलच नक्की. ”

तिकडे पूर्वेकडे काहीतरी ढगासारखं दिसत होत आणि मग पांच-दहा मिनिटातच सूर्य चागला वर आल्याबरोबर त्याच दिशेनें अजून-पर्यंत सारखे पहात असलेले रेडी म्हणाले:

“ होय विल्यम, मी म्हटलं तसच आहे. तें ढगासारखं वाटणारं तें त्या रानटी लोकाच्या बोटींची शिड असावींतस वाटत. ते येतील अशी कल्पना होतीच माझी. आता एकदा तूं बघ पाहू नीट. इतका वेळ टक लाऊन माझे डोळे पण मद झाले आहेत. ”

“ होय हो रेडी, तुम्ही म्हणता तसच आहे; आणि चागल्या तीस चाळीस तरी होड्या दिसताहेत कीं ह्या ! ”

“ आणि प्रत्येकीत पधरावीस माणसं तरी असतील निदान. ”

“ मग आता काय करायचं रेडी ? आईतर बिचारी अगदीं पार घाबरून जाईल. आणि मला वाटत आपलं काही चालायचं नाहीं इतक्या लोकाविरुद्ध. ”

“ असंच काही नाहीं विल्यम. पुष्कळ करता येईल आपल्याला. ते लोक पुष्कळ आहेत, यात काही शका नाहीं. पण आपण आपल्या भोंवतीं भक्कम कुंपण उभारलं आहे तिहेरी; ते कांही त्याना सहजा-सहजीं ओलाडता नाहीं येणार. आणि शिवाय आपल्या बदुका नि दारू-

गोळा काही त्यांच्याजवळ नाहीं खास. म्हणजे याच्याजोरावर त्यांच्या नुसत्या भाल्यांना आपण सहज तोंड देऊं शकू नि त्यांना पिटाळून लाऊं."

" ते पहा, ते पहा रेडी, किती झपाट्यानें इकडे येताहेत ते; मला वाटतं एक तासाभरातच येऊन पोंचतील ते."

" अंहं, चुकत आहे तुझं विल्यम. त्यांच्या त्या जड अवजड होड्या इतक्या वेगानें नाहीं येऊ शकणार. तरी सुद्धा आपण आता वेळ मोडून नाहीं चालणार मात्र. तू घरीं जाऊन तुझ्या बाबांना दे इकडे पाठवून आणि तू आपल्या सर्व बंदुकी दारूची पिंप, काडतुसाच्या पेट्या अशा जूनाला हाताशीं घऊन कोठीघरात आणून ठेव. ते झालं कीं मग तू पण ये परत इकडे."

विल्यम गेल्यापासून पाच एक मिनिटातच मि. सीग्रेव्ह समुद्रावर आले. " रेडी, काहीतरी धोका दिसतो आहे मला," आल्याबरोबर ते रेडींना म्हणाले. " त्याची आई भिऊन जाईल म्हणून मला वाटत विल्यमनें काही सांगितल नाहीं मला. काय आहे सांगा पाहू."

" आपल्या कल्पनेप्रमाणे हे रानटी लोक येताहेत स्वारी करून आज—पाच सहाशें तरी असतील मला वाटत ते आणि आपल्याला आपली शिकस्त करून यांना तोंड हे दिलच पाहिजे."

" याच्या विरुद्ध आपला निभाव लागेलसा वाटतो तुम्हांला रेडी!"

" होय, सीग्रव्ह, देवदयेनें आपण यांना पिटाळून लाऊ अशी खात्री आहे माझी. पण एक दोन दिवसाचं काम मात्र नाहीं आहे हे."

सीग्रेव्हनीं आपल्या हातात दुर्बीण घेऊन त्या येणाऱ्या कॅनूच नीट निरीक्षण केल. " भलताच भयंकर सामना आहे हा."

" असं तर खर. पण या कुंपणाच्या आत असलेल्या आपल्या तीन बंदुका त्यांच्या भाल्यांना भारी आहेत, हे हि तितकंच खरं आहे. देवदयेनें आपल्या कोणाला इजा मात्र नाहीं होतां कामा."

"ठीक आहे रेडी, परमेश्वरावर भार टाकून शिकस्त करूं या आपण आपली. तुमच्या पाठीशीं मी आणि विल्यम ठाम उभे आहोंत आम्ही; काय सांगाल ते करूं आम्ही, आणि मुळींच मागें सरणार नाहीं त्यात, हें खास समजा."

"ठीक तर. पण आता इथे थाबून नाहीं चालायचं; कारण फार वेळ नाहीं आहे आपल्याला सगळी तयारी करायला. आता अगोदर चार दोन भक्कम फळ्या कुंपणाच्या आत आपल्याला उभें राहायला ठोकूंया. म्हणजे त्यावर उभे राहून आपल्याला गोळीबार चांगला करतां येईल बाहेर. पण आधीं जुन्या घरातून खाण्याचे जिन्नस वगैरे सार ढकलून आणूया या कोठीघरात. कारण त्याचा पहिला हल्ला हा त्या जुन्या घरावरच होईल. माझ्या कल्पने प्रमाणें सर्व आवश्यक तें सामान आपण आणलेलंच आहे. सरपणहि आहे पुरेसं, आणि आतां जातां जाता एकदोन कासव पण मारून नेऊं या."

घराची वाट ते चालत असताच त्यांचं हें बोलणं चालल होतं. ते जाऊन पोंचेपर्यंत विल्यम आणि जूनोनीं दारूगोळा आणि बंदुका सर्व आत आणून ठेवला होता. सीग्रेव्ह मग आत आपल्या पत्नीला ही बातमी द्यायला गेले.

"तशी थोडी फार मी पण तयार आहें ह ही बातमी ऐकायला. आणि अगदींच काही अनपेक्षित नाहीं हे, नाहीं ! आणि मला जें कांही करतां येईल तें मी करायला काही मागं नाहीं सरणार."

"चला, पुष्कळच काळजी कमी झाली म्हणजे मग माझी. आतां तुझी इतकी तयारी आहे, मग काय ! चला तर कामालाच लागूं या आपण."

× × × ×

जुन्या घराजवळून त्यानां त्या येणाऱ्या होड्यांकड चांगलं पाहतां

येत असल्यामुळे सामान नेता नेता रेडी मधून मधून दुर्बीण लाऊन तिकडे पहात होते. प्रत्येकजण आपल्या शक्तीप्रमाणे आता कामाला जुडला होता. मिसेस सीग्रेव्ह पण कंबर कसून काम करीत होत्या. एक तासाभरातच त्यांच्या दृष्टीनें मौल्यवान असं सर्व सामान त्यांनीं कोठी घरात नेऊन साठवलं, आणि त्या होडया अजून निदान पाच सहा मैल तरी लांब होत्या.

" अजून कमीत कमी तासभर वेळ आहे आपल्याजवळ, " रेडी म्हणाले. " आणि मग सुद्धा या खडकातून वाट काढता काढता चांगलीच खात्री उडेल त्याची. म्हणजे मला तर वाटत अजून दोन तीन तास तरी हवेत त्याना इथे यायला. खूप आहे म्हणजे तसा वेळ. मी एकदोन कासवं आणतों मारून तोंपर्यंत आणि तुम्ही मिस्टर सीग्रेव्ह, आपल्या बंदुकी नीट तपासून आत बार भरून ठेवा त्या सगळ्यांत."

अर्ध्या तासातच मग सहा कासवें मारून आणलीं रेडीनीं आणि मग ते आत त्यांच्या किल्याच्या तटाच्या आत गेले. त्यानीं मग दोन दोन पिंपं आणून तटा जवळ उभीं केलीं आणि त्याच्यावर फळ्या आणून घातल्या. त्याच्यावर उभे राहून ते बाहेर गोळीबार करणार होते. मिसेस सीग्रेव्ह आणि जूनो याना मग बंदुकी कशा भरायच्या तें रेडीनीं दाखवलं.

" आता आपली तयारी झाली सीग्रेव्ह. तर मॅडम आणि जूनो यानीं मुलाना खायला घालून आपल्या पण न्याहारीची सोय करायला कांहीं हरकत नाहीं. "

मुलांचं खाणं उरकल्यानतर बाहेर दुर्बीण घेऊन बसलेल्या रेडींना मिसेस सीग्रेव्हनीं आत हाक मारली. आणि आत गेल्यावर त्यानीं प्रथम परमेश्वराची मनोभावानें प्रार्थना केली आणि नंतर ते न्याहारीला

बसले. त्याची न्याहारी पण घाईघाईनेच उरकली. कारण जेवणाकडे तसं कोणाचंच विशेषसं लक्ष नव्हतं.

" हा असला मधला वेळ कीं नाहीं मोठा तापदायक असतो, नाहीं रेडी ? आता या म्हणाव एकदा; " मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या.

रानटी लोकांच्या होडया आता किनाऱ्यानजीक येऊन पोंचल्या होत्या. पण त्या खडकाळ भागातून आत येण्याची वाट त्याना माहीत नसल्यामुळें किनाऱ्यावर उतरायला त्याना वेळच लागणार होता. विल्यम आणि रेडी दोघेहि माडाच्या आड उभे राहून त्याच्या हाल-चाली नीट बारकाईने पहात होते. होडयातून पुष्कळसे लोक आतां उतरले होते आणि बाकीच्या होडया पण घाईघाईनें खडकातून किनाऱ्यावर उतरण्यासाठीं धडपडत होता. त्या रानटी लोकाचीं आगं चित्रविचित्र रंगानीं रंगविलीं होतीं, आंगावर कसले तरी लाब झगे होते आणि आपल्याडोक्यात त्यानीं पिसे खोंचलीं होतीं. त्याच्या हातात लाब लाब भाले आणि लाकडी गदा दिसत होत्या आणि त्याचा एकंदर नूर रक्तपात करण्याचाच दिसत होता. त्याच्याकडे बारकाईनें पहात असलेला विल्यम हातातील दुर्बीण दूर करून म्हणाला; " किती भयंकर दिसताहेत हो हे लोक रेडी; त्यानीं जर आपल्याला नामोहरम केल तर ते आपल्याला ठार मारल्या शिवाय काही राहाणार नाहीत !"

" त्यात तर मुळींच शका नाहीं रे विल्यम; पण आपण हि आपली शिकस्त करून त्याना तोंड दिलच पाहिजे. आणि आपल्याला नुसते ठार करूनच नाहीं राहाणार ते, तर मला वाटत मागाहून आपला चट्टामट्टा पण टाकतील करून ते, आपण हरलो तर. पण त्याची आपल्याला काय फिकीर आहे ! "

" माझ्या आंगात त्राण आहे तों पर्यंत मी आपली शिकस्त केल्या-

वांचून नाहीं राहाणार, " दात ओठ चाऊन विल्यम म्हणाला. " पण ते पहा रेडी, किती झपाट्यानें आता इकडे येताहेत ते. "

" होय, तर आपण हि आता इथे नाहीं थांबता कामा. चल विल्यम."

" रेडी, तिकडे त्या उत्तर टोंकाला दूर एक शीड दिसतसं वाटतं आहे मला. "

"शक्य आहे, यांच्यातलंच राहिल असेल एखादं मार्ग.चल, विल्यम चल लौकर, त्या पहा त्याच्या रणगर्जना झाल्या बघ सुरू. "

अर्ध्या मिनिटातच ते आपल्या मकाणावर आले. आत येऊन त्यानीं तो झोपा घट्ट बंद केला आणि आतल्या बाजूला नारळाचे ओंडके आणून टाकले आणि ते आतल्या कुंपणाच्या आत झटकन शिरून दिसेनासे झाले.

---

:: २० ::

त्या रानटी लोकांच्या कर्णकटु किंकाळयाचा जोर आता सारखा वाढत होता आणि मिसेस सीग्रव्हच्या हृदयाचा इकडे थरकाप उडत होता. त्याची तीं चित्रविचित्र आणि भयानक शरीरं त्यानीं जर पाहिलीं असतीं तर त्याची अवस्था मोठीच कठीण झाली असती. लहानगा आल्बर्ट नि कॅरोलीन यानीं घाबरून जाऊन आपल्या आईच्या गळयाला मिठी मारली होती आणि त्याचे चेहरे पाढरे फटक दिसत होते. तीं मोठ्याने रडत ओरडत मात्र नव्हतीं. पण त्या भयानक आवाजाचा सुगावा घेत भयभीत होऊन आपल्या आईच्या आंगाला तीं अधिकाधिक घट्ट बिलगत होतीं. टॉमीचं मात्र काम संथपणें चाललं होतं. कारण त्याच्या पाठीशीं आज कुणाचाच लकडा नसल्यानें त्याचं मनमुराद खाण चालू होतं. जूनो न घाबरता रेडीच्या भोंवतीं सारखी हिंडत होती. कुरणातून बाहेर मारा करण्यासाठीं योग्य जागा पाहण्यांत मि. सीग्रेव्ह गुतले होते आणि विल्यम आणि रेडी आपल्या बंदुकी भरून घेऊन शत्रू जवळ येण्याची उत्सुकतेनें वाट पहात उभे होते.

"ते पाहिलेत सीग्रेव्ह, ते लोक तिकडे आपल्या त्या घरावर घसरले आहेत आधीं; पण फार वेळ नाहीं तिथे थाबणार ते."

"ते पहा, आलेच ते रेडी," विल्यम म्हणाला. "आणि ती पहा, तीच ना ती बाई इथून पळून गेलेल्यातली ? हाय, तीच ती नक्की."

"बरोबर आहे तुझा तर्क विल्यम; त्यातलीच ती बाई. आहा ! ते पहा ते थाबले. आपल्या वाटेंत असला हा कुंपणाचा अडथळा येईल, ही कल्पना नसेल त्याना; म्हणून जरा गोंधळल्यामारखे दिसताहेत ते पहा. आणि तें पाहिलस, त्याचं काही तरी कुजबुजणं चाललं आहे

आपसांत. मला वाटत, आतां काय करावं याचा विचार करीत असतील ते. तो उंचेला त्याचा नायक दिसतो आहे बहुतेक. पण विल्यम, मी अगदीं अधीर जरी झालो आहे ना लढण्यासाठीं, तरी पहिली गोळी आपणच झाडावी असं काही मला वाटत नाहीं आहे. म्हणून मी काय करणार आहे माहीत आहे? हा असा या कुंपणाच्यावर मी आधीं डोक काढून उभा राहतो. म्हणजे माझ्यावर ते हल्ला चढवतील, कीं मग झालाच माझा गोळीबार सुरू. माझं मन मग अगदीं निर्विकल्प राहील."

"पण सांभाळा हा रेडी, त्याचा फटका बसायचा एखादा."

"त्याची नको रे काळजी विल्यम. हे बघ आलेच ते पुढे."

रेडी आता त्या पिंपावर ठेवलेल्या फळीवर उभे राहिले होते. ते दृष्टीस पडताच त्या रानटी लोकांनीं एक भली मोठी कर्कश आरोळी ठोकली आणि दहा बारा भाले रेडींच्या रोखानें सणसणत आत आले, आणि रेडी जर एकदम खालीं बसले नसते तर त्यांचा नक्की मुडदाच खालीं कोसळला असता. कारण तीन चार भाले ते उभे असलेल्या जागेवर लांकडात रुतून थरथरत होते आणि दोन चार आंत येऊन खालीं जमीनीवर पडले होते.

"हं, विल्यम, नीट नेम धर आतां आणि चलाव गोळी." पण विल्यमची गोळी सुटण्याच्या आधीं, त्यांच्या खालच्या कोंपऱ्यावर तिकडून शत्रू येतो कीं काय हें पहात उभे असलेल्या सीग्रेव्हनीं बदुक उडवली होती आणि त्यांच्या गोळीला तो उंचेला नायकच बळी पडला.

त्यांच्या मागोमाग विल्यम रेडीनीं पण आपल्या बदुका झाडल्या आणि आणखी दोन लोक खालीं कोसळले. जूनो आणि तिची मालकीण त्या रिकाम्या बदुकी घेऊन त्यांत दारू ठासू लागल्या. त्यानीं मुलांना घरांत दारं बंद करून अडकाऊन ठेवलीं होतीं.

बाहेरील बाजूनें आता भाल्याचा वर्षाव जोरात सुरू झाला आणि त्या भर भक्कम कुंपणाच्या आतल्या बाजूने जर गोळीबार करता आला नसता तर त्या सर्वांची केव्हाच चटणी उडाल्या शिवाय राहतीना. बाहेरील आरोळ्या वाढतच होत्या आणि काही जण तर माकडांच्या चपळाईनें त्या उंच कुपणावरून चढून आत येण्याचा प्रयत्न करीत होते. पण त्यांचीं डोकीं कुंपणावरून दिसूं लागलीं कीं तीं अचूक टिपलीं पण जात होतीं. एक तासभर चालला होता असा प्रकार. अखेरीस बरेच लोकाचा बळी पडल्यामुळे त्या रानटी लोकानी तात्पुरती माघार घतली आणि आतल्या लोकाना थोडी फार विश्राती मिळाली.

" या पहिल्या चकमकींत त्याना काहींच न मिळता त्याचे हात मात्र चागले पोळले आहेत, " रेडी कपाळावरचा घाम पुशीत म्हणाल. " आपण पण चागला लढा दिला बरका विल्यम, आणि तूं तर एखाद्या लढवय्यासारखीच कामगिरी केलीस आज; शाबास ! "

" आता त परत जातील काय हो रेडी ? " मिसेस सीग्रेव्हनीं विचारलें.

" छे छे, मॅडम, एवढ्यांत नाहीं ! एथून जाण्यापूर्वी आपली शिकस्त केल्यावाचून नाहीं राहणार ते तसे. मोठे शूर नि कडवे असतात लोक हे; आणि त्याना या दारूगोळ्याचा पण परिचय दिसतो आहे. कारण ते काही तसे चकित झाल्यासारखे नाहीं दिसत आहेत आपल्या या बारांनीं. "

" मलाहि तसंच वाटतं रेडी. कारण या रानटी लोकानीं बंदुकीचा आवाज पहिल्यानेच ऐकला कीं त्यांची भीतिनें गाळण उडून जाते बहुधा; " सीग्रेव्ह म्हणाले.

" पण याची तशी उडालेली दिसत नाहीं, म्हणून गोऱ्या लोकाशीं त्यांचा हा पहिलाच सामना नसावा मला वाटतं. "

" ते सगळे परत फिरले कांहो रेडी ? " फळीवरून उतरून आपल्या आईजवळ येऊन बसलेल्या विल्यमनें विचारलें.

" अंह्, ते तिकडे त्या झाडांजवळ जाऊन बसले आहेत. त्यांचा विचारविनिमय चालला असेल बहुतेक. "

" चालूं द्या म्हणावं सावकाश. पण आपल्याला तर बुवा तहान लागली आहे फार," विल्यम म्हणाला. " जूनो, पाणी आण ग थोडं मला. "

जूनो पाण्याच्या पिंपाजवळ पाणी आणण्यासाठीं गेली पण एक दोन सेकंदातच घाबऱ्या घाबऱ्या मागें परत आली.

" ओ मासा, ओ मिसी ! पाणी नाहीं; पाणी गेल सगळ ! "

" पाणी गेलं सगळं ! " रेडी आणि इतर सर्वहि एकदमच उद्गारलीं.

" होय, एक थेंबहि नाहीं दिसत पिंपात. "

" पण मी तर काठोकाठ भरल होत पिंप ! " रेडी गंभीरपणें म्हणाले; " आणि पिंप गळत पण नव्हतं मुळींसुद्धा, माझी खात्री आहे; मग हें असं कसं झालं ? "

" मिसी, मी सागतें आता; " जूनो म्हणाली. " दोन दिवसांपूर्वीं आपण टॉमीला विहिरीवरून पाणी आणायला पाठविल होतं. आणि तो किती चटकन परत आला, तें आठवत तुम्हाला ? आणि आपण त्याची पाठ थोपटली होती त्यावेळीं, नाहीं का ? म्हणजे आतां असं वाटत कीं त्यावेळीं टॉमीनें या पिंपातूनच पाणी काढल असेल. म्हणूनच स्वारी इतक्या लौकर परत आली असावी त्यावेळीं. "

" तसंच असेल ग जूनो, " मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या. " पण आतां कसं करायचं ? "

" मोठी चमत्कारिक परिस्थिती आहे मि. सीग्रेव्ह, " रेडी गंभीर मुद्रेनें म्हणाले.

सीग्रेव्हनीं मान हलवली. म्हणजे आता अशी अवस्था उत्पन्न झाली होती कीं, जर ते रानटी नर भक्षक लोक लौकर बेटावरून गेले नाहींत तर पाण्यासाठीं आतल्या सर्व लोकांना तडफडावं लागून त्यानीं मरण तरी पत्करल पाहिजे नाहींतर शरण तरी गेल पाहिजे. आणि शरण गेल तरी हजार हिश्शानीं मृत्यू हा ठेवलेलाच.

" परमेश्वराची मर्जी अशी दिसते कीं एका मूर्ख पोरामुळें आपण काळजी पूर्वक केलेली सर्व तयारी मातीमोल होऊन जावी, " एक दीर्घ सुस्कारा टाकून सीग्रेव्ह म्हणाले.

" खरं आहे तुमचं म्हणणं. आपल्याला आता एकच आशा, आणि ती म्हणजे हे लोक कटाळून लौकर निघून जाण्याची, " रेडी म्हणाले.

" मुलांसाठीं थोडं तरी पाणी असतं कीं नाहीं, म्हणजे नव्हती एवढी काळजी; पण या लहान बाळांना तडफडताना पाहणं म्हणजे— एक थेंबभर देखील नाहीं का ग पाणी कुठे जूनो ! "

जूनोनें खिन्नपणें नकारार्थी मान हलविली.

"मोठाच बिकट प्रसंग आहे आता रेडी. आत्तां जर पाऊस असता तर काय बहार झाली असती ! पागोळींचं पाणी तरी धरून ठेवतां आलं असतं आपल्याला, " सीग्रेव्ह म्हणाले.

" त्याचं तर काहीं चिन्ह दिसत नाहीं आहे मुळींच, " रेडीनी उत्तर दिलें. " आतां त्या परमेश्वरावरच हवाला सर्वांचा, तो कांही पाठ नाहीं फिरवणार आपल्याकडे. माझी खात्री आहे."

"आतां या लोकांनीं लौकर हल्ला केला तर बरं होईल. म्हणजे काय असेल तो सोक्षमोक्ष लागून तरी जाईल एकदांचा. "

"आत्ता येतीलसं काही वाटत नाहीं मला विल्यम. रात्रीं ते येण्याची शक्यता मात्र अधीक आहे, मला वाटत. तर त्याची तयारी करूं या आता आपण."

"ती कशी काय करायची रेडी?"

"मला वाटतं थोड्या आणखीं फळ्या मारून ही इकडची बाजू आपण आणखीं उंच करूं या. म्हणजे ही बाजू पुष्कळशी निर्धास्त झाली असं समजायला काही हरकत नाहीं. मघाशीं त्या बाजूनेच ते लोक आत येत होते, नाहींका! मग थोडं सरपण आणून त्याची रास करूं या इथे. म्हणजे लढताना आत दिसेल तरी आपल्याला काही तरी. नाहीं तर त्या अंधारात काय करणार आपण! आता त्यामुळें आपण नक्की कुठे उभे आहोंत तें दिसेल त्याना हें खरं; तरी सुद्धा त्याचे भाले काही त्यांना आत नाहीं नीट खुपसता येणार. मात्र त्याचा हल्ला झाल्याशिवाय नाहीं हा जाळ करायचा. या जाळामुळें त्याचा हल्ला कुठून होतो आहे तें पण आपल्याला चांगलं दिसेल आणि त्याच बाजूला आपला गाळीबार करता येईल आपल्याला."

"ठीक, कल्पना चांगली आहे रेडी; आणि ही पाण्याची नसती काळजी नसतीना उत्पन्न झाली, की मग आपल्याला तेवढी डर नव्हती;" सीग्रेव्ह म्हणाले.

"आपल्याला खूप त्रास होणार हें तर स्पष्टच दिसतं आहे. पण उद्याना काय होईल तें काय सांगता येईल!"

"सत्य आहे रेडी. तुम्हाला दिसताहेत का आता ते रानटी लोक?"

"नाहीं, आत्ता काही दिसत नाहीं आहेत. त्याची ती बैठक आटोपलेली दिसते आहे. मला वाटत ते आपल्या जखमी नि मेलेल्या लोकांची वाट लावीत असतील काही तरी."

रेडींच्या कल्पने प्रमाणें त्या रानटी लोकांनीं त्या दिवशीं कांहीं परत हल्ला चढवला नाहीं; म्हणून त्यानीं सीग्रेव्ह नि विल्यम यांच्या मदतीनें आपला बंदोबस्त अधिक भक्कम करण्यात तो दिवस घालवला. त्यानीं आपल्या त्या गढीच्या तीन बाजू आणखी फळया ठोकून उंच केल्या. त्याची उंची आतां पाच सहा फूट वाढल्यामुळें त्याच्या वरून चढून आत येणं बहुतेक अशक्य होऊन गेलं होतं. आणि मग त्यानीं एंका डाबराच्या पिंपात माडाच्या झावळ्या आणून कोंबून भरल्या आणि उजेडाची तयारी करून ठेवली. त्या दिवशीं त्याना खाण्या-सारखं फारसं कांहीं नव्हतं, आणि तहान जास्तच लागेल म्हणून रेडींच्या सांगण्या प्रमाणे त्यानी कांहीं खाल्ल पण नाहीं.

पण लहानग्या आल्बर्टचे आणि कॅरोलीनचे मात्र फार हाल होत होते. ती दोघं हि एकसारखीं 'पाणी पाणी' असा आक्रोश करीत होतीं. पण कांहीं करता येणं शक्य नव्हतं आणि हवेंत हि फार उकाडा अस-ल्यामुळें मुलांना गप्प करणं अतीशय बिकट झालं होतं.

---

:: २१ ::

पण काळोखाच साम्राज्य पसरण्यास सुरवात झाल्या बरोबर रात्रीच्या हल्ल्याची पूर्व सूचना म्हणून सुरू झालेल्या त्या रानटी लोकाच्या अकाळ विकाळ किंचाळ्यात मुलाचा आक्रोश केव्हाच बुडून गेला. रेडींच्या कल्पने प्रमाणें रात्रीच्या लढाईस आता तोंड लागत होत.

घराभोंवतील कुंपणाच्या सर्व बाजूंनीं रानटी लोकानीं आता हल्ला चढविला होता आणि कुंपणावरून आत चढून येण्यासाठीं त्याचे कसून प्रयत्न चालले होते. मधून मधून भाल्याची फेक हि उंचावरून केली जात होती पण त्याचा मुख्य हेतु आत प्रवेश करून घ्यायचाच दिसत होता. त्याची भिस्त विशेषतः संख्या बळावरच होती. पण रेडीनीं केलेल्या व्यवस्थेमुळे आत पेटविलेल्या जाळाच्या उजेडात कुंपणावर डोकावणारीं डोकीं बदुकीच्या गोळींनें अचूक टिपलीं जात होतीं. आत्ता पर्यंत चार पाच जणाचे बळी विल्यम नि सीग्रेव्हच्या गोळ्याना पडले होते, आणि आतला उजेड जसजसा वाढूं लागला तसतशी बळींची संख्याहि वाढू लागली; कारण त्या वाढत्या उजेडांत आपलं निशाण अचूक टिपण त्याना सोपं जात होतं. एक ताम दोडतास असा प्रकार सारखा चालला होता आणि अनेक रानटी लोकाचा बळी बदुकीच्या गोळ्यानीं घेतला होता. परत एकदा मग ते रानटी लोक पूर्वीप्रमाणेच आपले जखमी आणि मेलेले लोक बरोबर घेऊन मागें हटले.

" मला वाटतं आता हे बहुतेक आल्या वाटेनें परत जातील, " सीग्रेव्ह रेडींना म्हणाले.

" तस झाल तर फारच चागलं, नि अशक्य पण नाहीं तें; " रेडीनीं उत्तर कलें. " पण त्याचा काही नियम नाहीं. तर मला वाटतं

सीग्रेव्ह, त्यांच्या हालचालींवर आपण पहारा ठेवावा तें बरं. तो पलीकडचा झाड दिसतो आहे ना, त्यावर चढून त्याच्या हालचाली आपल्याला पहाता येतील. आणि झाडावर खिळे ठोकून चढण काही आपल्याला अशक्य नाहीं."

"पण आपल्यावर भाल्याची अचूक फेंक करणं त्यांना सोपं नाहीं का जाणार मग!"

"नाहीं, ती नाहीं धास्ती—कारण फार लांबून चढणारावर भाला फेंकणं काही तेवढं सोप नाहीं. त्याना जवळ येऊनच तो फेकणं भाग आहे. म्हणून त्या झाडाजवळ जाणारा माणूस आपणहि बंदुकीनें टिपू शकतों. आणि शिवाय तो येताना दिसला तर आपल्याला झटकन खालीं उतरण पण तेवढस कठीण नाहीं. तरी पण सकाळपर्यंत आपल्याला थांबण्याला काही हरकत नाहीं."

मिस्टर सीग्रेव्ह मग झोंपण्यासाठीं घरात गेले आणि रेडींनी विल्यमला पण आत जाऊन दोन तीन तास झोंप घेण्यास सांगितलें. आणि सकाळीं मग सीग्रेव्ह पहारा करायला आले कीं मी झोंप घ्यायला जाईन असें ते त्याला म्हणाले.

"पण मला झोंप येणंच शक्य नाहीं हो रेडी. अगदीं विलक्षण तहान लागली आहे बघा मला;" विल्यम म्हणाला.

"खर आहे बाबा; माझी पण तीच अवस्था झाली आहे. मग त्या लहानग्याची काय झाली असेल स्थिती! त्याचीच अतिशय काळजी वाटते आहे रे मला."

"मला आईचीच जास्ती कींव येते आहे रेडी," विल्यम म्हणाला. "काय यातना होत असतील तिच्या मनाला त्या लहान बाळाचे हाल पाहून."

"खरं आहे विल्यम; विलक्षण यातना होत असतील त्या मातेच्या अंतःकरणाला, यात काही शंका नाही. आणि तिला काहीच हालचाल न करता येऊन स्वस्थ पहात बसायला लागणं हें खरोखरीच भयंकर आहे. पण उद्या कदाचित जातील हे रानटी लोक आणि आपलं नष्टचर्य संपेल."

"देव करो नि तसंच होवो रेडी. पण त्यांचा कृतनिश्चय झालेला दिसतो आहे मला."

"होय विल्यम, अस तर खरं. लोखंड म्हणजे जसं सोन वाटतं त्यांना. आणि आपण तरी सोन्यासाठीं कसे धडपडतो ?"

दरम्यान सीग्रेव्ह आत घरात गेले तेव्हा पोराचा पाण्यासाठीं सारखा हलकल्लोळ चालला होता आणि त्याना गप करण्याचे त्याच्या आईचे सर्व प्रयत्न अगदीं व्यर्थ जात होते. मिस्टर सीग्रेव्हनीं पण आपल्याकडून त्याना शांत करण्याचे प्रयत्न केले, पण त्याचा काही उपयोग होईना. अखेरीस ते घराबाहेर आले.

"रेडी, या लोकाच्या पिसाटासारख्या हल्ल्याला शभर वेळा सुद्धा तोंड देणं मला पत्करेल, पण आतल्या पोराचा तो आक्रोश आता पाच मिनिट सुद्धा सोसणं अशक्य झालं आहे मला. छे! कठीण आहे अवस्था मोठी."

"मला पूर्ण कल्पना आहे त्याची मिस्टर सीग्रेव्ह; पण परमेश्वरावर भार घालून स्वस्थ बसलं पाहिजे काही वेळ. मला वाटत असे दोन वेळां पराभूत झाल्यामुळें आपले हे शत्रू कदाचित परत फिरतील या वेळीं."

"आनंदच वाटेल मला तस झालं तर रेडी. पण आता तुम्ही उठा, मी बसतों इथे पहाऱ्यावर. तुम्हाला नाहीं का झोंप घ्यायची थोडीशी ?"

"घ्यायची आहे, पण तशी शक्यता काही दिसत नाहीं आहे मला. तरी हि थोडा आडवा होतों मी, म्हणजे ती सुद्धां विश्रांती पुरेशी होईल मला."

पहाऱ्यावर बसलेले असताना मिस्टर सीग्रेव्हच्या मस्तकांत अनेक विचाराचं तांडव चालू होतं. आलेलं संकट लौकर दूर जाऊन आपल्या मुलांबाळांचे हाल वांचविण्यासाठीं ते परमेश्वराला एकसारखे आळवीत होते. आणि बऱ्याच वेळानंतर परमेश्वराच्या नामस्मरणानें त्याच्या मनाला थोडी शांति आली. त्यांनीं आपला सर्व भार त्या दयाघनावरच आतां टाकला होता. तोच एक सर्व साक्षी आतां तारता किंवा मारता या दृढ भावनेनेच त्याच्या हृदयाला शांति वाटत होती.

सकाळीं सूर्योदयाबरोबर रेडी उठून बाहेर आले आणि त्यांनीं सीग्रेव्हची जागा घेतली, आणि तेहि आत न जाता तिथेंच बाहेर झावळ्यावर विल्यमच्या जवळ विश्रांतीसाठीं आडवे झाले. रेडीनीं मग मोठमोठे खिळे आणि हातोडी बाहेर आणून विल्यमला हांक मारली; आणि त्या दोघांनीं मग मोठ्या सावधगिरीनें आपल्या शत्रूच्या हाल-चालीवर एकीकडे नीट दृष्टि ठेऊन माडावर खिळे ठोकण्यास सुरवात केली. एका तासातच त्यांचं काम संपलं आणि शेवटचा खिळा ठोकून विल्यमनें नारळीचा शेंडा गाठला. तिथून त्याला आसपासचं चांगलं निरीक्षण करता येत होतं. रेडींच्या सांगीप्रमाणें त्यानें आसमंताचे नीट निरीक्षण केले आणि तो झटकन खालीं आला.

" सुंदर दिसतं आहे पहा तिथून रेडी, आपलं तें मोठं घर पार मोडून तोडून टाकलं आहे त्यांनीं आणि सर्वजण बाहेरच अस्ताव्यस्त पसरलेले दिसताहेत. काही बायां घराकडून त्यांच्या होड्याकडे सारख्या फेऱ्या मारतांना दिसताहेत. काय करीत असतील हो त्या ? "

" आपलं घर पाडून टाकलं आहे ना त्यांनीं, मग त्याचे मोठे खिळे उपटून काढून नेत असतील ते. पण काय रे, आपल्या गोळ्यांचे बळी दिसताहेत कीं नाहीं तिथे कुठे ? "

"नाहीं बुवा; तसे काही नीटस पाहिले नाहीं मी. पण पुन्हा जाऊन पाहतों ह. माझे हात ठोकून ठोकून लागले होते दुखायला म्हणून आलों होतों खालीं. आता जातो परत वर. पण माझे ओठ तर अगदीं कोरडे पडले आहेत हो रेडी, आणि हे सर्वांग कस फुटत असल्यासारख ठुसठुसत आहे. मला कल्पना नव्हती पाण्यानें अशी अवस्था होईल म्हणून. वर पण एखादा कोवळा नारळ नाहीं सापडला मला मघाशीं."

"आणि सापडला असता तरी त्यात पाणी नसतं मिळालं तुला. त्याच्या हगामाला अवकाश आह अजून. तरी सुद्धा विल्यम, आज मात्र जर हे लोक निघून नाहीं गेले तर काही झालं तरी पाणी हे पैदा करावच लागेल आपल्याला. बघ तर पाहू एकदा वर जाऊन, काय हालचाल दिसते आहे त्या लोकाची ती."

विल्यम त्याप्रमाणें माकडाच्या चपळाईने माडावर चढून गेला आणि सभोंवार काही वेळ नीट पाहून तो खालीं उतरला. "सारेजण एका ठिकाणीं गोळा होताहेत मुंग्यासारख ते दोनशेसाठ लोक मोजले मी उभे राहिलेले. आपल्या पाण्याच्या विहिरीवर बायाची येजा चालू आहे आणि त्या होडयाजवळ आठ दहा बायाच दिसताहेत फक्त आणि आपलं डोकं नि छाती पिटताहेत मला वाटत त्या. चागली स्पष्ट नाहीं दिसत त्याची हालचाल, पण तसंच काही तरी करताहेत त्या."

"मला माहीत आहे काय करताहत त्या बायका तें. आपल्याच आंगावर जखमा करून घेत असतील त्या. त्याच्यात पद्धत आहे तशी. मेलेल्या लोकाची प्रेतं त्यानीं होडयात ठेवलीं आहेत आणि त्याचं हें शोक करणं चाललेल आहे. आता कदाचित ते निघूनहि जातील. त्यानीं तीं प्रेतं होडयात ठेवलीं आहत म्हणतो आहेस त्यावरून तसं वाटतं मला. पण तरी सुद्धां आपण नक्की काहीच नाहीं सागू शकत."

## :: २२ ::

दुसरा संबंध दिवस लोकांचा हल्ला येतो कीं काय त्याची वाट पहात आणि सारखा जागता पहारा करण्यात खर्च झाला. त्या नारळाच्या शेंडयावरून त्याच्या शत्रूंचा खलबतखाना भरलेला त्यांना दिसत होता. ते वर्तुळ करून बसले होते आणि कोणी तरी मध्यभागीं उभा राहून आणि आपल्या हातातील भाला नि मुद्गल गरगर फिरवीत तावातावानें बोलत असल्यासारखें दिसत होतें. असे तिसरे प्रहराच्या सुमारास ते सर्व रानटी लोक आपल्या खलबतखान्यातून उठून चोहीकडे विखुरले होते. आणि त्यांतले काही नारळीचीं झाडें तोडून त्याच्या झावळ्या वगैरे गोळा करण्यात गुंतले होते.

त्याच्या त्या सर्व हालचालींचें नीट निरीक्षण करीत रेडी किती वेळ तरी बसल होते. अखेरीस सायकाळचे सुमारास ते खाली आले. "मि. सीग्रेव्ह," ते म्हणाले, माझ्या मतें आपला शत्रू आज रात्रीं हल्ला करणार आपल्यावर, असं दिसत. पण उद्या काही तरी भयंकर होणार असं वाटतं. कारण त्या लोकाचा झाडं ताडण्याचा सारखा सपाटा चालला आहे पण त्यांची हत्यारं चागली धारदार नसल्यामुळें त्यांचं काम तितकंस झपाट्याने कांही होत नाहीं आहे. तरी सुद्धा चिकाटी आणि सख्याबळ याच्या जोरावर सर्व काही साध्य करतां येईल. आणि मला वाटतं आज रात्रभर ते हीं लाकड गोळा करीत बसतील बहुतेक, त्यानां पुरेशीं होईपर्यंत."

"पण हीं झाड तोडण्यांत त्याचा काय उद्देश असावासा वाटतो तुम्हाला रेडी ?"

"एक तर त्यांची उच रास करून त्यावरून चढून आत प्रवेश

करायचा किंवा त्याना आग लाऊन देऊन आपली आंत गरम सागुती बनवायची; किंवा आपल्याला बाहेर यायला तरी भाग पाडायचं."

"आणि त्याना यात यश येईल्स वाटतं तुम्हाला?"

"पुष्कळशा माणसाच्या बळी दिल्याशिवाय तर खासच नाहीं. आपण कदाचित त्याना पिटाळूनहि लावू. अतिशय बिकट काम आहे तें आणि त्या मानाने काल काहींच झाल नाहीं अस म्हणावं लागेल आपल्याला. आपल्या बदुकी जर सारख्या भरून ठेवल्या बायकानीं तर आपलं काम पुष्कळसं सुलभ होईल. आपल्याला आतल्या आत जाळण कांही तेवढं सोपं नाहीं. पण त्या धुराचा मात्र विलक्षण त्रास होईल. माडाचे हे ओंडे लवकर पेट घत नाहींत आणि कितीवेळ तरी सारखे धुमसत माल राहतात. आणि जरी ते पेटले नि त्याची आग जरी प्रचड असली तरी त्याची राख मात्र लौकर होते."

"पण रेडी पाण्यावाचून आपण आधींच तडफडतों आहोंत, त्यांत मग त्या धुरानें एकदा गुदमरायला लागलों कीं आपला निभाव कसा लागायचा! नुसत्या थकव्यानेंच आपण निस्त्राण होऊन पडूं."

"तें खरं आहे, पण आपल्याला काय शक्य तें करीत राहणंच भाग आहे मि. सीग्रेव्ह," रेडीनीं उत्तर केले. "आणि आणखी एक ध्यानात ठेवा कीं या हल्ल्यात मला जर काही दुखापत झाली आणि आपला निभाव लागत नाहीं अस वाटलं तुम्हाला, तर त्या धुराचा आसरा घेऊन येथून बाहेर पडा आणि जंगलाचा आश्रय घ्या. मी विल्यमला वाट दाखवून ठेवलीच आहे त्या वाटेनें जंगलातून बाहेर पडून तंबूचा आसरा घ्या ताबडतोब. कारण घर एकदा त्याच्या ताब्यांत आलं कीं त्यातल सर्व सामान लुटून झाल्यावर हे लोक कदाचित परतहि जातील. अर्थात ही आपली एक शक्यता आहे, एवढंच."

"पण तुम्हाला काही दुखापत होईल असं का वाटतं आहे तुम्हांला रेडी ?" विल्यमनें विचारले.

"अरे, त्यानीं ती लाकडांची रास केली कीं, त्यावरून चढून त्यांना आंत आपल्याला जायबंदी करण फारस कठीण नाहीं. आणि मला एकट्यालाच नाहीं काही हा धोका, तसा तो तुलासुद्धा आहेच कीं."

"खरं आहे; पण या म्हणावं असे जवळ कीं तुम्हाला पण मी चांगलेच भाजून काढतों;" विल्यम म्हणाला.

रेडीनीं मग सीग्रेव्हना आत झोंपायला जायला सागून आपण त्यांना बारा वाजता उठविण्यास येऊ म्हणून सागितले. या गेल्या दोन दिवसात अन्न अस कोणालाच फारस गेल नव्हत. काय कासवाच्या एकदोन तुकड्याची चव त्यानीं चाखली होती तेवढीच. पण त्याने त्याची तहान मात्र उलट जास्तच वाढली होती. मुलं तर तहानेने अत्यंत व्याकूळ झालीं होतीं आणि मामाला तर तोंड लावा-यलाच ती मुळीं तयार नव्हतीं. पण तहानेमुळें त्याची तळमळ मात्र भयंकरच वाढली होती. मिसेस सीग्रेव्हना तर आता वेड लागण्याची वेळ आली होती. आपल्या लहानग्याचे पाण्यावाचून होणारे ते भीषण हाल त्या मातृहृदयाला असहनीय झाले होते.

आता सीग्रेव्ह आत गेल्याबरोबर रेडींनीं विल्यमला बाहेर हाक मारली आणि ते म्हणाले: "विल्यम, आता यापुढें पाण्यावांचून आपण काही राहूं शकत नाहीं. कांहीहि करून पाणी हें आपल्याला आणलंच पाहिजे. माझ्यानें काही ते मुलाचे हाल पाहवत नाहीं आणि तुझ्या आईच्या मनाची तळमळही मला चागली दिसते आहे. आणि शिवाय आपल्याला रानटी लोकाशींसुद्धा पाण्यावाचून फार वेळ तोंड देणं शक्य नाहीं व्हायचं. आतां ही तयारी करून जर त्यानीं बाहेर होळी पेटवली तर आपण नुसते गुदमरून मरून जाऊं. म्हणून माझ्या

मनांतून हें चारपाच ग्यालनचं लहान पिंप आहेना ते घेऊन विहिरी-वर पाणी भरण्याच अ हे. आहे धाडसच हें पण ते करणहि भाग आहे. यश येईल किंवा न येईल, पण प्रयत्न हा केलाच पाहिजे. दुर्दैवानें जर मला काही अपघात झाला तर तूं मात्र धैर्य धर आणि आपल्या आईवडीलाना नीट धीर दे."

"पण रेडी, मीच गेलों तर?" विल्यमने विचारले.

"अंह, विल्यम, तें नाहीं शक्य. तशी पुष्कळ कारणं आहेत म्हणा, पण मुख्य म्हणजे माझ्या इतक तुला हें काम नीट जमणार नाहीं हेच आहे. मी या रानटी लोकाचाच रणवेश आंगावर चढवणार आहें—त्याचा तो झगा आणि तीं डोक्यातलीं पिस सुद्धा. आपल्या गोळ्यानी हे लोक आत पडले आहेत ना मरून, त्याचा पोशाक घेणार आहे मी काढून. हातात फक्त त्याचा एक भालाच घेणार आहे मी, कारण बदुकीच उगीच जास्त ओझंच होईल. तर आता नीट लक्ष दे. मी बाहेर पडलो कीं प्रथम ते दार लाऊन घे नीट घट्ट आणि आत पहारा करीत बस, आणि मी आलो कीं पटकन दार उघडून मला आत घे. आलना ध्यानात?"

"अगदीं पूर्णपणें, रेडीः पण आता मात्र खरीच भीति वाटायला लागली आहे मला. जर काही अपघात झाला तुम्हाला रेडी, तर काय भयंकर अवस्था होईल!"

"त्याला काही इलाज नाहीं पण विल्यम. काही हि करून आपल्याला पाणी हें आणलंच पाहिजे, आणि आत्ताचीच वळ चागली आहे प्रयत्न करून पहायला. आत्ता काम सपवून खाण्यापिण्यात गुतलेले आहेत ते लोक, म्हणून आत्ताच सधी चागली आहे. जरा वेळानें त्यांचा पण पहारा वाढेल. आत्ता मात्र बाईमाणसाशिवाय वाटेत कोणी सहसा भेटणार नाहीं मला."

रेडींनीं मग आपल्या अंगावर त्या रानटी लोकांचा पोशाक चढवला आणि खांद्यावर पिंप घेऊन आणि हातांत भाला घेऊन ते कुंपणाच्या दाराजवळ आले. विल्यमनें अतिशय सावधगिरीनें दाराचा अडसर काढला आणि बाहेरचा नीट कानोसा घेऊन रेडींना खुणावतांच त्यांनीं मोठ्या प्रेमानें विल्यमचा हात एकदा दाबला आणि मोठ्या सावधगिरीनें ते बाहेर पडले. विल्यमनें दार परत नीट बंद करून अडसर घट्ट बसवला आणि मोठ्या जागरूकपणें दाराजवळच तो पहारा करीत उभा राहिला. त्याचे कान बाहेरच्या आवाजाकडे लागले होते आणि बारीक सारीक आवाजानें सुद्धा त्याची छाती भीतीनें जोरानें धडधडूं लागे. डोक्यावरील झावळ्यांचा मंद आवाज सुद्धा त्याला घाबरवून सोडी. बंदुकीच्या चापावर हात ठेऊनच तो असा कांही वेळ उभा होता.

" आता झाली वेळ ते परत येण्याची मला वाटतं, " विल्यम आपल्याशीं पुटपुटला. " शंभर एक यार्ड आहे ती विहीर येथून, पण अजून काहीच आवाज कसा येत नाहीं आहे ऐकूं मला ? " पण अखेरीस त्याच्या कानावर काही मंद आवाज आला. कोणीतरी अतिशय सावधगिरीनें पावलं टाकीत येत होतं. होय, येतं आहे कुणी तरी. रेडीच येताहेत परत. मेहेरबानी परमेश्वराची म्हणायची. अडसर काढण्यासाठीं त्यानें हात लाकडावर ठेवला, नि आता तो ओढणार इतक्यात कसली तरी घडपड त्याच्या कानांवर आली, काही तरी खालीं पडल्याचा आवाज झाला. त्यानें एकदम अडसर ओढून काढला आणि दार उघडलें; तोंच रेडींची हांक त्याला ऐकूं आली. त्या बरोबर हातांतली बंदुक उचलून त्याने बाहेर उडीच घेतली. रेडी कुणाशीं तरी झगडत होते. ते खालीं पडले होते आणि एक रानटी माणूस

त्यांच्या छातीवर भाला रोखून बसला होता. विल्यमनें एका क्षणांत गोळी उडवली आणि तो माणूस मरून खालीं कोसळला.

" चल, तें पिंप घे आत झटकन, विल्यम, " क्षीण आवाजात रेडी म्हणाले. " मी शक्यतर आत येतो खुरडत खुरडत. "

विल्यमनें पाण्याचें पिंप आंत घेतलें आणि तो परत रेडींच्या मदतीला धावला. हा वेळ पर्यंत बंदुकीचा आवाज ऐकून त्याचे वडील हि बाहेर आले होते आणि विल्यमला रेडींना हात देताना पाहून ते पुढें आले आणि त्यानीं रेडींचा दुसरा हात पकडला आणि त्या दोघानी रेडींना कसें बसें आत आणलें. विल्यमने मग घाईघाईनें कुंपणाचें दार परत लाऊन घेतलें आणि अडसर आढून तें घट्ट केलें.

" कुठे जखम झाली रेडी ? " विल्यमनें विचारलें.

" होय रे बाळ, होय; अगदीं प्राणांतिक जखम झाली आहे मला वाटतं. जवळ जवळ आरपार गेला त्याचा भाला माझ्या छातींतून. पाणी, पाणी आण आधीं झटकन. पण असा घाबरून नको जाऊ बच्चा. अरे, मी काहीं मरायचा नाहीं या एवढ्याशाने. तसा मोठा चिवट आहे मी! पण पाणी पाज आधीं आता."

" अरेरे, आता कुठलं पाणी आणायचं ! " सीग्रेव्ह म्हणाले.

" आहे, पाणी आहे बाबा; पण फारच जबर किंमत पडली आहे त्यासाठीं आपल्याला. "

त्यानें धांवत पळत आत जाऊन एक भांडें आणलें आणि त्या पिंपांतून भरून त्यानें तें रेडींच्या ओठाला लावलें आणि त्यानीं तें आधाशासारखें एका दमांतच पिऊन टाकलें.

" हं विल्यम, आता मला या झावळ्यावर निजव नीट, आणि मग तें पाणी नेऊन दे सगळ्याना, आणि तुमचं सर्वांचं पाणी पिऊन झालं कीं परत इकडे माझ्याजवळ ये. आत तुझ्या आईला मात्र

मला जखम झाली आहे हे सांगू नको. समजलना मी सांगतो आहे ते ?"

"बाबा, तुम्ही न्या हे पाणी आत, मी बसतों इथेंच रेडींजवळ. मी नाहीं आता हलणार इथून."

"ठीक आहे बाळ; पण आधी तू घे पाणी पिऊन."

एक भांड भरून पाणी प्यायल्यावर विल्यमला पण हुशारी आली आणि तो परत रेडींजवळ येऊन बसला. त्याचा श्वास अवघडल्या-सारखा चालला होता आणि ते कांहीं न बोलता अगदीं निचेष्ट पडले होते.

× × × × ×

घरांत सर्वांना पोटभर पाणी पाजल्यानंतर मिस्टर सीग्रेव्ह बाहेर आले आणि त्यांनी विल्यमच्या मदतीनें रेडींचे कपडे काढून रेडींची जखम नीट तपासली. जखम खोल तर खरीच, पण त्यांना वाटलं होतं तितकं तिचं स्वरूप भयंकर मात्र नव्हतं. म्हणून त्यांनी झटकन आपली औषधी पेटी आणून रेडींची जखम नीट बांधली आणि त्यातून वाहणारा रक्तस्राव बहुतेक बंद करून टाकला.

"मला वाटतं बाबा, रेडींना आपण त्या पलीकडल्या झावळ्यावर नेऊन निजवूं या; ती जागा बरी आहे इथल्यापेक्षा."

"पाणी, आणखी पाणी दे विल्यम," रेडी क्षीणपणे पुटपुटले. विल्यमनें त्याच्या तोंडात पाणी ओतलें आणि मग त्यानं आपल्या वडीलांच्या मदतीनें उचलून त्या दुसऱ्या जागेवर नेऊन ठेवलें. त्यांनीं खालीं निजवल्याबरोबर रेडी एकदम कुशीला वळले आणि त्यांना ग्लानी येऊन त्यांनीं डोळे मिटले.

"आता जरा बरं वाटतं आहे मला," रेडी म्हणाले. "आतां ही जखम तुम्ही नीट बांधली आहे विल्यम, हें उत्तम झालं. कारण

माझ्यासारख्या म्हाताऱ्याच्या अंगात असं बाहेर वाहूं द्यायला जादा रक्त नाहीं आहे बाबा."

आतापर्यंत झालेल्या उपायानीं रेडींना आलेला थकवा आता जरा कमी झाला होता आणि त्याना थोडी हुशारी पण वाटत होती. इतक्यांत मिसेस सीग्रेव्ह बाहेर आल्या.

"आमचे रेडी कुठे आहेत ? त्या दयाळु पुरुषाचे किती उपकार आहेत आमच्यावर. देव त्याच भल करील."

मिस्टर सीग्रेव्ह त्याच्याजवळ जाऊन त्यानीं त्याचा हात पकडला आणि ते म्हणाले: "त्यांना दुखापत झाली आहे बरीच. चागलीच खोल झाली आहे जखम. मी मुद्दामच सागितल नाहीं मघाशीं तुम्हाला."

त्यानीं मग झालेली सारी हकीकत आपल्या पत्नीला सागितली आणि मग त्याना घेऊन ते रेडींजवळ गेले. मिसेस सीग्रेव्ह रेडींजवळ खालीं गुडघे टेकून बसल्या आणि त्याचा हात हातांत घेऊन त्यानीं रेडींच्या क्षीण चेहऱ्याकडे पाहताच त्याना रडे कोसळलें.

"असे माझ्यासाठीं नका अश्रु ढाळूं मॅडम," रेडी म्हणाले; माझे काय दिवस आता भरलेच आहेत. तरी पण मी मरणार नाहीं आहे हं ! पण तुमच्या आता मला उपयोगी नाहीं पडता यायच पहिल्या इतक, याचच वाईट वाटतं आहे मला."

"रेडी, खरेच मोठे दयाळू पुण्यपुरुष आहात तुम्ही. आमच काय व्हायचं ते होवो—त्या दयाघनावरच सारा भार आहे आता —पण तुम्ही जें जे काहीं आत्तापर्यंत आमच्या साऱ्याकरता केल आहे रेडी, तें कधीं कधीं विसरणार नाहीं आम्ही कोणीहि. त्या साऱ्याबद्दल कस उतराई व्हायचं आम्ही तुमचं ते एक देव जाणे. अनत उपकार

आहेत तुमचे आमच्यावर तर. देवच उभा राहिला होता तुमच्या रूपानें म्हणायचा!"

त्यांनी मग खालीं वाकून त्याच्या मस्तकाचे मोठ्या प्रेमानें चुंबन घेतलें आणि त्या रडत रडत घरात निघून गेल्या.

"विल्यम," रेडी म्हणाले, "मला आतां फार बोलवत नाहीं. माझं डोकं जरा उंच कर आणि तूं जा इथून. बऱ्याच वेळांत आपण शत्रूची हालचाल नाहीं पाहिलेली. तर तें काम कर आधीं आणि मग अर्ध्या एक तासानें ये परत. तुम्ही पण जा आता सीग्रेव्ह; आधीं मला थोडी ब्रॅंडी द्या पण. असा बघतोस काय आश्चर्यानें विल्यम? आहे, ब्रॅंडी आहे आपल्याजवळ. बोटीवरून आणलेली एक बाटली मी गपचूप पुरून ठेवली आहे माझ्या अंथरुणाखालीं. ती ये घेऊन लवकर. म्हणजे मला थकवा नाहीं वाटणार इतका. आणि मग जरा झोंप घेतली कीं थोडं बरं वाटेल मला."

त्याच्या सागीप्रमाणें ते दोघे तिथून उठले आणि रेडींना ब्रॅंडी देऊन ते झोंपल्यावर त्यानीं कुंपणाच्या फळयांवर चढून बाहेरची नीट पहाणी केली.

"हें मोठं वाईट झालं विल्यम," सीग्रेव्ह म्हणाले.

विल्यमनें होकारार्थी मान हलवली. "मला ते जाऊंच देत ना बाबा. बरं झालं असतं मीच गेलों असतों तर. प्राणांतिक जखम झाली आहे मला वाटतं त्यांना."

"असं खरं विल्यम; यांतून कांहीं वांचत नाहीं रेडी. पण देव इतका कठोर नाहीं होणार, असंहि वाटतं आहे मला. त्या पुण्य-पुरुषाची पुण्याई त्याला हात देईलच. पण आपली सर्वांची प्रार्थनाहि फुकट जाणार नाहीं मला वाटतं. पण उद्यां जर झाला परत हल्ला तर त्यांची उणीव मात्र पदोपदींच जाणवेल."

"जूनोने आणि आईनें जर आपली खोटी नाहीं केली तर आपण देऊं त्याना तोंड. पण रेडींच्या मदतीची उणीव ही भासणारच, यांत काहीं शकाच नाहीं."

"परमेश्वराची मर्जी. आपण आपल्याकडून तर प्रयत्नाची शिकस्त करूं या, मग होणं जाणं देवाहातीं."

विल्यम मग हळूच रेडींजवळ गेला. त्यांना गुंगी आली होती. म्हणून त्याना न चाळवतां तो परत आपल्या वडीलाजवळ गेला. त्याची तहान आता शात झाली असल्यानें पोटातल्या भुकेची हाक त्यांना स्पष्टपणें ऐकू येऊं लागली. म्हणून जूनोनें जाऊन कासवाचे तुकडे कापून आणले होते ते चागले भाजून त्या सर्वांनीं आपली क्षुधा शात केली. विल्यम मग परत एकदा रेडींजवळ जाऊन आला. त्याचे डोळे उघडले होते.

"आता कसं वाटतं आहे रेडी?" विल्यमनें विचारलें.

"आता पुष्कळ बरं वाटतं आहे विल्यम. पण माझा शक्तिपात मात्र खूपच झाला आहे. म्हणून मला हालचाल मात्र सोसणार नाहीं. तर हें बघ, इथून जर पळून जावं लागलं तुम्हाला, तर माझी मुळींच काळजी करूं नका, बरं का! मी आहे तिथेंच राहूं द्या मला."

"तुम्हाला टाकून जाण्यापेक्षां मी आपला प्राण देईन इथे, रेडी."

"अ हं, विल्यम मोठी चूक होईल ती. तुझं पहिलं कर्तव्य तुझ्या आईला नि लहान भावंडांना वांचविण्याचं आहे, समजलंना? वचन दे विल्यम मला, मी सागतों असं वागेन म्हणून."

विल्यम खिन्नपणें त्यांच्याकडे नुसता पहात होता.

"तुझं कर्तव्य काय आहे तें मी सांगतों आहे तुला, विल्यम. तुझ्या भावना मला समजतात, पण त्यांच्या आहारी जाऊन चालायचं

नाहीं विल्यम; वचन दे मला तसं, नाहीं तर अतिशय वाईट वाटेल मला. ”

विल्यमनें रेडींचा हात घट्ट दाबला. त्याचं हृदय जड झालं होतं आणि तोंडातून शब्द बाहेर फुटत नव्हता.

“ आतां उजाडल्याबरोबर ते परत हल्ला चढवतील विल्यम, आणि तसा आता फार वेळ पण नाहीं उरला उजाडायला. जा, वर जाऊन पहारा कर परत उजाडेपर्यंत, आणि मग येऊन साग मला तुला काय काय दिसलं तें; बरं ! ”

रेडींचा आवाज आता जास्तच क्षीण येत होता. इतका वेळच्या बोलण्यानें त्याना खरच श्रम वाटत होते, आणि त्यानीं जरा डोळे मिटले.

विल्यम मग लगेच नारळीवर चढला आणि दिवस उजाडेपर्यंत तो खालीं उतरला नाहीं. सभोंवार चागला उजेड पडताच त्याला आपल्या शत्रूंची धावपळ सुरू झालेली दिसू लागली. जुन्या घराच्या जवळ त्यानी खूप लाकडें गोळा केलीं होती आणि हल्ला करण्याची ते झपाट्यानें तयारी करीत होते. जरा वेळानें मग प्रत्येकाने एकेक ओंडका उचलला आणि ते कुंपणाच्या दिशेने पुढे येऊं लागले. त्याना तसे चाल करून येताना पाहून विल्यम आपल्या जागेवरून उतरून खालीं आला आणि त्यानें आपल्या वडीलाना हाक मारली आणि त्या दोघानीं फळ्यावरील आपल्या जागा पकडल्या. त्याच्या जवळ जूनो आणि मिसेस सीग्रेव्ह उभ्या राहून त्याच्या बंदुकी भरून देऊ लागल्या.

“ आपल्याला नीट नेम धरता येईल इतक्या अंतरावर ते आले कीं लगेच आपण बंदुकी झाडल्या पाहिजेत, बरंका विल्यम. त्यांना आपल्या कुंपणाच्या फार जवळ नाहीं येऊन देता उपयोगी; ” सीग्रेव्ह म्हणाले.

त्याप्रमाणें आघाडीची टोळी पन्नास कदमावर येताच दोघानीहि बंदुकी झाडल्या आणि दोन लोक खालीं कोसळले; आणि शत्रू पुढे पुढे येत असता त्याचा मारा चालूच राहिला. जवळ जवळ पंधरा मिनिटं चालला होता हा प्रकार. मग त्या रानटी लोकानीं हातातले ओंडके आगासमोर धरून आवेशानें पुढे चाल केली. या युक्तीने फारशी मनुष्यहानी होऊं न देतां त्या रानटी लोकानी कुंपणाशीं तर लगट केली, आणि हातातल ओंडके कुपणाच्या जवळ रचण्याला त्यानीं सुर- वात केली. इकडे आतून बंदुकीचा मारा जोरात चालूच होता तरी त्या लाकडी तटबंदीच्या बाहेर ओंडक्याची राग सारखी वाढतच चालली होती. अनेकाचा बळी पडतच होता तरी आता ते ओंडके खूपच उच झाले होते. ओंडक्याच्या त्या उतरत्या केलेल्या राशीवरून चढून तटाचें शिखर गाठण्याचा शत्रूचा विचार आता स्पष्ट दिसत होता. त्याच्या जवळचे ओंडके सपलेसे दिसू लागले आणि ते रानटी लोक विश्रातीसाठीं म्हणून मागें फिरले.

"मागें फिरले आहेत ते लोक बाबा जरा, पण थोड्याच वेळात ते परत हल्ला चढवतील आणि मग मात्र त्याना पिटाळणं आपल्याला अगदीं अशक्य आहे."

"मलाहि तीव्र भीति वाटते आहे विल्यम. परत मागें जोरानें उल- टून हल्ला चढवण्यासाठींच ते मागे सरले आहेत बहुतेक. त्यापेक्षा त्यानीं ते ओंडके पेटवले असते तर रेडींच्या सागण्याप्रमाणें आपल्याला इथून बाहेर पडता आलं असत. पण आता ती शक्यता काहीं नाहीं दिसत मला."

"पण आईजवळ काही बोलू नका ह यातलं. अगदीं अखेरपर्यंत आपली शिकस्त करून लढू या आपण; आणि मग जर आपला पाडाव झाला तर देवाची मर्जी."

"तुझ्या आईची एकदा शेवटची भेट घेतली असती तर बरं झालं असतं. पण नको, मनाला आता असं हळु होऊन देऊन चालायचं नाहीं. ते पहा विल्यम आलेच ते; कसे माशासारखे धापावत येत आहेत ते पहा. बरं; देव तुझं संरक्षण करो बाळ; स्वर्गात आपली सर्वांची भेट होईलच !"

त्या रानटी लोकाचा सगळा जमावच्याजमाव आतां त्या लाकडी तटबंदीकडे धावून येत होता. त्याच्या आक्राळ विक्राळ किंकाळ्या आसमंतात घुमत होत्या. आणि त्या ऐकून मिसेस सीग्रेव्ह नि जूनोच्या हृदयाचा जरी थरकाप होत होता तरी त्याचें बंदुकी भरण्याचें काम मात्र तिळभरहि थांबत नव्हतें. दांत ओठ चाऊन त्या बंदुकीत दारू ठांशीतच होत्या. शत्रूची आघाडी पन्नास कदमावर येताच सलामी-दाखल आतून पहिली फैर झडली. बंदुकींच्या आवाजाला रानटी लोकांनीं कर्णकटु गर्जनांनीं प्रत्युत्तर दिलें आणि त्यांनीं मोठ्या आवेशानें त्या ओंडक्याच्या राशींवर चढण्यास सुरवात केली. पण इतक्यात बंदु-कींचा आवाज आणि त्या कर्णकटु गर्जना सारंच एका प्रचंड तोफेच्या कडाडण्यात एकदम गुप्त होऊन गेलं आणि त्या विलक्षण आवाजानें दोन्ही पक्ष सारखेच चकित झाले. परत एकदा तसाच प्रचंड धड-धडाट झाला, मग दुसरा नि तिसरा आणि धुळीचे लोट वर उसळले आणि ते रानटी लोक आपल्या होड्याच्या दिशनें सैरावैरा पळत सुटले.

"जहाजावरच्या तोफेचा आवाज आहे हा बाबा," विल्यम म्हणाला. "सुटलों—वाचलों—वाचलों बाबा आपण !"

"होय, तोफेचाच आवाज हा दुसरा कसला नाहीं. वाचलों आपण, बाळ—काय विलक्षण चमत्कार !" सीग्रेव्ह आश्चर्यानें उद्गारले.

नारळीच्या गर्द झाडोंतून गोळ्यांचा वर्षाव चालू होता आणि अनेकांचा पळता पळता खालीं वाळूवर बळी पडत होता.

" वाचलों, वाचलों आपण ! " आनंदानें खालीं उडी टाकून नि आपल्या पत्नीला घट्ट कवटाळून सीग्रेव्ह उद्गारले. भावनातिरेकानें गळून जाऊन मिसेस सीग्रेव्ह मटकन खालीं बसल्या आणि त्यानीं कृतज्ञतनें वर आकाशाकडे दृष्टि लाऊन हात जोडले.

विल्यम बंदुक खालीं टाकून खारीच्या चपळाईनें वर नारळीवर चढून जाऊन तोफेचा परत धडधडाट झाल्याबरोबर मोठ्यानें खालीं पहात ओरडून म्हणाला:

" खूप मोठं जहाज दिसत आहे बाबा. त्या रानटी लोकाच्या होडयावर मारा करताहेत आता ते आणि बहुतेक निकालच झाला आहे त्याचा; आणि ही एक हत्यारबंद लोकानी भरलेली होडी येते आहे किनाऱ्याकडे आपल्या बागेजवळ. त्या पहा, त्या रानटी लोकांच्या तिन्ही होडया बुडाल्या बघा, आणि हे आपले लोक खालीं उतरून इकडेच येताहेत. " विल्यम मग पहिल्या इतक्याच चपळाईनें उतरून खालीं आला.

तो खालीं उतरल्याबरोबर त्यानें धावत जाऊन वेशीचा अडसर काढून दूर केला. त्याच्या रक्षणकर्त्यांचीं पावलें बाहेर जवळच वाजत होतीं. त्यानें दार उघडलें आणि दुसऱ्याच क्षणीं कॅप्टन ऑसबोर्नच्या हातांचा विळखा त्याच्या आगाभोंवतीं पडला.

:: २३ ::

कथानकाचा धागा पुढे चालूं करण्यापूर्वी आधीं कॅप्टन ऑसबोर्न या अगदीं आणिबाणीच्या वेळीं तिथे कसे येऊन पोंचले तें समजण्यासाठीं आपल्याला थोडी मध्यतरींची हकीगत पाहिली पाहिजे.

कॅप्टन ऑसबोर्नचा मूर्च्छित देह होडींत घेऊन मॅकिंटॉश 'पॅसिफिक' जहाजावरून रेडोना आणि सीग्रेव्ह कुटुंबीयाना असहाय स्थितींत सोडून गेल्याचें मागें सांगितलेंच आहे. ती होडी निघाल्यानंतर दुसरेच दिवशीं हवा पूर्णपणें निवळून वादळ शांत झालें आणि आतील लोकांच्या सुदैवानें व्हॅन डायमन्स लॅंडला जात असलेल्या एका व्यापारी जहाजाची आणि त्यांची गांठ पडून ते सर्व ऑस्ट्रेलिआला सुरक्षित येऊन पोंचले. ह्या वेळपर्यंत रेडी आणि सीग्रेव्ह कुटुंबाची काय अवस्था झाली असेल याचीहि कल्पना ऑसबोर्नना पूर्णपणें आली होती आणि त्याचें मन अत्यंत व्यथित झालें होतें. ते आतां तिथेंच स्थाईक झाले होते. एक दिवस लंडनहून येणाऱ्या आपल्या मालाची वाट पहाण्यासाठीं ते सिडनेला गेले असतां त्यांचा माल आणणाऱ्या जहाजानें एका लहान बेटावर गोऱ्या लोकांची वस्ती आहे आणि त्यांनीं तंबूवर उभारलेल्या निशाणावर 'पॅसिफिक' असें नांव असल्याचें त्यांनीं पाहिल्याचें ऑसबोर्नना सांगितलें. आणि वाऱ्याचा जोर अतिशय असल्यानें आपलं जहाज आपण मागें नेऊं शकलों नाहीं, असेंहि त्या कप्तानानें सांगितलें. त्या मिळालेल्या माहितीच्या आधारावरच ऑसबोर्ननीं सरकारी मदत मिळवून एक जहाज घेऊन ते या बेटावर आले होते. रानटी लोकांच्या होड्या बेटावर येऊन उतरल्या त्याच वेळीं ऑसबोर्नचें जहाज बेटानजीक आलें होतें आणि

रेडी नि विल्यम लाकडी तटबंदीच्या आंत जात असता विल्यमनें तसें रेडींना सांगितलें होतें. आणि रेडींना जर दुर्बिण डोळयाला लावण्याची सवड सापडली असती तर तें जहाज त्याना चांगले दिसलें असते. पण तसें व्हायचें नव्हतें. आणि बेटाचा भाग सभोंवार खड काळ असल्यानें आत शिरण्यास सुरक्षित जागा शोधून काढून आत शिरण्यास इतका वेळ लागला होता. बंदरात शिरताच त्याच्या दृष्टीस रानटी लोकाच्या होड्या पडल्या आणि त्यानीं निशाण धरून त्याच्यावर आपल्या तोफा डागल्या. पुढें काय झाले ते मागील प्रकरणात आलेच त्याहे.

कॅप्टन ऑसबोर्नच्या आगमनानें मिस्टर आणि मिसेस सीग्रेव्हना किती आनद झाला असेल हें माझ्या वाचकास सहज समजेल. कॅप्टन ऑसबोर्ननी मग काहीं लोक रानटी लोकाच्या तपासासाठीं बेटावर रवाना केले आणि रेडींना जखम झाल्याचे ऐकून ते त्याच्या समाचाराला गेले. रेडींनीं त्याचा आवाज ओळखला. कारण शक्ती क्षीणतेनें त्याना डोळे उघडून नीटपणें पहाताच येत नव्हतें

"कॅप्टन ऑसबोर्न नाही का?" क्षीण स्वरात रेडीनी विचारलें; "मी ओळखला आवाज. अगदीं योग्य वेळीं आलात कप्तानसाहेब आपण आपण याल ही माझी खात्री होतीच आणि मी तस बोलून पण दाखवलं होत मृत्युशय्येवर पडलेल्या या रेडीचे धन्यवाद आहेत आपल्याला कॅप्टन"

"इतकी भयकर नाहीं आहे तुमची अवस्था रेडी," ऑसबोर्न त्यांचा हात दाबीत म्हणाले. "जहाजावरचे डॉक्टरना पाठवतो आत्तां आणण्याला."

"आतां डॉक्टरी मदतीच्या पलीकडे गेलो आहें मी, असं वाटतं आहे मला कप्तानसाहेब. अर्ध्याएक तासातच आता मी अनतात विलीन होईन."

" अहो, तुम्ही खूप विलीन होऊं पहाताहात. पण अनंताची तशी इच्छा नाहीं दिसत मला. कारण नाहींतर त्यानें आम्हाला या आणीबाणीच्या वेळीं नसतं इथे पाठवलं. बरं का रेडी! डॉक्टर येतीलच आतां;" कॅप्टन ऑसबोर्न रेडींचा हात दाबीत म्हणाले.

रेडींनीं मंदस्मित केलें आणि आपले हात जुळवून परमेश्वराची मूक प्रार्थना करीत ते कांहीं वेळ तसेच राहिले होते. त्याच्या चेहऱ्यावर कर्तव्यपूर्तीचे समाधान विलसत होतं. आणि त्याची एक प्रकारची तंद्रीच लागली होती.

" एक अत्यंत सज्जन आणि सत् प्रवृत्त माणूस आहे हा, कॅप्टन," सीग्रेव्ह म्हणाले. " परमेश्वराजवळ त्याच स्थान अढळ आहे. या भल्या माणसानें काय नाहीं आमच्यासाठीं केलं, कप्तान साहेब ! उघड्या डोळ्यानीं आम्हाला कालमुखात ढकलून त्यावेळीं ते सारे निघून गेल्यानतर हा सज्जन आमच्याजवळ मागें राहिला. त्याच्याच अक्कल हुशारीनें, धैर्यानें आणि मेहनतीने आत्तांपर्यंतचा काळ आम्ही सर्वांनीं सुखानें काढला. आणि आता अडचणी संपल्यानतर त्याना जर परमेश्वराने आमच्यांजवळ ठेवले, तर त्याच्यासाठीं आम्ही काय करणार नाहीं. ! धैर्य आणि शालीनतेचं ते एक मूर्तिमंत उदाहरणच आहेत. त्याच्याच संगतीनें मी हि माझं जीवन थोडं फार उन्नत करूं शकलों. आणि त्याच्याच संगतींत आणखी काही वर्षे परमेश्वरानें मला घालवूं द्यावीं आणि त्याचं ऋण अल्पांशानें तरी मला फेडूं द्यावं, एवढीच तीव्र इच्छा आहे ! "

मिसेस सीग्रेव्हच्या डोळ्याचं तर पाणीच खळत नव्हतं. विल्यमच्या तोंडून पण किती वेळ तरी मुळीं शब्दच फुटत नव्हता. अनंत प्रेमळ स्मृतींनीं त्याच अतःकरण भरून आलं होत. " आई वडीलांच्या बरोबरीचा माझा एक प्रेमळ हितकर्ता आणि दोस्त म्हणजे एकटे रेडी. त्यानीं आमच्यासाठीं काय काय केलं, प्रसंगीं आपले प्राणहि कसे

घोक्यात घातले, याची स्मृति मी कधींच विसरूं शकणार नाहीं. देव त्यांच भलं करो!" तो हळूच पुटपुटला आणि रेडींच्या श्रांत निद्रित मुखावरून त्यानें मोठ्या प्रेमाने हात फिरवला.

× × × × ×

दुसरे दिवशीं आवश्यक त्या सामानाची त्यानीं बांधाबांध केली आणि आपले रॉम्युलस, रीमस, व्हिक्सन नि तिचीं पिलं आणि आपल्या शेळ्या मेंढ्यांचा सारा संसार त्यानीं बरोबर घेऊन जहाजावर पाय ठेवला. सर्व सामान जहाजावर चढल्यावर जहाजानें नांगर उचलला. जहाजाचीं सर्व शीडें उभारलीं होतीं आणि बेटाचा भाग क्रमाक्रमानें अंधुक होत होता, तरी सर्वांचे डोळे अजून त्या बेटावरच खिळले होते.

"या बेटावर जेवढ सुख भोगल आपण, त्याहून अधिक सुख आपल्याला कधीं तरी मिळेल का?" मिसेस सीग्रेव्ह म्हणाल्या.

"जास्तीचं राहूं दे. पण त्याहून कमी नाहीं मिळालं तरीहि समाधान आहे मला त्यात. आणि आता आपल्या या रेडींची सगत आपल्याला यापुढें लाभणार या आनंदापुढे कसल्याच संकटाची क्षिती मला वाटणार नाहीं;" सीग्रेव्ह म्हणाले.

"अगदीं खर. पण कसली वेळ आली होती, याची आठवण झाली कीं अजूनहि माझ्या हृदयाचा थरकाप होतो. पण देवाचीच कृपा म्हणून रेडी परत मिळाले आम्हाला!" मिसेस सीग्रेव्ह उद्गारल्या.

"पण आता आपण पेन्शन घेणार बुवा. आता थकलीं हीं म्हातारीं हाडं, मॅडम;" रेडी म्हणाले.

"इतक्या लौकर कसलीं थकतात म्हणा तीं!" विल्यम म्हणाला. "उद्यां कसलं संकट राहूं दे आमच्यावर उभं, कीं हीं म्हातारीं हाडं कशीं तरुणाहून तरणीं होतील बघा. नाहीं पपा?"

यावर सगळींच रेडींकडे कौतुकानें पहात मन मोकळेपणें हांसलीं.

जहाजाचा वेग आता खूपच वाढला होता आणि क्षणाक्षणाला बेट दृष्टीच्या पलीकडे जात होतं. थोडयाच वेळांत मग ते बेट क्षिति रेषेखालीं गडप झालं आणि झाडांचे शेंडे मात्र काही वेळ नुसते दिस राहिले. तरी जूनो नि विल्यम मात्र डेकवर अनिमिष नेत्रानीं त बेटाकडे पहात अजूनहि उभीं होतीं; आणि अखेरीस मग काहींच दि नाहीसें झाल्यावर एक दीर्घ सुस्कारा सोडून बेटाच्या दिशेनें आप रुमाल त्यानीं हलविले.

---